# सेतुपार्वती

लघुकथा आणि दीर्घकथा

मूल्य : ४–५०

श्रा. के. क्षीरसागर

प्रकाशक :
दि. ग. जोशी
शास्त्री हॉल, मुंबई ७
पहिली आवृत्ति : मे १९६२

मुखपृष्ठ : प्रभाकर गोरे
मुद्रक :
चिं. स. लाटकर
कल्पना मुद्रणालय, शिव-पार्वती
४६१।४ सदाशिव, पुणे २

रवीन्द्रनाथ आणि शरदबाबू
यांच्या
महाराष्ट्रीय भक्तांस

## अनुक्रम

# प्रास्ताविक—

‘ राक्षसविवाह ’ ही माझी कादंबरी सुमारें वीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाल्यापासून, कथाकादंबरीच्या स्वरूपाचें असें माझें एकहि पुस्तक प्रसिद्ध झालें नव्हतें. पण या वीस वर्षांत मी कथा लिहिल्याच नाहींत असें मात्र नव्हे. अधून मधून मी कथा लिहित होतों, त्यांचाच हा संग्रह आज वाचकांच्या पुढें येत आहे. माझे एक ज्येष्ठ साहित्यिक मित्र मला वरचेवर म्हणत — “ अहो ! ‘ राक्षस-विवाहा ’सारखं सुंदर ललित पुस्तक लिहायचं सोडून दुसऱ्यांच्या पुस्तकांवर टीकालेखन काय करीत बसलां आहांत ? हीं दुसऱ्यांचीं बाळंतपणं आतां बस् करा ! ” माझें हें पुस्तक पाहून ते माझे मित्र संतोषाचेच उद्गार काढतील अशी खात्री देववत नाहीं; — तरी पण १९४० सालानंतर आज पुन्हा माझें ‘ स्वतःचें बाळंतपण ’ करण्याचा योग येत आहे खरा !

पण ही थट्टेची भाषा सोडली, तरी एक गोष्ट कबूल केली पाहिजे. माझ्या सारख्या प्राधान्येंकरून टीकात्मक लेखन करणारांचा जरी कौल घेतला, तरी तो — “ ललित वाङ्मय लिहिण्यांत जें आत्माविष्काराचं आणि कलानिर्मितीचं समाधान आहे, तें टीकात्मक आणि प्रतिपादनात्मक लेखनांत नाही ! ” असाच मिळेल. कल्पनेचें विश्व निर्माण करण्यांत जो आनंद आहे, तो तत्त्वप्रतिपादनांत किंवा मूल्यमापनांत खास नाहीं. हें माझें विचारपूर्वक मत तर आहेच, पण मीं जें थोडेंफार ललित लेखन केलें आहे, त्यांतून लाभलेला हा माझा स्वानुभवहि

आहे. असें असूनहि मी टीकालेखनांत किंवा ‘ दुसऱ्यांच्या बाळंतपणां ’त कसा रमलों, याचें कधीं कधीं माझें मलाच नवल वाटतें.

हें कसें घडलें असावें, याचें पूर्वस्मरणात्मक विश्लेषण खरोखरच मनोरंजक होईल. पण तें करण्याची ही जागा नव्हे. एक गोष्ट मात्र मला प्रांजलपणें कबूल केली पाहिजे. कथानकनिर्मितीच्या बाबतींत मी कांहींसा निष्कांचन आहे. ‘ राक्षसविवाह ’ या माझ्या कादंबरींतहि घटनांपेक्षां काव्यात्म चिन्तन आणि मनोविश्लेषणच अधिक आहे. याखेरीज, ‘ कथा ’ हें मी माझें प्रमुख वाङ्मयीन माध्यम केलेलें नसल्यामुळें, एखादेंही अर्थपूर्ण जीवनदृश्य दिसल्याशिवाय कथा लिहायला बसायचेंच नाहीं, असें मीं म्हटलें, तर चालण्यासारखें होतें. याचा परिणाम असा झाला आहे कीं, ‘ सेतुपार्वती ’ या माझ्या कथा-संग्रहांत आज अन्तर्भूत होत असलेल्या कथांपैकीं पहिली कथा १९३६ मध्यें लिहिली गेली, तर शेवटची कथा १९५८ मध्यें लिहिली गेली आहे !

जीवनाच्या ज्या कालखंडांत मी ‘ कथेच्या प्रान्तांत प्रवेश करायचा कीं टीकेच्या प्रान्तांत प्रवेश करायचा ’ याचाहि विचार केला नव्हता; – किंबहुना, साहित्यिक होण्याचा विचार माझ्या मनाला शिवलेलाच नव्हता, त्या कालखंडांत रवीन्द्रनाथांचें वाङ्मय माझें आवडतें वाङ्मय होतें. पण रवीन्द्रांचें ‘ वाङ्मय ’ म्हणजे त्यांचें ‘ काव्य ’ नव्हे ! -- तर त्यांचें कथावाङ्मय मला अत्यन्त प्रिय होतें. मी लिहिल्या आहेत त्या कथा चांगल्या आहेत कीं वाईट आहेत, हें जो तो आपल्या आवडीप्रमाणें ठरवील. पण माझ्या कथेच्या तंत्राकरितां मी तरुणपणीं जर कोणता कित्ता गिरवला असेल, तर तो रवीन्द्रांच्या कथांचा, एवढें मात्र खास. मानवी अन्तरंगालाच प्रतीत होणारी एखादी

नाजुक ' ट्रॅजेडी ' ( दुर्घटना ) किंवा ' Irony ' ( दुर्विलास ) हा रवीन्द्रांच्या सुंदर कथांपैकीं बहुतेकींचा गाभा असतो. सरळ, चपळ निवेदन, सूक्ष्म उपरोध, आणि मध्येंच अपरिहार्य उद्रेकाप्रमाणें शिरलेलें काव्य (Lyricism), हा रवीन्द्रांच्या कथांचा साचा म्हणून सांगतां येईल. यांपैकीं पहिले दोन विशेष सहजगत्या वा रवीन्द्र-संस्कारामुळें माझ्या कथांत कदाचित् कांहीं जागीं भेटतील; पण निसर्गाशीं आणि भवितव्यतेशीं योग्य जागीं जणूं कानगोष्ट करणाऱ्या त्या महर्षीच्या कथा-वाङ्मयांत, मध्येंच भेटणारें काव्य आणि गूढगुंजन माझ्या-सारखा त्यांचा नम्र पुजारी कुठून असणार ?

रवीन्द्रनाथांच्यानंतर जर कुणाचें ऋण या संग्रहाच्या निमित्तानें कबूल केलें पाहिजे असेल तर तें जीवनाचें, वा विधिघटनेचें होय. मजसारखा, कथानकाच्या दृष्टीनें कफल्लक लेखक, जीवनानेंच कथाबीजें पुरवलीं नसतीं, तर बहुधा कथालेखनाकडे वळलाहि नसता. कांहीं लेखक आपल्या कथेच्या प्रारंभीं असें घोषित करतात, कीं ' यांतील सर्व व्यक्ति काल्पनिक आहेत '. मला या ठिकाणीं कृतज्ञतापूर्वक असें घोषित करायचें आहे कीं, या संग्रहांतील ' माझ्या कन्येची इच्छा ' या पहिल्या कथेपासून ते ' सेतुपार्वती ' या शेवटच्या कथे-पर्यंतच्या नऊच्या नऊ कथांतील सर्व प्रमुख पात्रें जीवनांत भेटलेल्या ' Original ' शिवाय मला सुचलींच नसतीं ! अर्थात् पात्रें प्रत्यक्ष सृष्टींतलीं असलीं तरी, त्यांच्याभोंवतीं गुंफलेल्या घटना सर्वस्वी काल्पनिकच आहेत.

◇ ◇

' माझ्या कन्येची इच्छा ' ( १९३६ ) या कथेंत मी एका ' आडवया 'च्या ( adolescent ) मुलीच्या रम्य तऱ्हेवाईक वृत्तीचा ' क्लोज अप् ' घेतला

आहे. अर्थात् कथेंत 'क्लोज अप्' घेणें, म्हणजे नुसतें मनोविश्लेषण नव्हे, तर घटनांच्या द्वारें आविष्करण असलें पाहिजे, हा इतरांच्या बाबतींतला माझा कटाक्ष माझ्या कथेंत मीं पाळला आहे असें वाटतें. 'प्रेमाचा रखवालदार' या कथेंत एका आधुनिक प्रेयसीच्या उघड 'अनेकनिष्ठे'चें चित्र काढून मीं प्रेमाबरोबर मत्सराचीहि तरफदारी केली आहे. 'प्रेम आणि संन्यास' या कथेंत ध्येयवादीपणा आणि भाबडेपणा यांच्या वांट्याला पुष्कळदां येणाऱ्या दुर्दैवाचें चित्र रंगवलें आहे. 'तूं हुबेहूब साउली त्याच्च मूर्तिची'ही ओळ तांब्यांच्या 'पन्नास वर्षांनंतर' या कवितेची पहिली ओळ आहे.

**तूं नात जिची गे पणतू होउत तिला**
**रडणार कोण मजसाठीं?—नशिबास नर्क ठेविला ।**

या दोन ओळींत त्या कवितेतील शोककथेचा व या संग्रहांतील शोककथेचाहि अर्क सांठविलेला आहे. 'आक्कांची वटपूजा' या कथेंत, वित्तीशीं शूरपणें झगडत असतांच्च गरीब मोलकरणींना साक्षर करून आनंद मिळवणाऱ्या एका दिवंगत माउलीचें चित्र आहे. हें जीवन फार जवळून पाहाण्याचें मला भाग्य लाभलें, एवढाच्च निर्देश येथें पुरें होईल. 'परमेश्वरा, त्यांना क्षमा कर!' या कथेंत चितारलेली 'सवंग गुणलुब्ध' स्त्री, माझ्या वाचकांपैकीं कांहींना तरी भेटली असेल! 'प्रायश्चित्त-विवाह' ही कथा म्हणजे फ्रेंच लेखक मोपॉसाँ याच्या कथेचें 'वेशान्तर' होय. त्या कथेंतील अत्युत्तम भागाचें शक्य तेवढें प्रामाणिक भाषान्तर करण्यांतहि मीं कसूर केलेली नाहीं, आणि तरी त्या कथेला भारतीय वेश देण्याकरितां मला त्यांत काल्पनिक भागहि बराच्च घालावा लागला

आहे. आणखी एका कारणानेंहि या कथेंत काल्पनिक भाग शिरला. मोपॉसाँच्या याच कथेचें भाषान्तर करावेसें वाटण्याचें कारण देखील जीवनांत प्रत्यक्ष पाहिलेल्या कांहीं व्यक्ति व घटनाच असल्यानें, मोपॉसाँच्या कल्पनासृष्टींत माझी 'अवलोकित' सृष्टीहि मिसळणें अपरिहार्य होतें. 'आंतली गांठ' ही माझ्या व्याख्येप्रमाणें लघुकथा नव्हे! पण एक विवाद्य उदाहरण किंवा test case म्हणून मीं ती मुद्दाम अन्तर्भूत केली आहे. त्या कथेंत 'कथानक' नाहीं, असें नव्हे; पण ई. व्ही. लूकास या लेखकाच्या लघुनिबंधांतहि कधीं कधीं ज्या प्रकारचें कथानक असतें, त्या प्रकारचेंच पातळ, औपरोधिक, आणि प्रतिपादनाभिमुख कथानक माझ्या 'आंतल्या गाठीं'त आहे.'

शेवटची कथा 'सेतुपार्वती.' या संग्रहांतील प्रमुख कथांपैकीं ही एकच अशी होय, कीं जिचें तंत्र आणि शैली रवीन्द्रांखेरीज अन्य घराण्यांतील आहे. तें शरद्बाबूंच्या घराण्यांतील आहे म्हणूं का? पण रवीन्द्रांचें नांव घेण्यापेक्षांहि शरद्बाबूंचें नांव घ्यायला मला अधिक संकोच वाटत आहे!... ही कथा उघड उघड सिद्धान्तगर्भ आहे. 'प्लेटॉनिक लव्ह' किंवा 'अशरीर प्रेम', मागण्यानें मिळण्यासारखें नाहीं; 'करीन' या संकल्पानें करतां येण्यासारखेंहि नाहीं, हा सिद्धान्त मीं एका दीर्घ कथेच्या द्वारें येथें मांडला आहे.

गेल्या वर्षीं मुंबईच्या 'पॉप्युलर बुक डेपो'नें 'वादसंवाद' हें माझें पुस्तक प्रसिद्ध केल्यापासून माझें हें सहावें पुस्तक बाहेर येत आहे. प्रकाशनाच्या वाटेवरील माझ्या या द्रुत गतीला कांहीं तशींच कारणें आहेत. यंदांचें वर्ष हें माझ्या 'व्यवसाय-निवृत्ती'चें वर्ष आहे, एवढें सांगितलें म्हणजे जवळ असलेलें हें 'संचित' अधिक काळ गांठीला ठेवणें मी योग्य कां समजत नाहीं तें

ध्यानांत येईल. तथापि, माझे तरुण मित्र व विद्यार्थी श्री. शंकर सारडा एम्. ए. यांनीं प्रकाशनमार्गाची सर्व शिडोरी तयार केली नसती, तर हें पुस्तक आणखी किती दिवस कपाटांतच राहिलें असतें हें मी सांगू शकत नाहीं.

पण शिदोरी तयार केल्यानंतर सारडा यांचा मुक्काम दिल्लीकडे हालल्यानें, माझ्या इतर मित्रांना व शिष्यांना या पुस्तकाचें 'बाळन्तपण' करावें लागलें. 'वाङ्मयीन मूल्यें' या माझ्या पुस्तकाचे प्रकाशक जे. दत्त (डॉ. जोशी) यांनीं आग्रहानें व थोड्या घाईनेंच तें प्रकाशनाकरितां मजकडून नेलें. माझे एके काळचे विद्यार्थी श्री. लाटकर (कल्पना मुद्रणालय) यांनीं तितक्याच त्वरेनें—पण फारच साक्षेपानें—या पुस्तकाचें मुद्रण पुरें केलें. पुस्तकाची मूळ प्रत शोधण्यांत, मुद्रणप्रत तयार करण्यांत, व प्रुफें तपासण्यांत ज्यांचें ज्यांचें तत्पर साहाय्य झाले, त्या सर्व मित्रांच्या आणि शिष्यांच्या साहाय्याअभावीं हें पुस्तक बाहेर येऊं शकलें नसतें, एवढेंच येथें नमूद करतों.

या कथा लिहिल्या तेव्हां व प्रसिद्ध झाल्या तेव्हां, पुष्कळांना आवडल्या होत्या. आज पुस्तकरूपानें प्रकाशित झाल्यावर त्या अधिकतर वाचकांना आवडतील अशी मला आशा आहे.

दि. ७-१-६१
महाराष्ट्र साहित्य परिषद्,
पुणें २.

श्री० के० क्षी०

१

# माझ्या कन्येची इच्छा

मी ज्या वेळीं विलायतेहून परत निघालों त्या वेळीं हिंदुस्थानांतील माझ्या गणगोतांत माझी बायकोहि आहे ही गोष्ट आठवतांच माझ्या कपाळाला आंठ्या पडत. तसें कां होई हें सांगणें म्हणजे माझ्या लग्नाची हकीकत सांगावी लागेल, व ती सांगण्याचें हें स्थळ नव्हे. तथापि, माझ्या तिटकाऱ्यास तिचा कोणताहि दोष कारणीभूत झाला नव्हता, हें मात्र सांगितलें पाहिजे. ती स्वभावानें सालस, रूपानें निर्दोष व श्रीमान् घराण्यांत जन्मलेली होती. डॉक्टरीच्या पुढच्या पदव्या मिळविण्याकरितां विलायतेस निघालेल्या मुलास इतपत बायको मिळणें म्हणजे कांहीं आश्चर्य नव्हे. आश्चर्य हें कीं, मला ती कधींच आवडली नाहीं. बायकोला छळण्याइतपत मी असंस्कृत मात्र नव्हतों. उलट जिच्याविषयीं मला मुळींच आवड नाहीं, ती सर्वस्वी मजवर अवलंबून आहे व माझ्या आराधनार्थ झटते, हें मनांत येऊन माझाच गुप्त छळ होई आणि माझी तिजविषयींची नावड वाढे.

मला बायको आहे हें आठवलें म्हणजे मला कसेसेंच होई. पण तिला—म्हणजे अर्थात मलाहि—एक मुलगीहि आहे हें मला आठवतच नसे. ती बाळंतपणाकरितां माहेरीं गेली असतां माझें विलायतेस जाण्याचें घाटत होतें.

तिची इच्छा मीं जाणें थोडें पुढें ढकलावें अशी होती. आपण अंथरुणावर असतां नवरा परस्पर इतक्या दूर जाऊं नये हें तिचें. म्हणणें रास्तच होतें. मी मात्र घाई करीत होतों. खरें सांगावयाचें म्हणजे बंदरावर पोंचवावयास येणाऱ्या मंडळींत माझी बायको नसावी अशी माझी गुप्त इच्छा होती.

अखेर मीं माझेंच म्हणणें खरें करून विलायतेस प्रयाण केलें.

इंग्लंड, स्कॉटलंड व ऑस्ट्रिया या तीन देशांतील विद्यालयांत मिळणाऱ्या शक्य तेवढ्या पदव्या मिळविणें, डोळे, कान व घसा यांच्या चिकित्सेंत प्रावीण्य मिळविणें व तिकडील रुग्णालयांत कांहीं दिवस अनुभव मिळविणें इतका कार्यक्रम डोळ्यांपुढें ठेवून मीं हिंदुस्थानचा किनारा सोडला. माझी माझ्या विषयाच्या व्यासंगाबद्दल व ज्ञानलालसेबद्दल आधींच ख्याति झालेली होती. युरोपांतील प्रख्यात धन्वंतऱ्यांच्या सान्निध्यांत उपकरणें, ग्रंथ वगैरेंच्या समृद्धीमुळें तर माझी ज्ञानतृष्णा अधिकच वाढली. माझ्या व्यासंगामुळें क्वचित् माझी चेष्टाहि होई. डॉक्टरमंडळींशीं मस्करी करण्यांत वस्ताद गणली गेलेली एक ऑस्ट्रियन नर्स तर मला म्हणे, " डॉक्टर, तुमचं बिंग कळलं मला ! तुम्ही निर्विकार म्हणून गर्व नका करूं ! तुमचं प्रेम रोगावर जडलं आहे ! "

तिचें म्हणणें खरें होतें.

यामुळेंच असेल कदाचित् — पण मला माझी बायको आवडत नसूनहि दुसरी स्वकीय वा परकीय बायको करावी असें मी मनोराज्यांत देखील आणीत नसें.

अखेर माझ्या संकल्पाप्रमाणें चार-पांच पदव्यांची मिळून सोळा-सतरा अक्षरें नांवापुढें लावून, भरपूर एक तप युरोपांत काढून नाखुषीनें मीं हिंदुस्थानचा रस्ता सुधारला.

स्थायिक कोठें व्हावें याचा फारसा प्रश्नच नव्हता; कारण माझ्याएवढ्या ' स्पेशॅलिस्ट 'ला म्हणजे निदान मुंबईइतपत पुढारलेलें तरी शहर पाहिजे. मीं मुंबईसच स्थायिक व्हावयाचें ठरविलें. रुग्णालय-स्थापना वगैरे प्राथमिक तयारी होतांच मीं मंडळीहि मुंबईस आणविली.

मंडळी ठरलेल्या गाडीनं आली. मंडळी म्हणजे बायको व मुलगी. माझी मंडळी आली, यापेक्षां ती ठरलेल्या गाडीनें आली, याचाच खरा आनंद मला वाटत होता. माझ्या कल्पकतेचें आणि यंत्रतुल्य व्यवस्थितपणाचें खरें रूप जरी माझ्या रुग्णालयांत दिसलें असतें, तरी घराचीहि व्यवस्था मीं इतकी ठेवली होती, कीं जणूं, गेलीं कित्येक वर्षे या ठिकाणीं बिऱ्हाड असावें. माझी बायको हें सर्व पाहून खूष झाली; पण यांत तिला आश्चर्य मात्र वाटणें शक्य नव्हतें, कारण तिला याचा पूर्ण अनुभव होता.

दोन दिवसांत मुलीला शाळेंत घालणें, बायकोच्या विचारानें एखादें गडीमाणूस ठेवणें एवढं उरकलें कीं माझा कार्यक्रम फिरून व्यवस्थित सुरू होईल अशी मला आशा होती. बोरीबंदरवर गाडींतून उतरतांच "कमल, छत्री विसरलीस काय ?" कीं असेंच कायसें ती म्हणाली. तेव्हां मला माझ्या मुलीचें नांव प्रथमच समजलें. सामान हमालजवळ देण्याच्या गडबडींतहि माझें लक्ष या नव्या कमलकडे गेल्याखेरीज राहिलें नाहीं. कसें कोण जाणें, कमल माझ्या अपेक्षेपेक्षां अगदींच निराळी दिसली. मी समजत होतों, ती आईसारखीच गोरी असेल. पण ती जवळजवळ माझ्याइतपत काळसर होती. नाका-डोळ्यांतहि ती कांहीं वेगळी दिसली. माझी तिच्या रूपाविषयीं अटकळ चुकली येवढेंच नव्हे, तर मी कमलला बायकोप्रमाणेंच उपेक्षूं शकेन हीहि माझी कल्पना खोटी ठरूं लागली. तिचे डोळे मोठे व पाणीदार होते; तिच्या भुंवया रेखीव, काळ्या-भोर असून त्यांच्यायोगें तिचें किंचित् उन्नत नितळ कपाळ उठून दिसे. तिचें नाक सरळ व तरतरीत असलें तरी डोळे व कपाळ यांवरच दृष्टि अधिक खिळे. तिच्या भुंवया, कपाळ व नाक या तिहींत कांहीं विशेष प्रमाण असावेसें वाटे. ती सुंदर वाटत नसे; पण लक्ष मात्र निश्चित वेधून घेई. कित्येकदां असेंहि वाटे कीं, काळीसांवळी असून ही इतकी आकर्षक कां बरें ? अथवा इतक्या आकर्षक बालिकेस याहून अधिक रूप कां नसावें, असें वाटे म्हटलें तरी चालेल ! ती माझी मुलगी म्हणून मला मोहक वाटली असेल असें समजण्याचें कारणच नाहीं. उलट, तिनें आपल्या गुणांनीं मला मोहिलें नसतें तर ती माझी असूनहि मीं कदाचित् तिजकडे तिच्या आईइतपतच लक्ष दिलें असतें. अगदीं रूक्ष म्हणून समजलीं जाणारीं माणसेंहि तिजविषयीं असाधारण कुतूहल दाखवीत. तिच्या मोहनीचा प्रभाव इतका हुकमी असे कीं, पूर्णोधाखेरीज तिजकडे कोणीं

दुर्लक्ष केलें असतें असें मला तरी वाटत नाहीं. आणि खरोखरच माझ्या एका, दोन्ही डोळ्यांनीं न दिसणाऱ्या पारशी ' पेशंट 'नेंहि इतरांप्रमाणें स्तिमित होऊन तिची चौकशी सुरू केली, तेव्हां मात्र मला आश्चर्याची परमावधि वाटली. पण याला कारण म्हणजे, मधाच्या धारेसारखा, कानावाटे थेट हृदयाचा ठाव घेणारा, विविध वृत्तींना एक प्रकारची गोड गुंगी आणणारा कमलचा आवाज. तिच्या आवाजांत अशी जादू होती कीं, तिच्या चेहऱ्यांतील मोहकतेच्या अभावीं ती नुसत्या आवाजानेंहि मन आकर्षू शकली असती. पण यामुळेंच कीं काय कोण जाणें ती अगदीं थोडें बोले. ' हो ' ' नाहीं ' यापलीकडे तिला कांहींच सांगावयाचें नसे व तेवढें ती मानेबरच भागवी. तिची मानेची भाषा समजण्यास तिच्या तोंडाकडे पाहावें लागे व पाहिलें कीं संत्रस्त होऊन ती डोळे मुरडी ! तसें पाहिलें, तर ती घाबरटहि नव्हती कीं लाजाळूहि दिसत नसे. कोणाच्याहि पुढें ती ताठ व ऐटींत उभी राही. परंतु नवीन माणसाशीं बोलणें म्हटलें कीं शरीराचा दुवान् दुवा निखळतो आहे असें तिला वाटे. पण या तिच्या स्वभावानें, नवीं माणसें कायमच नवीं राहत व तिला कधींच कोणाच्या वाऱ्यास उभें राहावेसें वाटत नसे.

आणि म्हणूनच तिला वेळींअवेळीं छेडण्यांत माझ्या कित्येक प्रेमळ ' पेशंट ' मंडळीस मोठी मौज वाटे.

माझा एक गुजराथी पेशंट तिला छेडीत असतां मी जवळच होतों. तो मोठ्या प्रेमानें प्रश्न विचारीत होता, तर ती शक्य तितकी टाळाटाळ करीत उत्तरें देत होती. त्याचें लक्ष मात्र त्या उत्तरांपेक्षां उत्तरें देणाऱ्या तिच्या तोंडाकडेच अधिक होतें. घाबरलेल्या सशाकडे अथवा अकारण बुजलेल्या वांसराकडे पाहतांना आपली जी वृत्ति असते, तीच वृत्ति अशा वेळीं तिजकडे पाहतांना होई. आणि नुसत्या पाहण्यापेक्षां तिला घट्ट पकडून ठेवण्याचीच इच्छा होई !

ती आपण होऊन बोले अशी फक्त आपल्या आईशीं. पण तेंहि, कोणी येतांच, विशेषतः मी येतांच थांबे. मी कित्येकदां आडून ऐकत असें. पण तिच्या

बोलण्याची तऱ्हा अशी विलक्षण असे कीं, स्वर तेवढे ऐकूं यावे आणि मतलब मात्र समजूं नये. जणूं अर्थबोध हें तिच्या बोलण्याचें ध्येयच नसे !

एवढें सांगणें म्हणजे ती मला आवडूं लागली होती हें कबूल करणेंच होय ! बायकोव्यतिरिक्त कोणाशींच मी तुसडेपणानें वागत नसें. तरी इतकी आवड अशी मला या प्रथम विचित्र पोरीविषयीं उत्पन्न झाली होती. अर्थात् कमलच्या बाबतींत माझ्या शास्त्रीय कल्पना व शिस्त यांचें काय होणार हा एक प्रश्नच होता. कारण कमलला कांहीं सांगणें हेंच एक दुर्घट काम; पटविणें तर अशक्यप्राय ! आणि तिजवर एखादी गोष्ट लादणें म्हणजे तर तिच्याहून मलाच अधिक दुःख झालें असतें ! तिला एखादी क्षुल्लक गोष्ट पटविण्याकरितां मी दहा महत्त्वाचीं कामें बाजूस सारूनहि वेळ घालविण्यास तयार असें—पण ती सांपडेल तेव्हां ना ?

तिच्या आईला तरी तिचें बोलणें कितपत समजे हें तिचें तिलाच माहीत. तिचे विषय म्हणजे, जे कधीं काळे कीं गोरे पाहिलेले नाहीत असे शाळेंतील मास्तर आणि वर्गातील मुली.

" देसाई मास्तर 'ना–हीं' म्हणाले आई ! " एकदम हातांतील पेटीचे सूर थांबवून त्यांहून गोड आवाजांत तिनें म्हणावें.

" काय कमल ? काय नाहीं म्हणाले ग ? "

" सब तेरे लिए...यमन कल्याण नाहीं आई !...आई, कपिलगौरी आमच्याच तुकडींत राहिली !... "

" कोण कपिलगौरी, कमल ? परवां दारांत मोटारींत थांबली होती ती का ? "

" अग ऽऽ ! " आईच्या अज्ञानाची कींव करीत कमलनें म्हणावें, " अग आई ! ती मणिबेन त्रिवेदी ! " आणि फिरून बोटांनीं यमन कल्याण उमटविण्यास लागावें.

ती बोलणें ऐके असें फक्त तिच्या शाळेंतील मैत्रिणींचें. त्या बोलत असतां ती जितकी अस्थिर दिसे तितकीच एकतान होई. त्यांचा प्रत्येक शब्द तिच्या चेहऱ्यावर जणूं ठसा उमटवीत जाई. कांहीं प्राण्यांस डोळ्यांनींच ऐकूं येतें म्हणतात. मैत्रिणींचें बोलणें ऐकणाऱ्या कमलकडे पाहून अशा प्राण्यांची

आठवण होई. बोलणाऱ्या मुखावर बद्ध झालेले तिचे नेत्र म्हणजे पिपासा व तृप्ति यांचें एकत्र चित्रच!

मला माझ्या शास्त्रीय शिस्तीचा कितीहि अभिमान असला, तरी कमल त्यांत बसणें शक्य नाहीं हें मला लवकरच कळून आलें. मी नकळत तिला मोकळी सोडीत होतों. साधी शाळेसारखी बाब पण त्यांतहि ती आपल्याच तंत्रानें वागली. मी तिजबरोबर दिलेल्या मनुष्यास तिला स्कॉटिश मिशन स्कूलमध्यें गुदरण्यास सांगितलें होतें. पण कमलचें चंदारामजी स्कूलमध्यें जाण्याचें केव्हां आणि कसें ठरलें याचा मला पत्ताहि लागला नाहीं. अखेर तिनें आपलेंच म्हणणें खरें केलें.

शाळेची जिथें ही स्थिति तिथें कपड्यालत्त्यासारख्या बाबींत तिच्या आवडीचा आम्हांला कोठून अंदाज येणार! एखादा जिन्नस फार हौसेनें घेऊन तिला द्यावा तो, ती असें तोंड करी कीं घेणारास आपल्या अडाणीपणाबद्दल शरमल्यासारखेंच व्हावें. तर उलट एखादे दिवशीं ती एखाद्या घेडगुजरी कापडाच्या शोधार्थ सबंध मुंबई पालथी घाली. शाळा, पुस्तकें, पातळें, खोलींतील चित्रें, मैत्रिणी – फार काय शिकवणीचे मास्तर – प्रत्येक बाबतींत तिची पसंती कांहीं स्वतंत्रच असे. दुसऱ्याच्या शहाणपणाला फारसा वावच नसे. कारण तिचें मत आम्हांस फारतर हास्यास्पद वाटे, पण आमची निवड तर तिला भयंकरच वाटे.



मी कमलचे वाटेल ते हट्ट पुरवीत होतों. इतकेंच काय, पण तिची मर्जी कळवून घेऊन ती संभाळण्यासाठीं झटत होतों. पण माझ्या बायकोची स्थिति मधल्यामधें किती चमत्कारिक झाली होती! मी इतक्या वर्षांनीं सातासमुद्रांपलीकडून – गोऱ्या बायकांच्या तावडींतून – जसाच्या तसा परत आलो याबद्दलच तिनें किती नवस फेडले आणि देवाला कितीदां अश्रूंचें स्नान घातलें हें तिचें तिलाच माहीत! माझा पुनर्जन्म झाल्यासारखा तिला आनंद होई. ती बोलत नसे, पण तिला काय वाटत होतें हें ब्रह्मज्ञानामागें लागलेल्या

माझ्या वडिलांपासून तों अडाणी मोलकरणीपर्यंत सर्वांना कळत असे. माझ्या या एका उपकाराची अंशतः फेड म्हणून ती माझा अबोला, यांत्रिक वृत्ति व या दोहोंमागें लपलेला तिरस्कार आनंदानें खपवून घेई. मला वाटतें, मी कसाहि वागलों तरी मजवर प्रेमसेवेचा वर्षाव करण्याच्या निश्चयानेंच ती मुंबईस आली असावी ! आणि मुंबईस येऊन पाहते तों तिची तपश्चर्या फळास आलेली. तिचा देव तिला पावला. निर्जीव मूर्तीला वाचा फुटली, दगडाचा देव नैवेद्य भक्षण करूं लागला, यंत्रासारखा तिचा पति एकदम बोलूं लागला — आणि तोहि तिच्या चिमुरड्या कमलमुळें ! तिला केवढी धन्यता वाटे ! तिच्या नजरेंत, हालचालींत, प्रत्येक पावलापावलांत कृतज्ञता भरलेली दिसे. पण काय उपयोग ? तिला वाटे "खुळी पोरगी ? हिला कधीं कळूं लागणार कोण जाणे ! 'त्यांचं' कांहीं ऐकत नाहीं — त्यांच्याशीं धड बोलत देखील नाहीं !" पण नुसतें वाटेच ! बोलण्याची सोयच नव्हती. बोलायचें म्हणजे कमलला ! आणि तिच्या मनधरणीकरतां तर मी मुक्याचा बोलका झालों होतों. कमल माझ्याशीं न बोलतां तिच्याशीं बोले हा तर ती जणूं स्वतःचाच अपराध समजे. एखादे वेळीं कमल तिच्याशीं लाडांत यावी आणि इतक्यांत मीं यावें. आणि मग कमलनें डोळे मोडून, कपाळाला आठ्या घालून पळावें ! अशा वेळीं तिची स्थिति काय विचारावी. तिला वाटे पोरटीला तरशी धरून ठेवावी ! कमलला पकडून ठेवली तरी तिचें बोलणें थोडेंच धरून ठेवतां येणार होतें ? धरून ठेवून माणसें बोलत नसतात; निदान कमलसारखीं माणसें तर खासच बोलत नसतात !

कमलला कळत तर कांहींच नसे. तिच्या वयाच्या मुलींना वास्तविक याहून कितीतरी समजूत असते. पण रूप नसून जशी ती मोहक होती तशीच कळत नसून हुशार होती. आणि म्हणूनच तिच्या या तऱ्हेवाईक अल्लडपणापुढें हात टेकावयाची वेळ येई.

माझें तिच्यावर प्रेमच होतें म्हणून तिच्या प्रगतीकडे लक्ष जाणें अपरिहार्य होतें. परंतु तिचा पालक किंवा पिता ही भूमिका मला केव्हांच सोडून द्यावी लागली होती. मी कसचा तिचा पिता ! ज्या गोष्टी मुलांना कित्येकदां अट्टाहासानेंहि शिकवितां येत नाहींत त्या मूळच्याच तिच्या अंगीं होत्या. खाणेंपिणें, शाळेंतील अभ्यास वगैरेंत ती स्वभावतःच इतकी नियमित होती,

कीं सुधारण्यासाठीं तिजवर नजर ठेवणारा, तिच्या नैसर्गिक गुणांवर लुब्ध होऊन आपलें ध्येय विसरे! ज्या क्षुल्लक गोष्टीबद्दल मुलें फाजील आवड दाखवितात व म्हणून कह्यांत ठेवावी लागतात, अशा बाबतींत ती इतकी संन्यस्त होती कीं, उलट नियंत्रणाची संधि शोधणारा मनुष्य तिच्या विरक्तीवर काय इलाज करावा याचा विचार करी. अशा स्थितींत माझी पित्याची भूमिका थोडी अनुकंपनीयच होती म्हटलें तरी चालेल. माया आणि निगा या बाबतींत तिला तिची आई पुरेशी होती. पुस्तकी शिक्षण शाळेंत होई आणि इतर शिकण्यासारखें असें तिला कांहींच नव्हतें. नाहीं म्हणावयास शाळेंतील तिच्या चित्रविचित्र अशा सख्यांकडून मात्र तीं कांहीं कांहीं शिके. मग माझ्याकडे 'एक प्रेमळ प्रेक्षक' याहून अधिक महत्त्वाची भूमिका कोणती येणार?

पण माझा उत्साह अनाहूत असला तरी अस्वाभाविक कसा म्हणतां येईल? साधी प्रयोगशाळा थाटावयाची तरी माझ्या अंगीं सृष्टिकर्त्याचा उत्साह चढे. बागेंतील झाडांनीं देखील माझ्या नकाशाबरहुकूम वाढावें अशी मीं उमेद धरावी. साधें गवत देखील माझ्या कल्पनेच्या दोरींत वाढलें तरच मला माझ्या शास्त्रीय कल्पकतेचें सार्थक वाटे. अशा स्थितींत माझ्या कमलचें कोमल रोप माझ्या हुकमांत वाढत नव्हतें म्हणून नव्हे, तर सर्व पुष्पांत रम्य असें जें मानवी पुष्प, त्याच्या विकासांत माझ्या बुद्धीचा कांहींच उपयोग होईना, म्हणून माझी निराशा झाल्यास अस्वाभाविक कसें?



कमल कितीहि स्वच्छंदी असली आणि मी तिच्या बाबतींत कितीहि मंत्रमुग्ध असलों तरी मधून मधून मी बापपणा गाजवींच. 'तिच्या'कडून का होईना, पण कमलला वळण लावण्याचा मी मधून मधून यत्न करीं. एक दिवस पाहतों तों ती खरखरीत खादीचें केशरी पातळ नेसलेली आणि अंगांत माझ्या ठराविक ख्रिश्चन शिंप्यानें बेतलेल्या रेशमी ब्लाऊजऐवजीं कसल्यातरी रेघा-रेघांच्या सोलापुरी कापडांचे दंडके! एखादे वेळीं पेटीवर कांहीं विचित्र चालीच ती घोटीत बसे. प्रख्यात चित्रपट आल्यास तो 'एक्सेलशियर'मध्यें असो कीं 'ऑपेरा हाऊस'मध्यें असो, मी मंडळींसह गेल्याशिवाय राहत नसें. पण कमल साफ नाकारी. आणि कुठल्यातरी भिकार हिंदी नाहींतर गुजराथी

चित्रपटांस अगत्यपूर्वक जाई. उपयोग होवो अगर न होवो, अशा वेळीं मी तिला थोडेंबहुत ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न करीं. कर म्हणून सांगितल्यास ती करीलच असें नक्की नसलें, तरी एखादी गोष्ट नको म्हटल्यावर ती बहुधा ऐके. पण तें इतक्या निर्विकार चेहऱ्यानें, कीं सांगणारा स्वतःस शहाणा समजत असल्यास त्याचें गर्वहरण व्हावें.

तिच्या आवडीनिवडी विचित्र असल्या तरी आक्षेपार्ह कधींच नसत. एकदोन गोष्टींचें मात्र मला कोडें वाटे. तिच्या कांहीं कांहीं मैत्रिणींबद्दल तिच्या-सारख्या मुलीला आवड कां असावी हें सांगणें कठीण होतें. उलट म्हणजे मला राहून राहून वाटे, प्रेमाच्या कित्येक माणसांशीं, विशेषतः माझ्याशीं, दुरावा कां ?

कमलला माझ्या राज्यांत सर्व माफ होतें. मला गंमत वाटे, ती ही कीं, प्रत्येक बाबतींत तत्त्वनिष्ठ, न्यायनिष्ठुर म्हणून गर्व वाहणारा मी, कमलच्या बाबतींत ... खरें म्हणजे एखाद्या गांवढळ वृद्ध बापासारखा शरणागत असें ! मग ' तिला ' तर किती नवल वाटत असेल याची कल्पनाच केली पाहिजे. मी इतरांशीं असा वागत नसें याचा अर्थ मी माणुसघाणा होतों असा मात्र नव्हे. नाहीं म्हणावयास एका माणसाचा मात्र अकारण तिटकारा येत असे. तो म्हणजे माझ्या एका विद्यार्थ्याचा. माझे येथील एका मेडिकल कॉलेजमध्यें कांहीं तास असत. अत्यंत हुशार पण विद्यार्थ्यांत विशेष न मिसळणारा म्हणून माझी ख्याति असे. तथापि माझ्याशीं ओळख होण्याइतपत ज्यांची पात्रता असे त्यांच्यावर माझा लोभ जडे, व त्यांना तर मी म्हणजे ठेवायला जागा नाहीं असें रत्नच वाटे. इतर विद्यार्थी कधींच माझ्या वाटे जात नसत. एकच विद्यार्थी या दोन्ही प्रकारांत न मोडणारा व म्हणूनच मला गूढ वाटणारा असा होता. तो म्हणजे भवानीशंकर जोग. मीं तिरस्कार दाखवितांच त्याच्या-सारखे उडाणटप्पू विद्यार्थी इतर डॉक्टर मंडळींच्या गळ्यांत पडून त्यांस लोक-प्रियतेची माळ मिळवून देत. पण हा जोग आपले गुण व माझा पिच्छा यांतून एकहि सोडीना. इतर अध्यापक मंडळींत माझ्याइतपत त्यास तिरस्कारानें वागवणारा कोणीच नव्हता. उलट तोच त्यांच्याशीं उर्मटपणें वागे. एरव्हीं कितीहि उडाणटप्पू असला तरी माझ्यापुढें मात्र तो फारच लीनता दाखवी. पण मला तो दृष्टीसमोरहि नको असे !

त्याचा वर्ण तजेलदार तांबुस काळसर होता. त्याचें नाक लांब, सरळ व ताठर दिसे. त्याच्या भुंवया जाड व खूप लांब दिसत. त्याला डोकें नव्हतें असें नाहीं, पण त्याच्या डोक्यांत 'काय चाललें आहे कोण जाणे' असें वाटल्याखेरीज राहत नसे. तो जाड काळ्या चौकटीचा वाटोळ्या भिंगांचा चष्मा लावी. तो एखाद्या भिंतीशीं अथवा बाकाशीं पाठमोरा रेलून नखें कुरतडत उभा असला म्हणजे एखाद्या बेकार इंजिनासारखा दिसे.

त्याला उद्योग असा कांहींच नव्हता. कॉलेजांत प्रवेशहि अंगच्या अथवा परीक्षेतील गुणांवर मिळालेला नसून वडिलांच्या असहकारितेंतील पुण्याईवरच मिळालेला होता. व्यासंग तर राहोच, पण त्याला नाद देखील कसलाहि नव्हता. तो नेहमीं अगदीं मागच्या बांकावर बसे व सिगरेट्स ओढी. वर्गांत सिगरेट्स ओढण्याचें ज्या अगदीं थोड्या मुलांस साधत असे त्या सर्वांत हा वेडर होता. माझे तास त्याच्या वर्गावर आठवड्यांतून दोन असत. त्या दोहोंसहि तो हजर असे, व पहिल्या बांकावर बसे. मला पाहतांच तो कॉलेजच्या आवारांत तर काय, पण सिनेमाच्या आवारांतहि हातांतील जळती सिगरेट तशीच्या तशी फेकून देई व आणली असल्यास टोपी देखील घाली.

या मुलाला कसा टाळावा हें मला मोठें कोडें होतें! ज्या अगदीं थोड्या—सुस्वभावी व बुद्धिमान्—मुलांना मी चाहत असें तीं देखील माझ्या घरीं क्वचितच येत व आलीं तरी फार वेळ बसत नसत. माझें बोलणें प्रेमळपणाचें व मोकळे-पणाचें असे. ज्यांस माझें बोलणें समजण्याइतकी पात्रता असे ते दिपून जात व ज्यांस कळत नसे ते गोंधळून जात. त्यामुळें आधीं मी ज्यांच्याशीं बोले असे थोडे व माझ्याशीं शंकावजा दोन शब्दांहून अधिक बोलेल असा तर कोणीच नसे. वर्गांतील मुलींकडे यत्किंचित्‌हि न बघण्याबद्दल मी कुप्रसिद्ध होतों. पहिल्या वर्षांतील नव्या मुलींत प्रथम माझ्याविषयींच चर्चा होई. कांहीं हुशार मुलींनीं मी अविवाहित असावा असा तर्क काढला होता. माझे विद्यार्थ्यांशीं वर्तन येणें-प्रमाणें असूनहि सदरहू भवानीशंकर माझ्या सान्निध्यांत येण्याची एकहि संधि सोडीत नसे. इतकेंच नव्हे, तर अनेक वेळां भ्रमिष्टासारखा माझ्या घरींहि येऊन बसे. कधीं कधीं मला त्यास 'जा' म्हणून सांगावें लागे व मग तो यत्किंचित्‌हि अपमान न मानतां चालता होई.

या उनाड भ्रांतिष्टाशीं तिटकाऱ्यापुरताहि संबंध न येण्यास काय करावें हें माझ्या कल्पक शास्त्रीय बुद्धीस कळत नसे !

माझें कॉलेजमधील काम दोनला संपे व फिरून चारपर्यंत मी कोठेंच बाहेर जात नसें. एक दिवस एका बड्या मारवाडी रोग्याची स्थिति भीतिप्रद असल्यामुळें मला कॉलेजवरून परस्पर त्यांजकडे जावें लागलें होतें, व त्यामुळें घरीं येण्यास मला चार वाजले होतें. बूट उतरविण्याकरितां मी कोचावर टेकलों. दिवाणखान्यांतून कमलची खोली दिसे पण कमल सहसा दिसत नसे. आज पाहतो तो कमल खिडकीच्या गजाला धरून एखाद्या निर्जीव चित्रासारखी उभी दिसली. राग-लोभाच्या रंगानें रंगल्यावर तिचा चेहरा कसाहि दिसला तरी ती एकटीच असली म्हणजे एखाद्या पुतळ्याप्रमाणें रेखीव व गंभीर दिसे. पण आज तिच्या चेहऱ्यावर एक प्रकारच्या बालिश कुतूहलाचं व तल्लीनतेचं स्वरूप स्पष्ट दिसत होतं. म्हणूनच मीं तिच्या समोरच्या गॅलरींत पाहिलें तों माझा सत् शिष्य भवानीशंकर ! काखेंत टोपी, तोंडांत सिगरेट व अंतराळांत दृष्टि अशा स्थितींत स्वारी गॅलरीला रेलून उभी ! एखाद्या सर्कसमधील वाघसिंहाकडे मुलं जशीं आश्चर्यानें, भीतीनें व कौतुकानें पाहतात तशी त्याच्याकडे पाहण्यांत कमल गढून गेली होती. इतका वेळ झाला तरी माझ्या येण्याचा ठिकाणा नाहीं म्हणून भवानीशंकरनें सिगरेटचा आश्रय केला असावा. माझ्या घरीं सिगरेट ओढतांना असं मीं त्यांस आजच पाहिलं. मी तसाच अर्ध्या उतरलेल्या पोशाखांत गॅलरींत गेलों व त्याजवर एक तप्त कटाक्ष फेंकला. प्रथम त्यास सिगरेट फेंकण्याइतपतहि भान नव्हतें. पण दोन सेकंदांत त्याच्या हातून ती गळूनच पडली. त्यानें ती झटपट उचलून खालीं, भरलेल्या रस्त्यांत, भिरकावली.

" कांहीं काम आहे माझ्याकडे भवानीशंकर ? "

" कांहीं नाहीं डॉक्टर ! "

" Don't waste your time then ! "

भवानीशंकर चालूं लागला. कमलची तंद्री मोडली.



कमल कितीहि नियमित असली, कितीहि हुशार असली तरी पोरच ती. तिच्या त्या रानपांखरासारख्या जीवनक्रमांतहि अधिक-उणें घडत नसे असें नाही. पण तें सुद्धां तिच्या त्या शाळेंतील मैत्रिणींच्या नादानें. चैत्र महिना सुरू झाला

होता. कमलची वार्षिक परीक्षा—ती आतां इंग्रजी चौथ्या इयत्तेतून पांचव्या इयत्तेंत जाणार होती—अगदीं नेटली होती. पहाटे उठून संस्कृत रूपे घोकणें वेळींअवेळीं मुली जमवून नफातोट्याचीं उदाहरणें सोडविणें वगैरे तिचे कार्यक्रम जोरानें सुरू होते. क्वचित त्यांचें शालेय राजकारण ऐकून माझी बरीच करमणूक होई. कोणत्या मास्तराकडे कोणता पेपर असेल यासबंधीं त्यांची चर्चा जितकी गंभीर होई तितकी गंभीर चर्चा पुढील वर्षाच्या मुंबई कॉर्पोरेशनच्या अध्यक्षाबद्दल नागरिकांनींहि केली नसती. आधींच उन्हाळा 'मी' म्हणत होता. त्यांतून कमल मुंबईचा उन्हाळा असा पहिलाच अनुभवीत होती. त्यांतच पुन्हा हळदीकुंकवांचीं गर्दी. मी 'ति'च्या करवीं कमलला परोपरीनें सांगितलें कीं, उन्हाळा, अभ्यास आणि हळदीकुंकू या त्रिदोषांनीं ऐन वेळीं प्रकृति हटकून बिघडेल. पण काय? उन्हाळा कोणाच्याच स्वाधीन नव्हे. हळदीकुंकवाला न गेल्यास 'मुली रागावतील!' आणि परीक्षा म्हणजे तर काय? प्रत्यक्ष प्राणाचाच प्रश्न! कमल आजारी पडणार हें सांगावयास माझ्याइतक्या पदव्यांचा डॉक्टर नको होता. केव्हां पडणार एवढाच प्रश्न. कमल म्हणे, "एवढी परीक्षा होईपर्यंत नकोरे देवा!" मी म्हणें, जितकी लवकर पडेल तितकी बरी. कारण प्रकृति जितकी जास्त ताणली जाईल तितकें दुखणें अधिक जोरानें येईल.

कमलची परीक्षा सुरू झाली. पहिला पेपर इंग्लिशचा होता. तो लिहून मधल्या वेळीं ती घरीं आली त्या वेळीं थोडी उन्हामुळें व थोडी परीक्षेच्या उल्हासामुळें ती इतकी लालसर टवटवीत दिसली कीं मी म्हणालों, बहुधा आतां चार दिवस सहज निभावतील व नंतर गांवींच धाडली म्हणजे विश्रांति व हवापालट मिळून पोरगी खास सुधारेल. ती दुसऱ्या पेपरला गेली व मी बाहेर व्हिजिट्‌करतां म्हणून गेलों. घरीं मी बऱ्याच उशीरां आलों. त्या वेळीं 'तिच्याकडून' मला समजलें कीं, कमलला थंडी वाजून आल्यामुळें ती दुसऱ्या पेपरमधून तशीच उठून आली. मी प्रथम थोडा चरकलों. पण त्याच्यांत अनपेक्षित कांहींच नव्हतें. मीं पाहिलें त्या वेळीं ताप बराच, जवळ जवळ चारपर्यंत होता. तरी साधा मलेरियाचा ताप—दुसऱ्या कोणा पेशंटचा असता तर दुरूनच पाहून क्विनाइनवर संपविलें असतें, इतका साधा!... पण माझ्या पोटांत मधेंच धस्स होई. कारण किती झालें तरी तें दुखणें आहे. एकांतून दुसरें निघायचें. त्यांतून पोर नाजूक!

दोन दिवस झाले. तापाचा जोर कमी झाला तरी अशक्तपणा व उन्हाळी हवा यामुळें कमलची तगमग होई. ' ती ' तर सारखी कमलजवळच होती. शिवाय माझ्या इस्पितळांतील एक दोन नर्सेसहि तैनातीस होत्या. मीहि इतर कामाची फिकीर न करतां वरचेवर पाहून जात होतों. कमल हैराण झाल्यासारखं दाखवीत नसे. तरी तिला आराम नाहीं हें सहज दिसे. त्यांतच परीक्षा अद्याप संपली नसल्यानें तिच्या मैत्रिणी तिच्याकडे येऊं शकत नसत. चौथ्या दिवशीं गुरुवारीं दुपारीं कमल बोलण्याइतपत बरी होती. मी कॉलेजमधून येतांच प्रथम तिच्या खोलींत गेलों. कमलच्या दुखण्यापासून मला एक फायदाच झाला होता म्हटलें तरी चालेल; आणि तो म्हणजे माझ्यापासून दूर पळणारी माझी कमल मला एकदाची ' सांपडल्या ' सारखी झाली होती. प्रेम थोडें स्वार्थी असतें हेंच खरें. माझें मन, रोज भुर्कन् उडून जाणाऱ्या कमलला अंथरुणाशीं जखडून ठेवणाऱ्या दुखण्याचे, नकळत आभार मानीत होतें हें खोटें नाहीं. मुलांच्या बारीकसारीक दुखण्यामुळें, माझ्याप्रमाणें इतर आईबापांसहि खास चोरून आनंद होत असला पाहिजे. वाऱ्यासारखी धांवपळ करणारीं, वडिलांचे शब्द पुरते ऐकूं येण्याइतपतहि जवळ न ठरणारीं मुलें त्याच शब्दांकडे दुर्लक्ष केल्यामुळें आजारी पडून बिनबोभाट मांडीवर डोकें ठेवूं लागलीं म्हणजे आई-बापांच्या घाबरलेल्या मनास देखील थोडासा दुर्लभप्राप्तीचा आनद नसतो असें कोण म्हणेल ? तरी कमल ' हरली ' असें मात्र नव्हे, कारण घाबरलों आम्ही. ती त्रस्त दिसली तरी दीन कधींच दिसत नसे. मी कांहीं बोललों तरी ती निर्विकार चर्येनें ऐकून घेई. औषध दिल्यास बिनबोभाट घेई. कांहीं हवेंहि म्हणत नसे, व नकोहि म्हणत नसे. पूर्वीप्रमाणें पळत तेवढी नसे.

तिला फारसा त्रास होत नसल्यामुळें व रोजच्याप्रमाणें ग्लानि अथवा झोंप नसल्यामुळें तिच्याजवळ बोलत बसण्यासारखें कुणी मनुष्य हवें होतें. म्हणून मीं कमलला म्हटलें, " तुला आज तापहि नाहीं व झोंपहि नाहीं. तुजजवळ कुणी बसूं दे का ? बोलशील का कमल ? "

कमल कांहींच बोलली नाहीं. तिनें एका कुशीवर वळून तिच्या ठराविक पद्धतीनें भुंवया थोड्याशा वांकड्या केल्या. मला अलीकडे तिची नेत्रपल्लवी समजूं लागली होती. तिच्या आतांच्या भ्रुकुटिभंगाचा अर्थ –

" बसूं द्या हवें तर ! " एवढाच होता.

" मी बसूं का कमल ? " मीं तिच्या कॉटवर बसल्याबसल्या तिच्या मानेखालीं उशी देत म्हटलें. मला उत्तर ठाऊक नव्हतें असें नव्हे, पण मुद्दाम थोडें चिडविण्याकरितांच म्हणालों.

कमल पायथ्याच्या भिंतीकडे पाहत राहिली !

" कमल, ' तिला ' बसूं दे का तुझ्याजवळ ? "

कमलनें एका ठराविक मोहक तऱ्हेनें होकारार्थी मान हालविली. तरी एकंदरांत विषय आटोपतां घेण्याची वृत्ति पूर्वीच्या नकारांत काय किंवा या होकारांत काय सारखीच होती.

" बरं, देतों बरं धाडून तिला ! " मीं कमलच्या उघड्या पडलेल्या खांद्यावर पांघरूण घालीत माझ्याकडे अथवा कोणीकडेच न पाहणाऱ्या तिच्या नेत्रयुगुलाकडे पाहत म्हटलें व मी तिच्या कॉटवरून उठलों.

" भवानी...शंकर..." मी उठतों न उठतों तों माझ्यामागून कमलचा वीणारवतुल्य आवाज ऐकूं आला. तिचा मूळचाच आवाज इतका मधुर असे, कीं आवाज ऐकण्याच्या गुंगींत मनुष्याचें अर्थाकडेहि दुर्लक्ष होई.

मीं झटकन् वळून म्हटलें, " काय कमल ? काय म्हणालीस ? " कमलचे नकार व निषेध ऐकण्यासहि उत्सुक असलेले माझे कान आज आपण होऊन उच्चारलेला तिचा पहिलाच शब्द ऐकत होते.

" काय कमल – बाळ ? "

कांहीं सेकंद कपाळाला आठ्या पाडून या कुशीवरून त्या कुशीवर होत कमल म्हणाली,

" भवानीशंकर आला आहे ? "

आर्जव करतां करतां समजली एकदांची कमलची इच्छा ! भवानीशंकर – कीं ज्याचें मला मुखावलोकनहि नको असे ! — पण त्याचा विचार करण्याच्या स्थितींत मी नव्हतों. एक क्षणार्धच का होईना ही विलक्षण इच्छा ऐकून मला हसूं आल्याखेरीज राहिलें नाहीं. तरी माझ्या आश्चर्यालाहि मी उद्गार दिला नाहीं. मग निषेध-नापसंती तर दूरच राहिली.

माझ्या मनांतील भवानीशंकरबद्दलचा तिरस्कार कमलला या वेळीं दिसतो कीं काय याची मला धास्ती पडल्यामुळेंच कीं काय, मीं घाईघाईनें म्हटलें, " आलेला नसला तरी आत्तां येईल ! बोलावणं धाडूं का त्याला ? "

फिरून कमलनें भ्रूभंगानेंच आपला नेहमींचा भाव उमटविला. " काय करायचें तें करा ! " हाच त्याचा अर्थ. आणि फिरून ती या कुशीवरून त्या कुशीवर झाली. काय अशक्त झाली होती कमल ! मीं नुसतें हात टेकतांच करकर वाजणारी कॉटची स्प्रिंग तिच्या सर्वांगाच्या हालचालीनेंहि वाजत नव्हती ! भवानीशंकरनें माझ्याकडे येणें टाकलें नसलें तरी तो अलीकडे कमी येत असे. कमलकरतां मीं कांहींहि केलें असतें हें जरी खरें, तरी भवानीशंकरला बोलावणें धाडून घरीं आणल्यावर त्याला फिरून तोडणें किती कठीण जाईल हें मी जाणून होतों. या अडचणींतून मार्ग काढण्याकरितां आणि त्यापेक्षां म्हणजे ही भारीच हास्यकारक अडचण कोणालातरी सांगून पोटांत न मावणाऱ्या हास्याला बाहेर फोडण्याकरितां मी घाईघाईनें 'तिच्या'कडे स्वयंपाकघरांत गेलों. त्या वेळची माझी घाई आणि बालिश उतावळेपणाची वृत्ति पाहून तिला आश्चर्य आणि हर्ष यांनीं एकदमच व्याप्त करून टाकिलें. यानंतरचीं पांचदहा मिनिटें मला अधिक आनंदाचीं गेलीं कीं तिला अधिक आनंदाचीं गेलीं हें सांगणें कठीण आहे. तरी मला वाटतें, निःपक्षपातीपणें सांगावयाचें झाल्यास तीं घटका तिच्या दृष्टीनें स्वर्गीय आनंदाची होती. आणि कमलच्या बालिश आवडी-निवडींनीं भरून वाहणारें माझें हृदयहि तिच्या त्या अपूर्व आनंदाला आंत वाट देऊं लागलें ! कशामुळें का होईना, अखेर ती माझ्या सुखाची एकमेव भागी-दार झाली याबद्दल तिला धन्यता वाटत होती, तर माझ्या कन्येचें कौतुक कथन करण्याला अत्यंत अनुरूप स्थान म्हणून मला माझी पत्नी प्रथमच 'प्रिया' या पदवीची अधिकारी वाटूं लागली. कमल आजारी असल्यामुळें आधींपासूनच वाटत असलेली चिंता, तिला थोडें बरें वाटत असल्यामुळें अंधुक दिसूं लागलेला आनंद, जी आपणांस प्रिय, तिला प्रिय असलेल्या अनेक हास्यकारक वस्तूंत ज्यास आपण उनाड समजतों असा एक अजब प्राणीहि आहे व आपलीं नेहमींची गंभीर तत्त्वें बाजूला सारून त्या प्राण्यास निमंत्रन आणण्याच्या विवंचनेंत आपण आहों, अन् त्यांत सहकार्य करण्याकरितां जिला सहचारिणी समजण्याचें आपण रोगजंतूंच्या प्रिय साहचर्यामुळें अनेक वर्षें विसरलों होतों, तिची

आपण याचना करीत आहों, वगैरे गोष्टी मलात्या वेळीं जर आजच्याइतक्या स्पष्ट दिसल्या तर मला वाटतें, मला माझें स्वतःचेंच अलोट हसूं लोटलें असतें ! पण त्या क्षणीं मात्र बालिशतेंत मी कमलहून कमी नव्हतों आणि वात्सल्यांत मीं कमलच्या आईसहि मागें सारलें होतें. अर्थात तिच्या सहकार्याविषयीं शंकाच नव्हती.

थोड्याच वेळानें भवानीशंकर गुरुपत्नीच्या आज्ञेवरून कमलच्या खोलींत कमलचीं आवडतीं गाणीं फोनोवर लावीत होता. दुखण्याची उतरती कळा, सायंकाळच्या समुद्राकडील शीतल वारा, आपल्या म्हणण्याबरहुकूम दाखल झालेला भवानीशंकर, आणि आपली आवडतीं ( वस्तुतः विचित्र ! ) गाणीं या सर्वांच्या मधुर संगमानें कमल आपल्या रुग्णशय्येवर अत्यंत प्रसन्न दिसूं लागली. प्रसन्नतेच्या अनिवार ऊर्मीनें तिचा नेहमींचा विक्षिप्त लाजरेपणा क्षणभर बाजूला सरकला. तिनें आपल्या आईकरवीं माझी चौकशी करण्यास सुरुवात केली. मींहि संधी साधून तिच्या प्रसन्नतेच्या या दुर्मिळ क्षणाचा फायदा घेण्यास कमी केलें नाहीं !

कमलच्या उशापाशीं बसलेलीं तिचीं मातापितरें, तिच्या रज्जूनें आज प्रथमच बांधलीं जात होतीं, याची जाणीव त्यांच्या प्रौढ मनालाहि त्या आनंदाच्या क्षणीं नव्हती. मग ती बालिश कमलला होण्यास तर कित्येक वर्षांचा अवकाश होता हें सांगणें नकोच.

कमल लांब पळत होती ती अखेर जवळ आली म्हणून मला आनद झाला. ती प्रेमानें जवळ होती पण गूढत्वानें आतां पूर्वीहूनहि मला थोडी दूरच वाटूं लागली ! माझ्या हृदयावर अधिराज्य करणारें तिचें छोटें हृदय मला आज पूर्वीहूनहि चमत्कारमय वाटत होतें.

पण अप्राप्य वस्तूवरहि प्रेम करणारे आपण धाडसी मानव, अज्ञेय वस्तूवर प्रेम करण्याला थोडेंच कचरणार ! ...

आणि कधीं कधीं गूढत्वाच्या सुवर्णमृगामागेंच मन अनिवार धांव घेतें...

छोट्या, वेड्या कमलवर विचार करतां करतां मला माझ्या शास्त्रीय ज्ञानाच्या मर्यादा ठळक दिसूं लागल्या !



आणि या आनंदमय तंद्रींतहि पाटमोऱ्या भवानीशंकरचा सगर्व आनंद माझ्या ध्यानांत आल्याखेरीज राहिला नाहीं. त्याला आज माझ्यापुढून चोरट्यासारखें निसटण्याचें कारण नव्हतें.

तो ऐटींत आपली कामगिरी बजावीत होता !



# २

## प्रेमाचा रखवालदार

मालतीच्या प्रेमाविषयीं मला मुळींच शंका नव्हती. पण मालतीच्या प्रेमाबद्दल मला भीति वाटत असे. ती सर्व जगावरच प्रेम करील कीं काय ही ती भीति होय. " जगावर प्रेम केलें तरी तुमच्यावरचें प्रेम कसें कमी होईल ? " असें मालती विचारी, त्याला मजजवळ उत्तर नव्हतें. इतकेंच नव्हे तर, " तुमच्याप्रमाणें जगावर प्रेम करणें कसें शक्य आहे ? " असें म्हणून मालतीनें माझें प्रथमस्थान मान्य केलें तरीहि मी कष्टी होत असें. मला माझ्या शेजारीं कोणीच नको होतें. हृदय ही एकापुरतीच जागा आहे !

पण माझ्या भीतीचा अगर प्रीतीचा मालतीवर काडीमात्र परिणाम होत नसे. तिच्या प्रेमाला पूर आला म्हणजे मला त्याला वाट द्यावीच लागे. आणि त्या प्रेमभराच्या वेळीं असेंहि वाटे, कीं मालतीला मजविषयीं वाटतें तें कुणालाच कुणाविषयीं वाटणें अशक्य आहे. अशा प्रेमसागरांत अथांग डुंबत असतां एके दिवशीं " तूं गेल्यावर आज दुपारीं चारला मी नाटकाला जाणार आहें ! " असें मी बोलून गेलों. मालतीचें माझ्याकडे येणें हा माझ्या दैनंदिन कार्यक्रमांतील प्रमुख भाग असे. ती येईपर्यंतचा वेळ तिची वाट पाहण्यांत व ती आल्यावर काय करायचें, काय बोलायचें हें ठरविण्यांत जाई; पण ती निघून गेली कीं

एकदम आंत-बाहेर अंधार पडल्यासारखें वाटे. रविवारीं ती लवकर येऊन गेल्यास तर दिवस कसा घालवायचा हा मोठाच प्रश्न असे. त्या रविवारीं असेंच होणार होतें म्हणून मीं नाटकाचा कार्यक्रम ठरविला होता. प्रथम मालती "नका जाऊं; मी नाहीं जाऊं देणार!" असें म्हणूं लागली. कदाचित् मीं तिकीट वायांहि घालविलें असतें; पण मालती दुपारीं दोन वाजल्यापासून संध्याकाळीं फार तर सात वाजेपर्यंत बसली असती. तरी पुढें निजेपर्यंतचा वेळ कसा घालवावा हा प्रश्नच होता; म्हणून मी टाळाटाळ करीत होतों. पुढें एकदम कांहीं तरी स्फुरल्यासारखें करून ती "मी येणार तुमच्याबरोबर!" असेंच म्हणूं लागली. ती आणि मी चुकून रस्त्यांत उभीं राहिलों तरी लोक अर्थपूर्ण हसत; मग थिएटरांत आम्ही शेजारीं दिसल्यावर तर लोकांना एका तिकिटांत दोन नाटकें पाहावयास सांपडलीं असतीं! पण मालतीपुढें 'नाहीं' म्हणणें मला शक्यच नसे. लडिवाळपणा, युक्तिवाद, घाई, परस्पर शेजारच्या नंबरचें तिकिट काढून आणणें यांपैकीं कांहींहि तिनें केलें असतें. अखेर मीं 'होय' म्हणतांच अंगावरील एक कोरा करकरीत पोशाख उतरून दुसरा कोरा करकरीत पोशाख चढविण्याकरितां ती घरीं गेली. मी तिच्या घरीं पोहोंचलों, तेव्हां साडे-तीन वाजले होते. तिला तिकीट मिळालें नसलें तर बरेंच झालें असें वाटून मीं प्रथम तिकिटांची चौकशी केली तों तिनें एक सोडून दोन तिकिटें माझ्या शेजारच्याच नंबरचीं माझ्यापुढें टाकलीं. मी म्हणालों, "दोन कुणाला?" मालती म्हणाली, "मास्तर येणार आहेत!"

हा मास्तर म्हणजे मालतीचा फिडल्-मास्तर होता. सूरत स्त्री-पार्ट्यांची, जातीचा पत्ता नाहीं, बोलणें चालणें जनानी, बोलण्यांत इंग्रजी शब्द व साहित्यसंगीताच्या गप्पा यांत कॉलेजच्या उथळ पोरांचें अनुकरण, — असा हा फिडल्-मास्तर मालतीला प्रिय झालेला होता. त्याचा तिला अभिमानहि वाटत असे. "मला जगांत दुसऱ्या दर्ज्याचें कांहींच मिळत नाहीं!" असा गर्व ती वाही.

माझा नाटकाचा आनंद मावळला. मालती आणि मी जगाला लाथाडूनहि नाटकाला गेलों असतों; पण मालती तर जगाला घेऊन माझ्याजवळ बसूं इच्छीत होती! अर्थात् ज्यांना आपल्या भावना समजत नाहींत, त्यांच्या भावना दुखवीत बसल्यास दुहेरी त्रास होतो, म्हणून मीं त्या दिवशींच्या आनंदावर

पाणी सोडून ठरलेला कार्यक्रम पार पाडण्याचें ठरविलें. थोड्याच वेळांत हा 'मास्तर' टांगा घेऊन आला. मालतीची तयारी झालीच होती. गालाला पावडर, पाठीवर वेणी, लुगड्याला गार्टर्स, अंगांत जॉर्जेटचा ब्लाऊझ, पायांत नरम स्लिपर, डोक्यांत फुलें, अशा थाटांत मालती टांग्यांत बसण्यास सज्ज झाली. मीं एक पाय टांग्यांत ठेवला होता, तोंच मालतीनें स्वतःच्या डोक्यांतील एक मपर्ण फूल माझ्या कोटाच्या कॉलरवर बसविलें.

मला धन्य धन्य वाटलें !

मालतीनें तर चुंबनच घ्यायचें बाकी ठेवलें होतें, असें तिच्या चर्येवरून दिसत होतें. मी टांग्यांत चढलों. आपणहि आपल्या आधुनिक प्रेमपात्राकरितां थोडें आधुनिक बनावयाचें असें ठरवून भीतभीत, भोंवतालीं पाहत धीर करून, मालतीला टांग्यांत चढतांना हात द्यायचा असें मीं ठरविलें. आणि मालतीच्या चढण्याला विलंब कां म्हणून पाहूं लागलों, तों आमच्या टांग्यामागें सायकलवर एक पाय चढवून सज्ज असलेल्या फिडल्-मास्तरच्या कॉलरवर आपल्या डोक्यांतील दुसरें फूल तितक्याच उत्साहभरानें चढवीत असतांना ती मला दिसली ! माझें रक्त जणूं गोठल्याप्रमाणें झालें. माझें मस्तक सुन्न झालें. मालतीवर रागावणें तर मला अशक्यच असे. मी अशा वेळीं जणूं स्वतःच्याच वैगुण्यामुळें किंवा दुर्दैवामुळें परम व्यथित होत असे. त्या मठ्ठ फिडल्-मास्तरच्या लक्षांत माझी अवस्था येणें कठीणच होतें ! मालती तर स्वतःमध्यें इतकी दंग, स्वतःच्या वर्तनाच्या योग्यपणाविषयीं इतकी विश्वासयुक्त असे कीं, आपल्याकडून कांहीं चुकत असेल असें तिच्या आनंदाच्या क्षणीं तरी तिला वाटत नसे. ती टांग्यांत चढून माझ्या शेजारीं झटकन् बसली. "इतके सिनेमे पाहूनहि तुम्हांला युरोपियन् 'एटिकेट' अद्याप अंगवळणीं पडला नाहीं ? 'लेडीज्'ना हात द्यावा लागतो बरं का ! पण तुमचे 'व्ह्यूज्' आड येत असतील !" मालती हें बोलतांना अर्थातच गाड्याघोडीं चुकवीत येत असलेल्या समोरील सायकल-स्वाराकडे सस्मित बघत होती.

आम्हीं नाटक पाहिलें. मी मालतीच्या शेजारीं होतों व फिडल्-मास्तर माझ्यापलीकडे होता. पदांतील लकबा, विनोदावर प्रतिविनोद, स्त्री-पात्रांच्या नेसण्यांतील दोष,—कांहींहि सांगतांना ती जणूं माझ्या पलीकडच्या फिडल्-मास्तर-पर्यंत कदाचित् पोहोंचणार नाहीं, म्हणून मान लांब करून बोले ! नाटकांतील

स्त्री पार्ट करणारा नेभळा, अस्पष्ट व अशुद्ध बोलणारा, एक जनानी पोऱ्या अधूनमधून पुढील रांगेतील स्त्रियांकडे पाहून डोळे मुरडी. अर्थात् सर्वांहून डोळ्यांत भरण्यासारखी मालतीच असल्यामुळें तिच्याकडे तो वरचेवर पाही, हें न सांगतांहि आमच्या लक्षांत आलें असतें ! व तें न सांगण्यांतच मौज होती. पण त्याच्या प्रत्येक नेत्रकटाक्षाला मालती माझ्या मांडीला चिमटा घेई व म्हणे, " पाहिलेंत ! "

नाटक संपल्यावर आम्हीं मालतीला घरापर्यंत पोहोंचविलें व मी घरीं जाऊन न जेवतांच झोपलों.

त्या दिवशीं मला अंग टाकतांच झोप लागली. पांच-सहा तास थिएटरमध्यें बसून, त्याचे आधीं मालतीशीं वादविवाद व शृंगारचेष्टा करून आणि शेवटीं मालतीच्या अनैसर्गिक वर्तणुकीवर विचार करून मी फारच दमलों होतों. नकळत मोह होणें ही गोष्ट शक्य आहे; पण तो मोह टाळणें, निदान अश्लाघ्य म्हणून दडविणें व अखेर दडपून टाकणें इतपत जिला करतां येत नाहीं, ती संसारांतच काय पण वेश्याव्यवसायांतहि सुखी होणार नाहीं. जिला एका पुरुषा-पुढें दुसऱ्या पुरुषाच्या प्रेमाला पात्र झाल्याची फुशारकी मारावीशी वाटते, ती पुरुषावर प्रेम करण्यास अपात्र होय !...

असा विचार करून डोकें तापलें असतांच थंडगार झुळकेनें मला झोप लागली; पण अद्याप दिवा मालवणें, अंथरूण टाकणें व्हावयाचें आहे या जाणीवेमुळें शांत झोप लागणें अशक्यच होतें. मला स्वप्नें पडूं लागलीं व दुपार-पासूनच्या स्त्रीचांचल्याच्या विचारामुळें असो कीं थिएटरमधील नटल्या मुरड-लेल्या स्त्रियांच्या दर्शनानें असो, मला एक स्त्रीविषयक स्वप्न पडलें.

त्या दिवसांत एक सुंदर विधवा माझ्या एका मित्राकडे दिलरुबा शिकण्या-करितां येत असे. त्या स्त्रीला एक वेळ लोहारकाम आलें असतें,—पण दिलरुबा आला नसता. ती शरीरानें पुष्ट होती. तिचीं हाडेंच मुळीं थोराड होतीं. ती विशेष उंच नव्हती, तरी शाळेच्या एका नाटकांत तिनें पुरुषवेष केला असतां, तिच्या वर्गातील मुलींना तिच्याविषयीं शृंगारभावना उत्पन्न झाल्या होत्या. ती धीट व उपद्व्यापी होती. दिवसांतून जितक्या म्हणून पुरुषांच्या गांठी घेतां येतील तितक्यांच्या गांठी ती घेई. " अमुक एक मनुष्य तरी निदान तुमची गांठ घेणें शक्य नाहीं ! " असें मीं तिला एकदां म्हटलें,

तर तिनें तो तिच्या घरीं येऊन बसला असतांच मला त्याच्या नकळत बोलावणें पाठविलें व मी गॅलरींत येऊन दाखल होतांच विजयी मुद्रेनें ती हसूं लागली.

आज ही स्त्री माझ्या स्वप्नांत आली होती. माझ्या स्वप्नाची अशी एक चमत्कारिक खोड असे कीं, ज्या स्त्रीविषयीं मला खरें प्रेम असे ती स्वप्नांत आल्यास मी तिच्याशीं शृंगारचेष्टा करीत नसें. किंवा शृंगार-भाव उत्पन्न होतांच अतीव भावनेमुळें मी एकदम जागाच होई. तर ज्या स्त्रियांबद्दल मला विशेष पर्वा नसे, किंबहुना ज्यांच्या रूपानें किंवा रूपाभावानें मी कधींच मोहित होत नसें, त्या स्वप्नांत येतांच मीं जागृतींत जे अनुभव अद्यापि घेतले नव्हते तेहि मी स्वप्नांत चटकन् घेऊन टाकीत असें !

या धीट उपद्यापी स्त्रीचें नांव विजया शेंडे. त्या दिवशींच्या त्या स्वप्ना-मुळें व त्याच्या आधींच्या मालतीच्या वर्तनामुळें माझ्या डोक्यांत एक नवीनच योजना आली. मालतीला कितीहि सांगितलं तरी तिच्या चांचल्यामुळें तिच्या प्रियकराला होणाऱ्या वेदनांची कल्पना येत नाहीं; आणि आपण प्रत्यक्ष सृष्टींत चंचल नसलों, तरी स्वप्नांत का होईना, एखाद्या चावट तरुणीशीं लघळपणा करूं शकतों. या दोन गोष्टींची सांगड घालून मालतीच्या डोळ्यांत अंजन घालण्या-करितां म्हणूनच मी विजया शेंडेशीं ‘ फ्लर्टिंग् ’ करायचें ठरवलें. अर्थात् अवकाश मजकडूनच होता. मीं थोडी अधिक तयारी दाखवितांच विजया मजकडे दररोज भरपूर शरीरशृंगार करून येऊं लागली. सुरुवात अर्थातच पुस्तकें मागणें, नंतर सभेंत बोलण्याच्या तयारीसाठीं मदत, धर्मार्थ नाटकांचीं तिकिटें खपविणें वगैरे अनेक मिषांनीं झाली. एकदां एका धर्मार्थ नाटकांत ती पुरुषवेष घेणार होती. मी चांगल्या नाटकासहि जाणें मुष्किल असे, तर अशा मूर्ख पोरींच्या नाटकाला जाणें तर अशक्यच होतें. ती मात्र “ तुम्हांला तीन रुपयांचें तिकीट घ्यायला लावीन तरच खरी ! ” अशी प्रतिज्ञा करून बसली होती. अर्थात् त्याकरितां तयारी करून, म्हणजे आकर्षक केशरचना, त्यावर भलीमोठी चाकासारखी वेणी, नखरेल पातळ, तोंडाला पावडर, हातांत रिस्टवॉच्, दंड उघडे वगैरे थाटांत माझ्यासमोर ती दीड वितीच्या अंतरावर खुर्ची घेऊन बसली होती.

“ युरोपमध्यें स्त्रिया इलेक्शनकरितां किंवा सार्वजनिक कार्याला मदत करण्याकरितां काय वाटेल तें करायला तयार असतात म्हणे ! ” विजया

विजयाच्या अपेक्षेनें म्हणाली.

मी पांचटपणाच करण्याकरितां बसलों होतों. " मग? तुमची तयारी कितपत आहे?" मीं लंपट चर्या करून विचारलें.

" तीन रुपयांच्या तिकिटाच्या किंमतीचा त्याग करण्याची तयारी आहे माझी!" विजया आपला भरदार गोल चेहरा ओवाळीत म्हणाली. तिच्या चकाकणाऱ्या गालांत या वेळीं अशी विलक्षण हालचाल झाली कीं या भागाला उद्देशूनच जणूं काय ती वरील शब्द उच्चारून गेली.

" तुमच्या स्त्रीत्वत्यागाचा थोडाफार स्वीकार करून तिकीट घेतल्यावर नाटकाला येण्याची तर सक्ती नाहीं ना?" मीं विचारलें. तिनें आपल्या हातांत काढून घेतलेल्या फुलांच्या वेणीशीं लडिवाळपणानें चाळे करीत म्हटलें, " संस्थेच्या दृष्टीनें तुम्ही नाहीं आलांत तरी चालेल; पण व्यक्तीच्या म्हणजे माझ्या दृष्टीनें तुम्हीं आलेंच पाहिजे!"

" तुमचें नाटक तर इथेंच मीं पाहिलें आहे!"

" नाहीं, तुम्हीं मला पुरुषवेषांत पाहिलें नाहीं!"

" मला नाहीं वाटत कीं तुम्ही पुरुषवेषांत अधिक चांगल्या दिसाल; आत्तांच तुम्ही अधिक मोहक दिसतां आहां!" मीं तिच्या गोऱ्या मनगटावरील घड्याळाच्या घाटाचें स्पर्शपूर्वक कौतुक करीत म्हटलें.

" पाहायचें आहे का मला पुरुषाच्या वेषांत?" असें म्हणून विजया माझ्य कोट अडकविलेल्या खुंटाळ्याकडे गेली. माझा ब्ल्यू-सर्जचा डबल-ब्रेस्टचा कोट तिनें इस्त्री न बिघडवितां काढून घेतला. अर्ध्या पाठीवर व एकाच दंडावर उरलेला पदर आवरून तिनें तो कोट अंगांत चढविला. वस्तुतः मी तिच्याहून आकारानें मोठा असूनहि तिला तो इतका दाट होऊं लागला कीं, बटन तुटतील म्हणून माझा जीव थोडाथोडा होऊं लागला. बटनांच्या काळजीनें कीं आंतील शरीराच्या मोहानें कोण जाणें, मी एकदम उठलों. विजयेच्या दोन्ही बाजूंवरून कोट नीट ओढून घेतला व छातीवरील सुरकुत्या साफ करीत बराच जोर करून मीं पहिलें बटन घातलें. विजया खूष होऊन हसत होती. सर्व बटन घालून होतांच मीं – अर्थात् सुरकुत्या साफ होण्याकरितांच!—विजयेच्या पाठीवरून हात फिरवला. " तूं यापेक्षां उंच असतीस तर मजा आली असती!" मी

स्वतःची उंची विजयेच्या उंचीला जोडून पाहत नकळत ‘ अगे ’ ‘ जागे ’ म्हणून गेलों.

विजया माझ्याशेजारीं उभी होती. माझा डावा हात तिच्या खांद्यावर होता. ती मजहून किती कमी उंच आहे हें पाहण्याकरितां मीं तिला जवळ ओढून गालाला गाल समांतर होईल अशा बेतानें उभी केली होती; तर माझ्याशेजारीं उभें राहण्यापेक्षां माझ्यासमोर उभें राहण्याचीच विजयेला अधिक इच्छा होती. त्या अपेक्षेनेंच ती मजकडे तिरपें पाहत होती. उंची मोजण्याचें विसरून मी बेभानपणें तिच्या मुखाकडे पाहत होतों व अंगाला अंग तर लागलेंच होतं –

अशा स्थितींत माझी मालती एकदम आंत आली! दार विशेष घट्ट लावलेलें नव्हतं. आणि बाहेर जनानी वहाणा पाहून कदाचित् मालतीनें पायहि न वाजवतां एकदम दार उघडलें असेल किंवा आमच्या धुंदीमुळें आम्हांस ऐकूं आलें नसेल !

आम्हांला त्या अवस्थेंत पाहतांच मालतीचा नूर एकदम पालटला. “ I don’t want to disturb you, चालूं द्या तुमचें; मी निघालें ! ”

“ मालती ! मालती ! ! ” मी दारांत आडवा येऊन म्हणालों, “ असें काय ? थांब. यांची तुझी ‘ इंट्रोडक्शन् ’ – ओळख – करून देतों ! ”

“ मला यांची आणि तुमची ओळख एकदमच पटली. मी जातें ! ”

मालती मुळींच थांबली नाहीं. विजया हसूं लागली. मी थोडा खिन्न पण तरीहि बराच आनंदित झालों. मालतीच्या दुःखांत मला तिच्या भावी सुखाचीं चिन्हें दिसूं लागली. मीं मुकाट्यानें टिकिटाचे तीन रुपये विजयेच्या हातांत ठेवले. तीहि आपल्या लज्जात्यागाची रोख किंमत मिळाली हें पाहून खुषींत निघून गेली !

त्या दिवसापासून मालतीला ताप येऊं लागला. घसाहि धरला होता तिचा. ताप इन्फ्लुएंझाचा होता; पण आजारी असल्याचें कळविण्याऐवजीं ‘ माझी गांठ पडणार नाहीं, मी आज मुंबईला जात आहें ! ’ असें मला तिनें कळविलें होतें. शिवाय या मनःस्थितींत तिची गांठ घेण्यांत अर्थ नाहीं असें पाहून मींहि दोन-तीन दिवस तिचें घर वर्ज्य केलें होतें.

या तीन दिवसांत अर्थातच मालतींतील दोष व त्यावर मीं योजलेला उपाय यावरच माझ्या मनांत विचार चालले होते. मी स्वतःला संत समजत नव्हतों व म्हणूनच दिसेल त्या मुलीशीं लोभ जोडणें हा अधःपाताचा मार्ग आहे हें मी जाणून होतों. मी संत होतों म्हणून नव्हे, तर पतित होण्याची भीति जाणून होतों म्हणूनच मी निश्चयपूर्वक संयम करीत असें; तर माल्ती पूर्ण पतन होईपर्यंत जागेंच न होणाऱ्या मंडळींपैकीं होती ! आणि म्हणूनच तिच्या पतनाच्या मार्गांत आपण क्षणिक पतन पत्करून कां होईना, आडवें पडायचें असें मला ठरवावें लागलें होतें !

माझें 'फ्लर्टिंग' अगदींच दुरून, निरपेक्ष व प्रयोगादाखल होईल, असें मी समजलों ! पण सोंग म्हणून केलें, तरी मनुष्य त्यांतच दंग होतो हेंहि माझ्या ध्यानांत आल्यावांचून राहिलें नाहीं. मालती आली नसती तर त्या दिवशीं काय झालें असतें ? सांगतां येत नाहीं ! कारण कित्येकदां सुंदर व लवाळ मुलींच्या बाबतींत मन चळलं असतां, माझ्या मनांत मालतीचें शंभर नंबरी प्रेम येऊन मी चरकत असें. पण त्या दिवशीं मात्र त्या उन्मादवतीचें तिरस्कारानें का होईना मुखचुंबन घेऊन मग तिला चालती करावी, असें माझ्या मनांत आलें असावें, असें मला अजून वाटतें !

पण मरेना का ती 'मतवाली' विजया ! मला त्याचें सुतक नव्हतें. मी आतां मालतीबद्दल चिंताग्रस्त झालों होतों. ती कांहीं अविचार करील काय ? मनाला कितपत लावून घेईल ? वगैरे विचारांनीं व्याकुळ झालों होतों. ती मुंबईहून चारपांच दिवस येणें शक्य नाहीं हें माहीत असूनहि मीं तिजकडे नकळत पाय वळविले. पाहतां तों दुसऱ्या मजल्याच्या खिडकींत अंगांत जर्सी घालून, गळ्याला स्कार्फ गुंडाळून मालती बसली होती. तिच्या चेहऱ्यावरील लाली पार निघून गेली होती. मला पाहतांच ती दीन, त्रस्त व तरीहि क्रुद्ध दिसूं लागली. मी वर गेलों. "माल्ती ! तूं तर इथेंच आहेस; मग मला कां बरें कळविलें नाहींस ? ..." मीं काकुळतीनें म्हटलें. मालतीला ताप नसल्यामुळें घरांतील मोठीं माणसें आपापले तुंबलेले उद्योग पार पाडण्याकरितां आजच बाहेर पडलीं होतीं. लहान मुलें अंगणांत खेळत होतीं.

"मला स्वतःलाच शिक्षा करायची होती !" माल्ती म्हणाली. या

दोन दिवसांत मालतीनें बराच विचार केला असावा असें मला या एका वाक्यावरूनच कळून चुकलें.

" मालती ! विचार केला म्हणजे बस् ! शिक्षा करून घेण्याचें कारणच नाहीं !" मीं गहिंवरून म्हटलें. मालतीच्या म्लान मुखावरून अश्रूंचे ओघळ वाहत होते.

" मालती, मालती ! मला तुला दुखवायचें नव्हतें; शिकवायचें होतें... तुझ्या हृदयाची सर कुठल्याहि गोऱ्या कातडीला असती, तर कशाला हवें होतें... ? "

मालतीच्या कष्टी चेहऱ्याकडे परम खेदानें पाहत, जर्सीमुळें लहान मुलाच्या हाताप्रमाणें खुटखुटीत व गोंडस दिसणारा तिचा हात माझ्या मांडीवर घेऊन मीं म्हटलें, " मालती ! आणि तरी औषधाकरितां हातांत घेतलेल्या त्या घाणीचीहि मला आज दुर्गंधी येत आहे ! मालती ! मला ती दुर्गंधी वाटेल हें ठाऊकच होतें. पण मालती, तुझ्या फाजील मोकळेपणाची मला भीति वाटते...तुला दुसऱ्याबद्दल प्रेम वाटलें तर मला जितकें वाईट वाटणार नाहीं तितकें, परवांचें दृश्य पाहून तुला कांहींच वाटलें नसतें, तर वाटलें असतं. आपला प्रियकर अन्य स्त्रीशीं तेंच बोलत आहें, तसाच हसत आहे, तसाच लाडांत येत आहे, हें पाहिल्यावर प्रेमांतील अनन्यता व धन्यता ती कोठें राहिली ? मी मत्सराला ' मत्सर ' समजायला तयारच नाहीं. मत्सर म्हणजे प्रेमाचा रखवालदार ! मत्सर म्हणजे प्रेमच !...तूं मला माझें म्हणून जें दिलेंस तें दुसऱ्याला देऊं लागलीस तर माझ्या प्रेमावर सुरी नाहीं का फिरली ?...दुसऱ्याचा द्वेष म्हणून नव्हे, तर माझ्या प्रेमाचें प्रेम म्हणूनच मी अशा वेळीं अंतकाळची किंकाळी फोडीन...आजवर जर अशा वेळीं मी थोडा थंड राहिलों असेन, तर केवळ ही माझी खरी मालती नव्हे ! खरी मालती म्हणजे प्रेम !...खरी मालती म्हणजे चांचल्य नव्हे !...प्रत्येक पुरुषापुढें पाझरणारा काम नव्हे !...याची मला परमेश्वराच्या अस्तित्वाहूनहि मनोमय साक्ष पटली होती म्हणूनच मी त्या मरणाहून मरणांतूनहि जीव धरून राहत असें ! ..."

" माझ्या राजा !..." मालतीनें आपल्या रुग्णमनोहर शरीराचा विळखा, पडल्यापडल्याच माझ्या कमरेला घालून म्हटलें, " राजा ! मला कळत

नसे रे !...आजवर चुका झाल्या...यापुढेंहि कदाचित् मी चुकेन...पण माझ्या प्रेमाखातर मला तूं क्षमा कर – नाहीं का करणार ?" मालतीनें स्निग्ध नेत्रांनीं माझ्या मांडीवरून माझ्या तोंडाकडे पाहिलें....मीं तिला शब्दांनीं क्षमा केली नाहीं. तिच्या ओठाला ओठ व हृदयाला हृदय भिडवून "तूं म्हणजेच मी ! 'जो तू हैं वो ही मैं हूँ' हें पुन्हा एकदां पटवून क्षमेची जरुरीच नाहीं हें पटविलें...!

३

# प्रेम आणि संन्यास

किस्से रखना दोस्तदारी, अय् नजीर
दोस्तसे भी दोस्तदारी उठ गयी ॥

श्रीधरचें नांव तरुण राजकीय कार्यकर्त्यांत सडेतोड वृत्ति आणि तर्कटीपणा यांबद्दल प्रसिद्ध होतें. प्रसिद्धि आणि प्रपंच यांचे पाश यांच्यापर्यंत पोहोंचूं शकणार नाहींत असें प्रथमदर्शनींच ज्यांच्याबद्दल वाटतें, अशांपैकींच श्रीधर हा एक कार्यकर्ता होता. पण बरींच वर्षे दूर ठेवली तर वृद्धपणीं देखील गळ्यांत पडण्याची तयारी प्रसिद्धिरूप वधू दाखविते ! अलीकडे अलीकडेच या नावडत्या वधूनें श्रीधरच्या गळ्यांत पडण्यास सुरुवात केली असली, तरी प्रत्यक्ष वधू मात्र त्याला आपल्या पाशांत ओढूं शकणार नाहीं, अशी त्याच्या सर्व मित्रांची दृढ श्रद्धा होती. श्रीधरचं जीवन मोठं गूढगंभीरच होतं !

आणि मित्रांचें मत बरोबरच होतें. श्रीधरचें मत आणि स्त्रियांचें मन यांत कांहींच साधर्म्य नव्हतें. निदान त्याच्या भोंवतालीं जमणाऱ्या स्त्रियांत व त्याच्यांत तरी कांहींच सारखेपणा नव्हता. तो मनानें व शरीरानें कडक होता, तर त्या या दोन्ही बाबतींत लवचिक व मृदु होत्या. सार्वजनिक जीवनाचा भार

साहूं पाहणारी स्त्री इतकी नाजूक असून चालणार नाहीं, असें श्रीधर चिडून चिडून म्हणे. एखाद्या परिषदेच्या प्रसंगीं जरा कुठें धांवपळ करावी लागतांच, एखादी गोरीगोमटी पुणेरी पोर लालबुंद होऊन घाम पुसूं लागली कीं, इतर कार्यकर्ते राजकारणांतून तात्पुरते साहित्यांत शिरत; तर श्रीधर अशा वेळीं जमदग्नीचा अवतार धारण करी; आणि चिडून निर्दयपणें म्हणे, ' म्हणे आम्हांला सार्वजनिक कार्य करायचं आहे! इथें कांहीं चैत्रांतलें हळदीकुंकू नाहीं ! '

श्रीमंत, सुशिक्षित आणि तालेवार मुलींशींहि तो असा रानवटासारखा वागत असल्यानें त्यानें स्त्रीलोभावर जय मिळवल्याचा गवगवा स्त्रियांनींच परस्पर करून टाकला असल्यास नवल नाहीं ! या बाबतींत त्याची वृत्ति काय होती, तो रूक्ष होता कीं प्रेमळ होता, कामुक होता कीं मंदकाम होता, संसारी वृत्तीचा होता कीं विरक्त होता, याबद्दल कधीं कधीं त्याचे कांहीं मित्र वाद करीत. पण मुळांत तो कसाहि असला तरी त्याच्या विचारांच्या आणि कर्तृत्वाच्या झपाट्यांत सर्वसाधारण स्त्रीचा तरी निभाव नाहीं, हें पुरुषांनाच काय, पण स्त्रियांनाहि अलीकडे कळून चुकलें होतें.

श्रीधरच्या राजकीय पक्षाच्या प्रांतिक निवडणुकींची गडबड सुरू होती. जहाल आणि मवाळ, डावे आणि उजवे असे तट पडले होते. श्रीधर डाव्यांतलाहि डावा होता हें सांगणें नकोच. आणि तरीहि निवडणुकींच्या वेळेपुरते उजवीकडून डावीकडे सरकणारे आणि श्रीधरहून जहाल भाषा बोलणारे जहाल कार्यकर्ते कांहीं कमी नव्हते. त्यांचा तो जाज्वल्य देशाभिमान आणि क्रांतिवाद पाहून श्रीधरला कधीं समाधान, कधीं अचंबा, तर कधीं उद्वेगहि वाटे; पण त्याच्या सरळ मनाची पहिली ऊर्मि मात्र समाधानाची आणि विश्वासाची असे. ' खरोखर कांहीं तात्पुरत्या कारणांनीं कां होईना, पण हे लोक अधिक क्रांतिकारक बनत असतील तर त्यांनाच अधिकाराच्या जागा घेऊं द्या ! ' अशी त्याची विचारसरणी असे.

शहरांतील वयोवृद्ध पुढारी श्रीमन्त भाऊसाहेब हे श्रीधरलाहि ओळखत व इतरांनाहि पूर्णपणें ओळखून होते. ते जुने असूनहि नव्याचे पुरस्कर्ते होते;

पोक्त असूनहि डावे होते; नेमस्त असूनहि जहाल होते; उजवे असूनहि डावे होते; वृद्ध असूनहि तरुण होते. आणि सर्वांत विशेष म्हणजे ते श्रीधरचे चाहते व हितचिंतक होते. त्यांच्या आग्रहानेंच श्रीधर निवडणुकीला उभा होता.

श्रीधरला मुख्य भीति त्याचा बालमित्र विश्वनाथ याची होती. पण हें म्हणणें देखील त्याच्या दृष्टीनें बरोबर होणार नाहीं. कारण, विश्वनाथनें पगडी फिरवून जहाल भाषा बोलण्यास सुरुवात करतांच त्याच्यांत 'इष्ट बदल' घडलासें वाटून श्रीधरनें पेढे वांटण्याचा विचार करावा, इतका श्रीधर सरळ मनाचा होता !

आणि विश्वनाथ ? ... त्याच्याविषयीं जेवढें कमी बोलावें तेवढें अधिक उचित ! कारण, अधिक बोलायचें तर त्याबद्दल पुष्कळसें अनुचितच बोलावें लागणार ! जहाल, विद्वान्, त्यागी, संयमी आणि मनमिळाऊ म्हणून तो प्रसिद्ध होता. साहित्यिकांत तो साहित्यिक होता; क्रान्तिकारकांत क्रान्तिकारक होता; वृद्धांत वृद्ध होता आणि तरुणांत तरुण होता. त्याला पाहून कित्येक कार्यकर्ते म्हणत, 'पाहा, आमच्या बाळासाहेबांत (विश्वनाथ लोकशाहीच्या युगांतहि 'बाळासाहेब' बनूं लागला असल्यास नवल नाहीं !) जी नम्रता, जो संयम आहे, तो श्रीधरभाऊंत नाहीं !'

श्रीधरनें विश्वनाथला निवडणुकींत पाठिंबा देण्याचें ठरविल्यानें त्याच्या हितचिंतकांत मात्र गडबड उडाली. ज्येष्ठ पुढारी श्रीमंत भाऊसाहेब हे तरी श्रीधरला सूचना देतील व विश्वनाथच्या ढोंगी डावपेंचांपासून त्याचा बचाव करतील, अशी सर्वांस खात्री होती. आणि त्यांची कल्पना खरी होती. विश्वनाथची निवडणुकीची हालचाल सुरू होतांच, आणि श्रीधर आपल्या उमद्या आणि सरळ स्वभावानुसार त्या हालचालींपुढें माघार घेत आहे असें दिसतांच, भाऊसाहेबांनीं श्रीधरला आपल्या जंगलीमहाराज रोडवरील प्रशस्त बंगल्यांत बोलावून घेतलें.

भाऊसाहेबांच्या बंगल्याला त्या भागांतील लोक अद्यापहि 'बिहारी पार्क' म्हणून ओळखत. त्यांचा प्रशस्त प्रासादतुल्य बंगला व त्यासभोंवतालची बाग, मूळ बिहारीलाल कुंदनमल या लाखोपति मारवाड्याची होती. त्यांच्या बंगल्यांत विलास आणि विरक्ति यांचें एक अपूर्व मिश्रण दिसून मौज वाटे. स्वतः भाऊसाहेब शुचिर्भूत, कडक व सनातनी वाटत; तर त्यांचीं मुलें-मुली

आधुनिकतेच्या विमानांतून अस्मानांत विहार करीत आहेतसा भास होई. ते वयानें पोक्त व मनानें खोल असले, तरी तरुण क्रान्तिकारकांशीं मनानें समरस होत.

त्यांच्या बगीच्यांतून मुठेचा थंडगार प्रवाहहि दिसे आणि घाटांवरील धगधगत्या चिताहि दिसत.

श्रीधरचे ते केवळ आजकालचे पाठीराखे नसून लहानपणापासूनचे आश्रयदाते व चहाते होते. राजकारणांत आणि तत्त्वाच्या प्रश्नांत श्रीधर हे वैयक्तिक ऋणानुबंध येऊं देत नसे. पण राजकीय मतांत जवळचे असून शिवाय भावनांनींहि जवळचे असल्यानें त्यास भाऊसाहेबांसंबंधीं एक प्रकारचा वडीलपणाचा धाक वाटे.

निवडणुकीच्या धांदलींत, श्रीधरला भाऊसाहेबांनीं त्या दिवशीं जवळ जवळ अंथरुणांतूनच बोलावून घेतलें होतं, म्हटलें तरी चालेल. सकाळीं सहालाच श्रीधर चहाहि न घेतां भाऊसाहेबांच्या बंगल्यावर दाखल झाला होता.

' श्रीधर, मीं तुला एका गोष्टींत सूचना देण्याकरितां मुद्दाम बोलावून घेतलं आहे. ' भाऊसाहेबांनीं प्रस्तावनेखेरीजच आणि चहाहि घेण्यापूर्वी, बोलण्यास सुरुवात केली.

' मला माहीत आहे तुम्हीं मला कां बोलावून घेतलंत तें. पण मीं स्वतः उभं राहावयाचें नाहीं असं ठरविलं आहे. मी विश्वनाथला पाठिंबा देणार आहें ! '

' विश्वनाथचीं मतें तुला माहीत आहेत ना ? '

' उलट तुम्हांला अद्याप माहीत नाहींत ना, असें मीच तुम्हांला म्हणेन ! ' श्रीधर आपल्या नेहमींच्या उत्साहानें म्हणाला, ' जर या निवडणुकीपासून विश्वनाथ थोडा अधिक क्रान्तिकारक झाला तर तें यश मी स्वतः निवडून येण्याहून अधिक असें समजेन. '

' श्रीधर, निवडणुकीनें उमटलेली क्रान्तीची लाल छटा निवडणुकीनेंच पुनः पुसली जाईल. विश्वनाथ तुझा मित्र आहे. विश्वनाथ बुद्धिमान् आहे. पण म्हणूनच, तुझा दुसरा एक मित्र या नात्यानें मी तुला त्याच्या आजकालच्या बदलत्या पवित्र्यासंबंधीं धोक्याची सूचना देत आहें. त्यांत आपल्या पक्षाच्या

बळाला तर धोका आहेच, पण तुझ्या स्वतःच्या राजकीय भवितव्यालाहि धोका आहे ... '

भाऊसाहेब हा गंभीर इशारा देत आहेत तोंच त्यांची कन्या प्रमिला चहाचा ट्रे घेऊन दिवाणखान्यांत आली.

गोरीपान, सशक्त, उंचीपुरी, धीट, ताठ प्रमिला पाहून श्रीधरनें आपली नजर गच्चीवरून दिसणाऱ्या, पर्जन्यकाळामुळें तुफान भरून वाहणाऱ्या मुठेच्या रक्तवर्ण प्रवाहाकडे वळवली. ज्या गोऱ्यागोमट्या श्रीमंत कन्यकांना त्यानें सार्वजनिक कामास उघड उघड नालायक ठरविलें होतें, त्यांतच प्रमिला होती. आपल्या कठोर अभिप्रायाची आठवण होऊन श्रीधरनें तोंड फिरविलें; पण जिचा त्यानें मागें अनेकदां तेजोभंग केला होता, ती प्रमिला मात्र त्याची नजर चुकवण्याचा मुळींच यत्न करीत नव्हती ! जणूं आपली लायकी नालायकी सार्वजनिक जीवनांत ठरायची नसून खाजगी जीवनांतच ठरायची आहे, असा तिला गर्व होता. निदान तिनें तो ट्रे तरी अशा थाटांत आणून ठेवला व निवडणुकीसंबंधीं प्रशस्तपणें गप्पा मारण्यास सुरुवात केली. ध्येयवाद व क्रांतिवाद यांची कड घेतली; श्रीधरवर भोळसरपणाचा व बुजरेपणाचा आरोप केला; स्वतःचे बेत सांगितले; कॉलेजच्या गप्पा काढल्या !

अशा विषयांत श्रीधर खरोखरीज बुजरा होता. त्यानें बोलणें आटोपतें घेतलें. भाऊसाहेबांनीं दिलेल्या सूचनेबद्दल त्यांचे आभार मानले व तेथून काढता पाय घेतला.

त्या सबंध दिवसांत श्रीधरला उलटसुलट इतके हितमंत्र मिळाले कीं, त्याचें तर्ककर्कश डोकेंहि पिंजून जाऊन पिकण्याची वेळ आली. बाहेर हिंडणेंच बंद करावें, म्हणजे लोक तरी भेटणार नाहींत, असें ठरवून तो टिळकरोडच्या बाजूला असलेल्या नव्या पेठेंतील आपल्या नित्रस्त कामाच्या खोलींत कोंडून घेऊन निवांतपणें बसून राहिला. सार्वजनिक जीवन हाच श्रीधरचा प्राणवायु असे. चर्चा, संघटना, सभा, वादविवाद चालू असतील तरच त्याचा श्वास चालू राहणार, नाहीं तर तो गुदमरणार, अशी स्थिति होती. पण जीवनांत

असे कांहीं क्षण येतात कीं, ज्या वेळीं आपल्या प्रिय गोष्टीच अंगावर येतात; आणि प्रत्यक्ष प्राणवायूपासूनच आपणाला दूर पळावेंसें वाटतें.

कित्येक दिवसांच्या धांवपळीनंतर आणि आशानिराशेनंतर श्रीधरहि आज अशाच क्षणांचा अनुभव घेत होता. वाचनांतहि त्याचें मन रमत नव्हतें. त्याच्या त्या मागासलेल्या वस्तीच्या भागांत पुणेरी वाहनांचा खडखडाट वा पुणेरी वनितांचा किलबिलाटहि ऐकूं येत नव्हता. तेथून मुठेचें अडमुठें आणि अवखळ पात्र मात्र दिसत होतें. पण त्याचाहि खळखळाट सौम्य होऊनच ऐकूं येत होता. कारण, श्रीधरचें निवासस्थान आणि नदी यांच्या दरम्यान नव्या पेठेलगतची ' हिंदु स्मशानभूमि ' होती. असंख्य अर्भकांसमवेत पुण्याचा एक समाजतत्त्ववेत्ता जेथें महानिद्रा उपभोगीत आहे, त्या काळ्या वावरापलीकडे, नदीप्रवाहाकडे, टक लावून श्रीधर शांतपणें बसला होता.

आतां कोणीहि तेथें येण्याचा संभव नव्हता. सध्याकाळचे साडेसहा झालेले होते. एवढ्यांत श्रीधरच्या दारावर कोणीं हळूंच अंगुलीध्वनि केल्याचा भास झाला. परस्परविरोधी सल्ला देणाऱ्या सल्लागारांपैकींच कोणी आलसें वाटून श्रीधरच्या कपाळाला आंठ्या पडल्या. दार तर उघडलेंच पाहिजे ! अगदीं नाइलाजानें श्रीधर उठला.

श्रीधरनें दार उघडलें, आणि त्याच्या व्याकुळ आणि क्षुब्ध वृत्तींना वेगळें वळण लावण्याची ज्या एकाच व्यक्तींत शक्ति होती, अशी व्यक्ति जिन्यावरील अर्धवट अंधारांत अर्धस्मित करतांना दिसली. ती व्यक्ति म्हणजे श्रीधरची आवडती वेणू होती !

श्रीधरसारखा तडफदार, विद्वान् आणि सार्वजनिक कार्यांत सदा व्यग्र असा तरुण, वेणूसारख्या अबोल आणि अल्पशिक्षित मुलीशीं समरस झालेला पाहिला म्हणजे सर्वांनाच मोठें कोडें वाटे ! विशेषतः ज्यांच्या बुद्धिमत्तेला आणि पढिकतेला श्रीधरनें अनेकदां तुच्छ लेखलेलें असे, त्यांना तर जवळजवळ चीडच येई. पण श्रीधरला मूर्ख ठरविण्याची त्यांची छाती होत नसे. आणि ज्या तालेवार झगझगीत मुलींना त्यानें वाटेला लावलें होतें, त्यांना तर एकप्रकारचा सैतानी हर्ष होई. त्या म्हणत, ' अशा लोकांचें अखेर असेंच व्हायचें ! '

पण अद्याप ' झालेलें ' कांहींच नव्हतें ! श्रीधरसारखा ' बहिरीससाणा ' असा सहजासहजीं जाळ्यांत थोडाच अडकतो ? पण इतपत सामान्य मुलींशीं

श्रीधरसारखा अचपळ तरुण तासच्या तास बोलूं शकतो, यांतच त्याच्या मित्रांना स्वतःचा पराभव वाटे; तर त्याच्या मैत्रिणींना श्रीधरचा पराभव वाटे !

पण वेणू सामान्य होती कीं असामान्य होती हें ही मंडळी सांगूं शकली नसती. वेणूला अठरावें वर्ष असूनहि ती तेवढी दिसत नसे. कारण तिच्या वयाच्या मुलींचा शारीरिक उफाडाहि तिला लाभला नव्हता. ती अबोल व लाजाळू होती. ती बुद्धिमान् होती, पण तें बहुतेक कोणाला ठाऊक नव्हतें. ती प्रेमळ होती; पण इतक्या शालीन मुलीच्या प्रेमाला आजच्या संघर्षाच्या आणि 'संघटने'च्या युगांत कांहीं 'चान्स्' आहे, असें तिच्या अगर श्रीधरच्या मैत्रिणींचें मत नव्हतें ! फार काय, तिचा भाऊ नीलकंठ यानेंहि तिची साफ आशा सोडून दिली होती व शेवटचा इलाज म्हणून तिला आपल्या पार्टीच्या 'आक्कां'च्या स्वाधीन केली होती !

नीलकंठच्या आक्का म्हणजे एक बडें प्रकरण होतें. त्यांच्या जीवनांतील पुरोगामित्वाच्या पुरांत त्यांचें पूर्व जीवन पार धुऊन निघालें होतें. आक्कांनीं, केवळ राजकीय मतें जुळतात म्हणून व 'पार्टी'ला उपयोगी म्हणून, एका निर्गुण निराकार धनिकाशीं पुनर्विवाह केला होता. कोणी म्हणत, आक्का मूळ नागपूरकडच्या; तर कोणी म्हणत, आक्कांचे 'मिस्टर' नागपूरहून येऊन मुंबईस धंदा करूं लागले. पण खरा पत्ता कोणालाच नव्हता. सध्यां पुणें व मुंबई येथील एका क्रान्तिकारक व पुरोगामी पक्षाला या दांपत्याचा मोठा आधार होता, एवढें मात्र खास.

वेणूला आक्कांच्या स्वाधीन करण्यांत नीलकंठचा हेतु एवढाच होता कीं, तिनें थोडें अधिक धीट, प्रौढ बुद्धिवादी आणि पुरोगामी व्हावें ! तो म्हणे, 'हें काय ? एवढ्या तेवढ्यानें रडायचें ?...आईचीहि भीड, वडिलांचाहि धाक आणि कॉलेजमधील फाटक्या प्रोफेसरचेंहि दास्य ! असली ओली माती काय कामाची ! आक्काच हिला आकार देतील !'

आणि वेणू म्हणजे खरोखरच विधात्याच्या हातून अकालीं आणि अपुरा आकार मिळालेली ओली मातीच होती ! आधुनिक स्त्रीपुरुषांच्या मनावर अधिराज्य गाजविण्यासारखें तिच्यांत कांहींच नव्हतें. ती फर्ग्युसन कॉलेजमध्यें एफ्. वाय्.च्या वर्गांत होती. तिचे आईवडील मध्यम स्थितींतील व सनातनी असून त्यांचा जुना मोडकळीस आलेला वाडा शनवार पेठेंत नदीकांठीं होता.

घरांतील जुन्या वातावरणानें चिडून तिचा भाऊ नीलकंठ हा सहाव्या इयत्ते-पासूनच मार्क्सवादी अभ्यास मंडळांत ,' मनःशांति ' मिळवूं लागला होता! आणि आतां बी. एस्सी. च्या वर्गात गेल्यापासून तर तो जुन्या समाजाच्या व (स्वतःची ' पार्टी ' सोडून!) इतर पक्षांच्या जिवावरच उठला होता.

अर्थात् अशा ज्वलज्जहाल क्रांतिकारकांनाहि आपल्या वृद्ध आईबापांची केस असाध्य म्हणून सोडूनच द्यावी लागते! उरतां उरली बिचारी वेणू! अर्थात् तिची ' केस ' त्यानें त्वरित हातीं घेतली. पण जुनीं बहीण-भावंडांचीं नातीं आड येऊं नयेत म्हणून त्यानें तिला सर्व सांकेतिक संबंध ओलांडून ' मुक्तात्मा ' बनलेल्या आक्काबाईकडे सोंपविलें होतें.

सध्यां वेणूची प्रगति लग्न न करतां ' पार्टी 'चें काम करीत राहायचें असें ठरविण्यापर्यंत झाली होती. आणि तरीहि पार्टीच्या शिस्तीचा ती थोडा-फार भंग करीच! एक शिस्तभंग म्हणजे शनिवारीं ' शनिवार–मारुती 'च्या पायरीवर दिवा लावून ठेवणें; आणि दुसरा म्हणजे नीलकंठ ज्याला ' प्रतिक्रांति-कारक ' ही शिवी बहाल करी, त्या श्रीधरची अधूनमधून भेट घेणें!

वेणू येतांच आज श्रीधरची मनःस्थिति थोडी वेगळी झाली. एरव्हीं तो, नीलकंठ, आक्का आणि त्यांची शिस्त यांबद्दल थोडाफार तुच्छतेनें बोले व इतरहि गोष्टींची चर्चा करी. आज मात्र आक्कांची शिस्त, नीलकंठचें तत्त्वज्ञान आणि भारताचें भवितव्य यांपैकीं कोणताच विषय काढण्याचें श्रीधरच्या मनांत येईना.

' वेणू ' हाच श्रीधरच्या दृष्टीचा आणि अन्तःसृष्टीचाहि विषय झाला होता. वेणूचा वर्ण भिजलेल्या गव्हासारखा तांबूस-पिवळसर व टवटवीत होता. पण तिला गोरी म्हणतां आलें नसतें. तिचे केंस काळेभोर असून कपाळावर कलात्मक मेहेरप करणारे होते. पण त्यांत वैपुल्याचें वैभव नव्हतें. मुली तिच्या केसांची ' शेंडे आखूड ' म्हणून चेष्टा करीत. लालबुंद आणि गोऱ्यापान माने-वरील विपुल केशसंभाराच्या अरण्यांत जीं कामक्रोधादि श्वापदें पोसलीं जातात, त्यांचा उपसर्ग तिचें सौम्य रूप पाहून होत नसे!

तिचे डोळे काळेभोर होते, आणि तिची टवटवीत भयचकित चर्या, म्हणजे लहानसहान सुखदुःखांचें सूक्ष्म मापन करणारें नाजूक यंत्रच होतें.

या लाजऱ्या, भितऱ्या आणि हळव्या मुलीच्या चर्येवर, आज मात्र

थोडें धिटाईचें, आत्मविश्वासाचें तेज दिसत होतें. श्रीधर एक शब्द बोलण्याच्या आंत, किंबहुना बटन दाबून खोलींत प्रकाश सोडण्याच्याहि आधीं, तिला आज आपण श्रीधरच्या थट्टेचा अगर उपेक्षेचा विषय नसून चिंतनाचा विषय आहों, याची जाणीव होऊन चुकली होती.

'वेणू ! स्वार्थी आणि निर्दय जगाला तोंड देतां देतां थकलेल्या जीवाला आराम, तुझ्यासारखी साधीभोळी मुलगीच्च देऊं शकेल ! तुझ्या डोक्यांत हें अविवाहित राहण्याचं वेड कुठून शिरलं ?'

'आक्काची आज्ञा अन् पार्टीची शिस्त मोडण्याची मला इच्छा नाहीं; आणि शिवाय जगाशीं दोन हात करणाऱ्या तुझ्यासारख्या कर्तबगार माणसालाच काय, पण कोणालाहि आधार देण्याइतपत माझी लायकी आहे असं मला वाटत नाहीं. माझ्यापासून आईवडिलांनाहि सुख नाहीं, मग आणखी कुणाची गोष्ट कशाला ?'

वेणूच्या या आत्मनिंदेनं, स्वतिरस्कारानं आणि न्यूनगंडानं श्रीधर अधिकच व्यथित झाला. बाकीच्या जगाचें कुणाला ठाऊक, पण एका माणसाला तरी तूं खास आधार होशील, असें तिला तिच्या कोमल गात्रांवरून आणि ताज्या टवटवीत मुखकमलावरून हात फिरवीत सांगण्याचें त्याच्या मनांत आलें.

पण या साध्या आणि स्वाभाविक कृतीचा अर्थ काय झाला असता ? वेणूनं त्याचा अर्थ काय घेतला असता ? तुझ्यासारख्या कोवळ्या मुलीनें अशा भावनाशून्य, विधिनिषेधहीन संघटनेंत स्वतःला गाडून घेण्यापेक्षां लग्नमंडपाच्या आधारानं संसारवेल फुलवावी, एवढाच अर्थ तिनें घेतला असता असें नव्हे; 'तूं संसारांत प्रवेश कर' या संदेशाचा अर्थ, ती 'तूं माझ्या जीवनांत प्रवेश कर'......'माझा संसार मांड'...... असा घेईल, ही भीति श्रीधरच्या पोटांत होती.

आणि वेणूसारख्या प्रेमळ मुलींनीं 'घरवात मांडावी' अशी जरी त्याला मनांतून निश्चित ग्वाही मिळत असली, तरी आपल्यासारख्या माणसाला त्या घरवातीला सतत 'स्नेह' पुरवतां येईल कीं नाहीं, याची मात्र त्याला खात्री नव्हती.

श्रीधर आणि वेणू एकमेकांकडे न पाहतां कितीतरी वेळ त्या निःशब्द खोलींत बसून होते.

भावनाशून्य आक्का, विधिनिषेधशून्य पार्टी आणि वैतागलेला नीलकंठ-दादा या तिघांनीं तिच्या कोंवळ्या कुमारीहृदयावर घातलेली लिंपणें क्षणमात्र गळून पडूं लागलीं. आणि जिला संसाराच्या खस्ता खातांना सुखाचा विचार करण्यासहि फुरसत नाहीं, जी आपल्यावर प्रेम करीत असूनहि त्या प्रेमामुळेंच वेळीं-अवेळीं रागावते, अशा आईचें तिला स्मरण झालें. तिच्या वडिलांची घरांतील भूमिका मुलतानाची असे; पण त्या मुलतानीखालीं झांकलेली त्यांची देखिल व्याकुळता तिला आज दिसूं लागली.

माझ्या या एकंदर क्रान्तीच्या कार्यक्रमांत ही मंडळी सुखी होतील का? कीं नकळत मी त्यांच्या छळाला कारण होत आहे? लग्न न करण्याची प्रतिज्ञा ती परक्या मंडळींपुढेंच बोलून दाखवी; जे तिच्या लग्नाची चिंता अहोरात्र वाहत असे त्यांच्यापुढें ती व्यक्त करण्याची तिची छाती होत नसे. आईचा दुःखी आणि असहाय्य चेहरा पाहतांच, तिनें पार्टीच्या आक्काकडून मिळवलेलें चंद्रबळ पळून जात असे. आईचा दुःखी यातनामय संसार पाहूनच तिला आपणास 'हें' टाळतां येणार नाहीं असें वाटे.

आज श्रीधरचें मन 'आपण वेणूसारख्या सुकुमार कुमारीचा भार सहन करूं शकूं काय' याचा विचार करीत होतें:--

तर वेणूचें मन, 'ज्या कष्टमय आणि त्यागमय संसारपाशानें आपल्या आईला वेढून टाकलें आहे तो संसार आपण टाळूं शकूं काय, याचा विचार करीत होतें.

वेणूच्या गालांवरून अश्रुधारा वाहूं लागल्या. नेहमीच टवटवीत आणि आर्द्र भासणारी तिची त्वचा अश्रूंच्या जलानें भिजून खरीच ओली झाली, आणि अधिकच कोमल आणि स्पर्शमधुर वाटूं लागली.

आतां भावी जबाबदाऱ्यांचा विचार करण्याइतकें थंड दोघांपैकीं कोणीच राहिलें नव्हतें. त्या अजाण, बावरलेल्या व दुःखी मुलीला धीर देणें हें श्रीधरला राजकीय निवडणुकांहून अधिक जवळचें व अधिक खरें असें कर्तव्य वाटूं लागलें.

रुमालहि न शोधतां श्रीधरनें आपल्या धोतराच्या सोग्यानें वेणूचे डोळे पुसले. तिच्या काळ्याभोर, वळणदार, आर्द्र आणि सुगंधित केशकलापावरून

हात फिरविला. मायेनें तिला जवळ घेत घोगऱ्या झालेल्या आवाजांत तो म्हणाला,

' वेणू, तुझ्या त्या संघटना आणि तुझीं तीं अभ्यास-मंडळें यांचा खरोखर तुझ्यासारख्या जीवांशीं फारच थोडा संबंध आहे. राजकीय संग्राम करून जें सुख मिळवायचं, तें तूं स्वतःच आहेस ! निदान, इतिहासाच्या गर्भात असलेल्या त्या भावी सुखाचा चेहेरा तुझ्यासारखा आहे, एवढं तरी खास ! आणि तूं मात्र...'

वेणूला या वेदांताचा अर्थ कळण्याइतपत बुद्धि होती पण शुद्धि नव्हती. पण वेदान्त आणि त्यांत सूचित असलेली प्रशंसा न कळतांहि तिला आनंद होत होता. हें सारं जाणण्याची स्त्रीला एक नैसर्गिकच शक्ति असते. आणि त्यांतून वेणू तर एक भाविक युवती होती !

दुसरे दिवशीं सकाळचीं दैनिकें पाहून श्रीधरला बोधच होईना. त्याला जे धीर देत होते त्यांची संख्या पाहतां विश्वनाथनें निवडणुकींतून काढता पाय घेणें जरूरहि होतें आणि स्वाभाविकहि होतें. पण वृत्तपत्रांत मात्र वेगळाच नूर दिसत होता. " विश्वनाथ भल्याभल्यांचा पाठिंबा असल्याखेरीज निवडणूक लढवील काय ? आणि ज्यांनीं माझा पुरस्कार केला आहे—नव्हे विश्वनाथाला मी निष्कारण आधार देत आहें म्हणून मला दोषहि दिला, त्यांच्याखेरीज ' भले ' अगर ' बलिष्ठ ' असे कार्यकर्ते तरी कोण ?...

...कीं विश्वनाथ अहंकाराच्या आहारीं जाऊन उगीच हसं करून घेत आहे ? असें असल्यास बिचाऱ्याला वस्तुस्थितीची जाणीव देणें माझेंच काम नाहीं का ?..."

या विचारासरशीं श्रीधरनें पोशाख केला. सायकल बाहेर काढली व भाऊसाहेबांच्या ' बिहारी पार्क 'ची वाट धरली. लकडी पुलावर बिहारी पार्ककडूनच येणारे एक दोन कार्यकर्ते त्यास भेटले. ते त्याचे स्नेहीच होते ( आणि श्रीधरचे स्नेही नव्हते कोण ? ) त्यांच्याकडे त्यानें एकंदर वातावरणाची चौकशी करण्याचा यत्न केला. त्यांचीं उत्तरें मोकळेपणाचीं येईनात. विश्वनाथ उभा आहे, इतकेंच नव्हे, तर तो खास निवडून येणार असेंहि लोक म्हणतात,

असा त्यांच्या बोलण्याचा एकंदरीनें रोख होता. श्रीधरनें त्यांच्या अज्ञानाची मनांतून कींव केली. इतकेंच नव्हे, तर विश्वनाथानें व्यर्थ खर्च आणि हसें करूं नये, अशी अप्रत्यक्ष सूचनाहि देण्यास तो चुकला नाहीं. त्याचे व विश्वनाथाचे ते दोघे मित्र त्याच्या या प्रामाणिक सल्ल्याबद्दल आभार मानून शहराच्या दिशेनें गेले व श्रीधरनें जंगलीमहाराज रोडवरील बिहारी पार्ककडे आपली सायकल वेगानें हांकली.

तो तडक बिहारी पार्कच्या दरवाजापाशीं दाखल झाला. दारावरील गुरख्याजवळ चौकशी करतांच भाऊसाहेब घरीं असल्याचें कळलें. तो तडक त्यांच्या बसण्याच्या दिवाणखान्याकडे गेला.

भाऊसाहेब एकटे होते आणि मोकळेहि होते. त्यांच्याकडे नुकतेंच कोणी येऊन गेल्यासारखेंहि दिसत होतें. दिवाणखान्याच्या मध्यभागाच्या गोल मेजावर चहाचा ट्रे अद्याप तसाच पडला होता; सिगारेटकरतां असलेलें रक्षापात्र शिगोशीग भरलें होतें. त्यांत चांगली दोघांतिघां 'पट्टीच्या ओढणारांनीं' भर घातलेली दिसत होती !

भाऊसाहेबांनीं श्रीधरचें स्वागत केलें; पण त्यांत जिव्हाळ्यापेक्षां जिकी-रीची भावनाच अधिक होती. भाऊसाहेब दमले असतील काय ? आपण अवेळीं आलों काय ? वगैरे शंका श्रीधरच्या मनांत क्षणभर येऊन गेल्या. अखेर त्यानें आपल्या नेहमींच्या स्वभावाप्रमाणें, पाल्हाळ न लावतां मुख्य विषय काढला.

'मला वाटतें, विश्वनाथला खऱ्या परिस्थितीची, बलाबलाची पुरेशी जाणीव नसावी. नाहींतर त्यानें माघार घेतल्याचें आजच्या वृत्तपत्रांत जाहीर करावयास हवें होतें. मी स्वतःच जाऊन त्याला खरी स्थिति समजावून सांगूं का ?' श्रीधरनें नेहमींच्या सरळपणानें प्रश्न केला व भाऊसाहेबांच्या सल्ल्याची अपेक्षा केली.

आज अनेक वर्षें त्यानें आदरानें अवलोकिलेला भाऊसाहेबांचा बुद्धिमान् करारी व सहानुभूतियुक्त चेहरा त्याला आजच पहिल्यादां भावहीन, निश्चयहीन आणि त्रस्त दिसला.

'भय' ही गोष्ट भाऊसाहेबांच्या सुदीर्घ हयातीला कधींच शिवलेली कोणीं पाहिली नव्हती. श्रीधर तर त्यास बेडरपणाचें कोठारच समजे ! पण एक अर्धक्षण कां होईना, भाऊसाहेब चरकल्यासारखेहि दिसले.

सरळ माणसाला तोंड देणें ही एवढी अवघड गोष्ट असते तर एकंदरींत! आमच्या साताऱ्याकडचे शेतकरी कधीं कधीं म्हणतात—

"गांधीबाबा व्हाइसरायला भेटणार हाय्; पर व्हाइसराय सायबच नग म्हनतुया. गांधी म्हंजी नुस्ती आग हाय् आग! कंच्या येळला कंचा जबाब करील त्येचा पत्त्या लागायचा न्हाय् बगा!'

व्हाइसरॉयला गांधींची भीति वाटते म्हणणं वरकरणीं हास्यास्पद वाटतें, पण जबरदस्तांना कुणाची खरीखुरी भीति वाटत असेल तर ती सरळ आणि निर्वैर माणसांची! जबरदस्तांचा पराभव करण्याकरितां देव दीनदुबळ्यांची आणि नम्र माणसांची योजना करतो असें एका प्राचीन ख्रिस्तशिष्यानें म्हटलें आहे.

"God elects the meek to defeat the mighty."

सरळ मनाच्या श्रीधरपुढें भाऊसाहेबांची गाळण उडाली ती यामुळें! प्रत्यक्ष नाना फडणवीस जरी उलटतपासणीला बसला, तरी सुसंगत उत्तरें देऊन सत्य लपविण्याची हिंमत त्यांच्या अंगीं होती. त्यांच्या घरीं तीन पिढ्या वकिली चालत आलेली होती. ती उगाच नाहीं!

पण एका क्षणांतच मनांतील खळबळीला लगामांत आणून भाऊसाहेब म्हणाले,

'तूं विश्वनाथाची भेट घेऊं नको.' इतकें पाहून व ऐकूनहि श्रीधर म्हणाला,

'कां? कां नको?—मग तुम्ही तरी त्याला योग्य सल्ला द्या.'

'होय, मींच त्याला सल्ला दिला आहे व तो निवडणुकीस उभा राहा, म्हणून दिला आहे!' भाऊसाहेबांनीं विलंब न करतां सत्य बोलण्यासाठीं म्हणून जवळ होती नव्हती तेवढी पुण्याई खर्च केली! पण म्हणून, त्यांच्या त्या कधींहि दीन न दिसलेल्या चेहेऱ्यावर दैन्य दिसल्याखेरीज कसें राहील?

श्रीधरला स्वतःहूनहि भाऊसाहेबांचा अभिमान अधिक होता. स्वतः दीन होण्याचा प्रसंग आला असता तर त्याला जितकें वाईट वाटलें नसतें

तितकं त्यास आज भाऊसाहेबांचं दैन्य पाहून वाईट वाटलें. एका अशक्यप्राय गोष्टीवरहि त्यानें एका क्षणांत विश्वास ठेवण्याचें ठरविलें...

'होय, शक्य आहे. माझे बालपणापासूनचे पुरस्कर्ते व उभ्या पुण्यांत निर्भय म्हणून गाजलेले भाऊसाहेबहि असें दुटप्पी वर्तन आणि तें माझ्या बाबतींत करूं शकतील ! एवढेंच ना ? मी तें शक्यहि समजतों–आणि क्षम्यहि समजतों. माणसाच्या अंतर्मनाच्या कोपऱ्यांत दडून राहिलेली स्वार्थी भावना कधी कधी उसळी मारून बाहेर येते खरी !

एका क्षणाच्याहि क्षणांत श्रीधरनें भाऊसाहेबांच्या नजरेला भिडवलेली नजर आंतल्या दिवाणखान्याकडे वळविली व निश्चयानें आणि चलाखीनें विषय बदलला—

'आज प्रमिला दिसत नाहीं ?' ही चलाखी आणि हा 'ट्रॅन्स्फर सीन' न ओळखण्याइतके भाऊसाहेब कांही दुधखुळे नव्हते. त्यांनीहि रागरंग पाहून हांक दिली...

'प्रमील,–अगं प्रमील ! श्रीधर तुला हांक मारतोय् !' असें म्हणून ते आंत जाण्याकरितां अर्धवट उठलेहि. श्रीधरला आज आपली आठवण झाली, या जाणीवेनं अधिकच उत्फुल्ल आणि ताठ झालेली प्रमिला एखाद्या बनगाई-प्रमाणें धांवतच बाहेर आली.

कां कोण जाणे, श्रीधरच्या मनांत आज अचानक विचार आला,

'आमच्या विश्वनाथच्या आणि या प्रमिलेच्या जोडा छान शोभेल !'

·

श्रीधरचें उसनें अवसान ती बैठक संपेपर्यंतच पुरलें. दहापांच मिनिटें प्रमिलेचे अभिमानी आणि असंबद्ध प्रलाप ऐकण्यांत आणि वरकरणीं हंसण्यांत काढून श्रीधर तेथून उठला. त्याचा तो उत्साह त्याला जिन्याकडे तोंड वळवी-पर्यंत पुरला. जिन्याकडे वळून जिन्यावरील झरोक्यांतून मुठेच्या पात्राकडे व मुठाकांठच्या झाडीकडे पाहतांना त्याला एखादें सुरस आख्यान मध्येंच तुटल्या-प्रमाणें, एखादी मधुर आशा अकालींच खुंटल्याप्रमाणें वाटत होतें. नव्हे, त्याच्या त्या अस्फुट वेदनांचें कारण इतकेंहि स्पष्ट नव्हतें ! खोल, निर्जन असें नदीपात्र, त्यांतून निर्दयपणें पुढेंच पुढें धांवणारें तें क्रुद्ध रक्तवर्ण पाणी – हें

दृश्य पाहून त्याला सभोंवारच्या जीवनांत ज्ञानयुक्त अहिंसेपेक्षां अंध आणि अविवेकी हिंसेला अधिक स्थान आहे, असा क्षणभर भास झाला. भाऊसाहेबां-पासून तों विश्वनाथपर्यंत आणि श्रीधरपासून तों वेणूपर्यंत, विविध वृत्तींचीं माणसें म्हणजे अनिवार, अस्वच्छ आणि अनादि अशा एका प्रवाहांत सांपडलेलीं नदीकांठचीं झुडपें आहेत – असा क्षणभर भास झाला. जेमतेम अंग चोरून जीव जगणें हेंच फार तर, आपलें सर्व सामर्थ्य खर्ची घालून, ही मंडळी करूं शकतील. प्रवाहाला रुद्ध अगर शुद्ध करण्याचें काम त्यांचें नव्हे.

येतांना तो ज्या जिन्यावरून बालहरिणाप्रमाणें नाचत उडत आला, त्याच जिन्यावरून खालीं उतरण्याइतपतहि बळ आतां त्याच्या गलित गात्रांत नव्हतें.

निवडणुकींतील यशापयशाची त्याला पर्वाच नव्हती; पितृतुल्य भाऊ-साहेबांवर रागावण्याचाहि प्रश्न नव्हता. पण आपण सर्व विसरावयास तयार असूनहि यापुढें भाऊसाहेबांच्या आणि आपल्या संबंधांत अविश्वासाचा आणि चोरटेपणाचा एक वैरी कायमचा उभा राहणार काय ? आपण जेवढा विश्वास ठेवतों, तेवढा विश्वास ठेवण्याला मानवी जीवनांत जागाच नाहीं काय ? आणि मित्रांवरहि विश्वास ठेवायचा नाहीं म्हटल्यास जगण्यांत कांहीं राम आहे का ?

लकडी पुलावरून मंदगतीनें जात असतां त्याच्या डोक्यांत हेच विचार काहूर माजवीत होते. सायकल असूनहि तो पायींच हळूहळू चालला होता. आकाश आधींपासूनच भरून आलें होतें. एवढ्यांत टपोरे थेंब पडूं लागून पावसाची सरहि दाटून आली. घरीं जाईपर्यंत श्रीधर भिजून चिंब झाला. पण त्यामुळेंच त्याला जरा बरें वाटलें.

श्रीधरच्या कालच्या शब्दांवर आणि वर्तनावर वेणूनं रात्रभर तन्मयतेनं मनोमन विचार केला. अमर्याद आणि अनोळखी दुनियेंत क्रांति घडवून आणण्याकरितां, आक्कांच्या आज्ञाधारक सैन्यांत दाखल होण्याऐवजीं, प्रथम आपण स्वतःच्या जीवनांतच एक क्रांति करावी असें तिनें ठरविलें. ‘ मी हें करूं शकेन का ? आणि हेंहि करूं शकत नसेन, तर आक्कांचे हुकूम पाळणाऱ्या पायदळांतील एक निर्बुद्ध बाहुली, यापेक्षां माझी किंमत ती काय ? आईबाप माझा विवाह कोणाशीं तरी लावून देण्याचा यत्न करीत आहेत, तर आक्का मला अविवाहित राहण्याचा उपदेश करीत आहेत. दोघांचेंहि न ऐकतां मीं

श्रीधरलाच सुखी करायचें ठरविलें तर ? माझ्यामध्यें इतकी शक्ति आहे का ? पण माझ्यांत नसली तरी श्रीधरमध्यें ती खचित आहे. मला त्याचा आधार आहे; आणि त्याला माझा आधार होईल... '

आज वेणू अपूर्व उत्साहांत होती. भोंवतालच्या समवयस्क मुलींच्या इतपत शरीरशृंगार ती करीत नसे, अन् याबद्दल श्रीधर तिला कधीं कधीं छेडीतहि असे ...

' वेणू ! ,...तूं गोल नेसत नाहींस तें आई रागावेल म्हणून, कीं तुला स्वतःलाच आवडत नाहीं म्हणून ? पाठीवर वेणी सोडतेस, मग ती पदरानें झांकून कां घेतेस ? ' अशी उलटतपासणी श्रीधर अधून मधून करी; पण त्याचा हेतु तिनें नटावें असा नव्हता, तर दुसऱ्याच्या भीतीनें तिनें नटण्याचें सोडूं नये, एवढेंच सांगण्याचा होता.

आज वेणू ' इतर ' मुलींइतकी नटलेली व इतर मुलींइतकी धीट दिसत होती. श्रीधरच्या खोलींत प्रवेश करतांच त्यास आव्हानपूर्वक विचारायचें कीं, ' आज तरी मी भाऊसाहेबांच्या ' प्रमिल ' इतकी ' आधुनिक ' दिसते कीं नाहीं ? ' असें तिनें मनाशीं ठरविलें होतें !

मण मौज म्हणजे अशी कीं, आज वेणू फारच आकर्षक दिसत असली, तरी ' आधुनिक ' मात्र ती या जन्मांत तरी दिसेल कीं नाहीं, याची शंकाच होती ! अनेक पिढ्या कुलधर्म–कुलाचार पाळण्यांत जन्म घालविणाऱ्या वतनदार देशपांड्यांच्या देशस्थ घरांत तिचा जन्म झालेला होता. स्वतः कार्ल मार्क्स जरी तिच्या आक्कांच्या आणि नीलकंठदादाच्या मदतीला आला असता, तरीहि वेणूच्या अंतर्मनांतील भिडस्त भाविकतेचा भाग कापून काढूं शकला नसता !

खोलींत प्रवेश करतांच तिला श्रीधरच्या अंतःसृष्टींतील काहुराची चाहूल लागून तिच्या पोटांत चर्र झालें. जी धिटाई आपल्यांत नाहीं म्हणून श्रीधर वेळीं-अवेळीं बोल लावतो, ती धिटाई दाखवून आज श्रीधरला एक प्रश्न विचारायचा असें तिनें ठरविलें होतें.

' श्रीधर, जगाच्या सुखावर त्या दिवशीं एवढं व्याख्यान दिलंस, पण तुझ्या स्वतःच्या सुखाचं तूं काय केलंस ? तें सुख तूं कुणाकडून मिळवायचं

ठरवलं आहेस ? भाऊसाहेबांच्या प्रमिलेकडून कीं काय ?'

शेवटचा प्रश्न विचारतांना त्या भाबड्या आणि मर्यादशील मुलीच्या तिरप्या नजरेसहि एखाद्या सुरीची धार आलेली होती !

श्रीधरच्या मनांत आज सृष्टीच्या अंताचे भेसूर विचार थैमान घालीत असूनहि वेणूच्या या अभिनव अवतारानें तो क्षणभर गुंग झाला. डोक्यांतील अंतिम चिंतनावर पडदा टाकून तो म्हणाला,

'तुला वाटतें का मी प्रमिलशीं लग्न करीन म्हणून ?'

'करशील ! कां नाहीं करणार ? निदान ती तुझ्या जातीची – कोंकणस्थ आहे, हें तर खरं ? आणि भाऊसाहेबांचा जीव तुझ्यांत गुंतलेला आहेच.'

'भाऊसाहेबांचा जीव गुंतलेला' हे शब्द ऐकतांच श्रीधर फिरून आपल्या विषण्ण चिंतनांत मग्न झाला.

'काय, कसला विचार करतो आहेस श्रीधर आज एवढा ?' कधींहि आपण होऊन जवळ न जाणारी वेणू श्रीधरच्या कॉटजवळ जाऊन म्हणाली.

'वेणू ! मी प्रमिलकडूनदेखील संसारसुख मिळवीन एखादे वेळीं, पण तुझ्याकडून मिळवणार नाहीं !' हे शब्द उच्चारतांना श्रीधरची चर्या रक्तहीन आणि निष्करुण झाली होती.

वेणूला जणूं काळजांत कट्यार घुसल्याप्रमाणें झाले ! तिचें उसनें अवसान मावळलें. तिचा चेहेरा गोरागोरा झाला.

'श्रीधर, आज तुला काय झालंय् ? माझ्या बोलण्याचा तुला राग तर नाहींना आला ? तूंच काल म्हणालास, म्हणून मीं तरी विषय काढला !' वेणूचे भरून आलेले डोळे श्रीधरच्या चर्येवर खिळले होते.

'वेणू !–' हाताला धरून कॉटवर बसवीत श्रीधर म्हणाला,

'वेणू, माझें कालचें बोलणें कायमच आहे. तूं एखाद्याला सुखी करशील असें मी आजहि म्हणतों. पण तूं मला अथवा मी तुला सुखी करण्याचा यत्न करूं नये हेंच बरें !'

'श्रीधर, श्रीधर ! तूं आज असं काय बोलतो आहेस ?...माझा कशाचाच आग्रह नाहीं. माझा तुझ्यावर कसलाच हक्कहि नाहीं. पण तुझ्या आजच्या

बोलण्याची बरीक मला भीति वाटते. श्रीधर, तूं कुठं तरी निघून जाशील, अशी मला आज कशानं कोण जाणें, एकसारखी भीति वाटूं लागली आहे!'

त्या अजाण कुमारिकेच्या अंतर्भेदी अंतर्मनाचें गूढ सामर्थ्य पाहून श्रीधरला त्या अंधकारमय मनःस्थितींतहि थोडें कौतुक वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

श्रीधर जाणार कुठेंच नव्हता. पण ज्या मनःस्थितींत प्राचीन भारतांतील लोक अरण्यवास पत्करीत, त्या संन्यस्त मनःस्थितींत तो आज कित्येक तास होता. अनेक वर्षांचा पितृतुल्य आधार – अर्थात् भाऊसाहेब! – तो जर मला एका दिवसांत, माझी कांहींच चूक नसतां दुरावला, तर या दुनियेंत नाजुक नात्यांना आणि विश्वासानें एकमेकांनीं एकमेकांच्या खांद्यावर मान देण्याला कितपत अर्थ आहे? सारं खोटं आहे हें...आभास...आज मला वेणू आणि वेणूला मी जीवनाधार वाटूं. प्रलयकालचा वारा सुटला, पूर लोटला, धरणी दुभंगली, तरी आम्ही एकमेकाला बिलगूं असा विश्वास, हाच आमच्या आजच्या सुखाचा पाया. पण भाऊसाहेबांप्रमाणें वेणूचाहि आधार तुटण्याची वेळ आली, तर त्या वेळीं आधार कोणाचा आहे? आतां कशाची शाश्वति आहे?

आम्हां वासनांकित पामरांनीं एकमेकांचा 'एवढा' आधार घ्यावा, अशी परमेश्वरी योजना दिसत नाहीं...अशा दुनियेंत कदाचित् ध्येयवादी, शांततावादी आणि प्रामाणिक अशा माझ्या राजकीय पक्षापेक्षां, नीलकंठचा निर्दय आणि पापपुण्य न मानणारा पक्षच सृष्टिक्रमाला अधिक जुळता असेल काय?...

'वेणू, मी जात कुठेंच नाहीं. तुझ्या आक्कांच्या म्हणण्याप्रमाणें तूं अविवाहित जरी राहिली नाहींस, तरी निदान ज्या ठिकाणीं तुझा जीव फार गुंतला असेल...तिथें तरी वेणू...तूं संसार मांडूं नकोस. तुझ्या आईवडिलांच्या इच्छेप्रमाणें तूं जुन्या पद्धतीनें अनोळखी वराशीं विवाह कर; नाहींतर नीलकंठच्या पसंतीनें त्याच्याच पक्षांतील एखाद्या भावनाशून्य कार्यकर्त्याची सहचारिणी हो! पण वेणू...'

'श्रीधर! तुला हें आज एवढं वैराग्य कुठून आलं? जुन्या रूक्ष मंडळींना तर तूं नेहमीं हसतोस!'

'वेणू! वैराग्य आलं आहे हें खरं! पण त्यांचं वैराग्य आणि माझं वैराग्य एक नव्हे. त्या दोहोंच्या आशयांत अंतर आहे. ज्यांच्या मनांत अनु-

रक्तीच नाहीं त्यांची विरक्ति, आणि ज्यांच्या अनुरक्तीला या निर्घृण संसारांत स्थान नाहीं त्यांची विरक्ति यांत अंतर आहे! फार अंतर आहे! वेणू, भावी काळचीं काल्पनिक राज्यं कोणी कशींहि रंगवो, पण चालू दुनियेंत तरी प्रेमाच्या नशिबीं संन्यासच ठेवलेला आहे. जे संसारांत पडत नाहींत, ते संसाराचे द्वेष्टे असतात, असं तूं समजूं नकोस! उलट त्यांच्या सुंदर संसाराचं संगोपन करील असं छत्रच, —असं सुंदर समाज-यंत्रच आज तयार नाहीं!...'

अशा स्थितींत उशीरां, उतारवयांत आणि आशा अनावर झाल्यावर, विरक्तीची धडपड करण्यापेक्षां विवेकी पुरुषांनीं तारुण्याच्या ऐन भरांतच विरक्ति वरावी, असें मला वाटूं लागलें आहे.

'असंख्य प्रेमळांनीं वैराग्य वरल्याखेरीज भावी सुखी समाजाचा पाया घातला जाणें शक्य नाहीं.'

'मोठ्या सुखाची आशा करून मोठ्या दुःखाची तरतूद करून ठेवण्यापेक्षां, वेणू! तूं अल्प सुखालाच तयार हो, आणि व्यवहारी जीवनांत व्यवहारी माणसाचा हात धरून प्रवेश कर. तेंच अधिक हितकारी आहे...'

हा व्यवहारी वेदान्त ऐकण्याची वेणूची आज तयारी नव्हती. कारण मधुर भावनांच्या आतुर वातावरणांत सरळ हितोपदेश हा वेदांतासारखा अवघड वाटतो, तर काल्पनिक स्वर्ग हाच अधिक नजीक व सत्य वाटतो. श्रीधरचें बोलणें संपण्याच्या आंतच भिजलेले गाल पदरानें पुशीत वेणू बाहेर पडली.



बावरलेल्या मनःस्थितींत वेणू घरीं परत गेल्यावर श्रीधर एकटाच नदीकांठीं फिरत होता; लहानपणीं एका रूक्ष संस्कृत शिक्षकांनीं त्याला पाठ करावयास दिलेला वैराग्य-शतकांतील श्लोक आज अनेक वर्षांत प्रथमच त्याला एकाएकीं आठवत होता...

**कदा पुण्यारण्ये परिणत शरच्चन्द्र किरणः ।**
**त्रियामो नेष्यामो हरचरण चित्तैक शरणाः ॥**



४

# परमेश्वरा, त्यांना क्षमा कर !

मला आवडणाऱ्या व्यक्तींची आणि माझा मित्र कमलाकर यांची गांठ घालून देणें ही माझी एक आवडती कामगिरी असते.

माझ्या आवडत्या व्यक्तींत आज कित्येक वर्षें पंडित घनश्यामदास यांना फार मोठें स्थान आहे. माझ्या अनेक मित्रांना मी आजवर त्यांच्याकडे घेऊन गेलों असेन. आणि जेव्हां एखाद्या मित्राला पंडितजी माझ्याइतकेच प्रिय होतात, तेव्हांचा माझा आनंद अवर्णनीय असतो.

आणि माझी आवडती गोष्ट दुसऱ्या कोणाला आवडण्याहूनहि माझा मित्र कमलाकर याला आवडणें यांत कांहीं और आनंद असतो.

त्या दिवशीं मीं कमलाकर याला घेऊन घनश्यामदासजींच्याकडे जायचें ठरविलें होतें. मी गेलों तेव्हां पंडितजी खिडकीशीं लिहीत बसलेले दिसले. लांबूनच त्यांच्या चर्येवरील भावनांचे चढउतार स्पष्ट दिसत होते.

नशीब! मी गेलों तेव्हां त्यांच्या हातांतील कविता जवळ जवळ पुरी होत आली होती. औपचारिक बोलण्यांत फारसा वेळ न घालवतांच पंडितजींनीं आपल्या स्निग्धगंभीर आवाजांत ती नुकतीच जन्मलेली कविता वाचून दाखविण्यास सुरुवात केली.

मला त्यांची कविता पूर्ण आठवत नाहीं; पण तिचा भावार्थ पुढीलप्रमाणें होता :—

" जिच्यामुळें तो मृदु बनला ती मात्र कठोर होती; जिच्यावर त्यानें काव्य केलें तीं काव्याची द्वेष्टी होती.

जिच्या सौंदर्यामुळें त्यानें सौंदर्यनिर्मितीस प्रारंभ केला तिला सौंदर्याची पर्वा नव्हती.

तो काव्यदेवतेच्या हातीं लागला; पण काव्यदेवता मात्र त्याला ठकवून गेली ! "

मूळ हिंदी पद्याचा हा मीं मराठी गद्यांत अनुवाद केला आहे.

अर्थापेक्षां मी शब्दांत अधिक तल्लीन झालों होतों, आणि शब्दांहूनहि पंडितजींच्या उच्चारसरणींत अधिक दंग झालों होतों.

माझा मित्र कमलाकर तर पंडितजींच्या उत्कटतेमुळें आणि उन्मनस्कतेमुळें जवळजवळ भयभित झाला होता.

आजच्या थिल्लर आणि पोटभरू युगांत इतकी उत्कटता आणि इतकें गांभीर्य त्याच्या बहुधा प्रथमच दृष्टीस पडलें असावें. एखाद्या सिनेमा थिएटरमधील तिकिट-विक्रीच्या जागीं बमणाऱ्या मनुष्यास एकदम एखाद्या महंताच्या मठींत अथवा कडव्या मुसलमानाच्या मशिदींत नेऊन बसविलें तर त्याला ज्याप्रमाणें आपण मनुष्यलोकींच आहोंत कीं अन्यलोकीं आहोंत अशी शंका येईल, तशी शंका कमलाकरच्या चेहऱ्यावर दिसत होती. शेवटच्या दोन ओळी पुन्हा वाचून ...

" **नझारा जिसने दिखाया, वो खुद निकल गयी** "

या ओळींवर पंडितजी भाष्य करीत आहेत, तोंच जिन्यावर द्रुतगति पावलें वाजूं लागलीं व क्षणांत—अनुज्ञेची वाट न पाहतांच पक तरुणी आंत येऊन दाखल झाली.

पंडितजींचा विषय काय चालला आहे, पंडितजींकडे आलेला अनोळखी तरुण कोण ( मला तिनें पंडितजींकडे पाहिलेलें होतें, पण कमलाकरला आज ती प्रथमच पाहत होती ) याची तिळमात्र चौकशी अगर पर्वा न करतां शेजारच्या खुर्चीवर हातांतील मनी-बॅग टाकून तिने धापा टाकीत विचारलें,

" खाली सायकलला कंदील आहे तो राहील ना ?–कीं वर आणूं ? "

आमच्या या आश्रमांतून कांहींच जात नाहीं ! " पंडितजींनीं वरहि न पाहतां उत्तर केलें व आपलें भाष्य पुढें चालू केलें.

तरुणीनें आतिथ्याची वाट न पाहतां हक्कानें आमच्या शेजारचें स्थान पटकावलें आणि आमच्याहूनहि आस्थेनें ऐकण्यास सुरुवात केली. पंडितजींचें भाष्य चालू असतांच त्यांच्यापुढील भाष्यविषय झालेल्या त्या नूतन काव्याचा कागद तिनें ओढून घेतला, तल्लीनपणें वाचला, पंडितजींकडे एकदां अधीरपणें पाहिलें, एकदां आमच्याकडे धन्यतेनें पाहिलें आणि फिरून श्रवणास सुरुवात केली.

पंडितजींच्या प्रवचनाचा ओघ थोडा ओसरल्यावर कमलाकर त्या तरुणीचें लावण्य न्याहाळण्याइतपत भानावर आला.

त्या तरुणींत त्याला गोजिरवाणेपणा आणि हिंस्रपणा, प्रेमळपणा आणि बेपर्वाई, नाजुकपणा आणि कठोरपणा यांचें कांहीं चमत्कारिक मिश्रण आढळून येत होतें. निदान त्याच्या स्तिमित नजरेवरून मला तसें वाटत होतें. खरें पाहिलें, तर त्याला ती मोहक आहे, यापलीकडे त्या क्षणीं तरी अधिक कांहींच सांगतां आलें नसतें.

हो ! आणखी एक गोष्ट त्यानें निश्चित सांगितली असती – ती माकलीची सहृदय आहे ! पंडितजींचें भाष्य ऐकतांना तिचा चेहरा अभिज्ञतेनें आणि अभिमानानें फुलून गेला होता. आणि त्यांचा तो कवितेचा कागद समोर धरतांच तिचे डोळे पाण्यानें भरून आलेले दिसले !

तिच्या सहृदयतेविषयीं तरी वाद खासच नव्हता. आणि सौंदर्याबद्दल तर जन्मांधाखेरीज कुणीं वाद केला असता ?- -

ती उंच आणि कृश होती. तिचा वर्ण तांबूस गोरापान होता. तिचें अंग नाजूक आणि आर्द्र भासे. तिच्या चेहऱ्यावर आनंद आणि आर्तता यांचे आकर्षक पडदे विधात्यानें कायमचेच सोडले आहेत कीं काय असें वाटे ! म्हणजे ती उल्हसितहि दिसे आणि व्यथितसि दिसे.

ती अकारण आणि एकदम हसे, आणि हसतांना तिच्या शुभ्र,

मजबूत, घट्ट दंतपंक्तींना झांकण्यास अपुऱ्या पडणाऱ्या तिच्या ओठांपलीकडील तिच्या लालभडक हिरड्या, प्रेक्षकांच्या मासांत जणूं रुतून बसत आणि त्यांच्या काळजांत चर्र होई.

तिचें नाक अपुरें पण तरतरीत होतें. तिचे केंस अस्ताव्यस्त आणि विपुल होते. ते काळेभोर होते, पण प्रकाशांत तकाकतांना त्यांत एक तांबूस झांक झळाळे, आणि पाश्चात्य सौंदर्याचें स्मरण करून देई. तिच्या जिवणीमुळें आणि ती उघडण्याच्या 'सहज पाखरावाणी' पद्धतीमुळें ती कमालीची नाजूक आणि अश्राप वाटे. पण त्याबरोबरच डोळ्यांच्या दोन्ही कोपऱ्यांत उंचावणाऱ्या तिच्या कडक कपोलास्थि आणि तेथून थेट हनुवटीपर्यंत वळलेलीं कठोर आणि धारदार अर्धीं जबड्याचीं हाडें रोमन सैनिकाच्या करारी मुद्रेचें स्मरण करून देत.

पण कमलाकराच्या ... आणि कोणत्याहि प्रथमच पाहणाराच्या — दृष्टीला मात्र तिची आर्द्र अंगकांति, तिची आर्त चर्या आणि तिचें अकारण हास्य या सर्वांत प्रेम आणि करुणा यांखेरीज कशाचाच प्रत्यय येत नसे.

पंडितजींनीं तिजसंबंधीं फारशी आस्था दाखविली नाहीं याबद्दल कमलाकरला सरोप आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

पंडितजींचें भाष्य संपल्यावर थोडा वेळ आम्ही सर्वच स्तब्ध होतों.

आपल्या प्रेमपूर्ण स्वरानें खोलींतील निःशब्दतेचा भंग करून ती करुणसुंदरी म्हणाली, "खरंच, असं असूं शकेल का ? जिच्यामुळें काव्य स्फुरतं ... ती काव्यशून्य असूं शकेल ? ... आणि जी काव्यशून्य आहे तिजवर काव्य स्फुरेल ? ... मला तर वाटतं, जी भावनाशून्य असेल ती रूपहीनसुद्धां असली पाहिजे. खरंच, ज्यांना 'हार्ट' च नाहीं त्यांना देव रूप देतो तरी कशाला ?"

तिचे ते मधाप्रमाणें गोड शब्द कानांवाटे अंतरात्म्यांत घर करीत असतां पंडितजी आपलें फाउंटन पेन बंद करून काळजीपूर्वक ड्रॉवरमधे ठेवीत होते.

"आणि एखादी अगदी पाषाणहृदयी असली—" ती करुणसुंदरी सात्त्विक आवेशानें पुन्हां बोलूं लागली—" तरी असें जिवंत काव्य ऐकून तिला नवें हृदय येईल !"

कमलाकरला तिचे उद्गार पंडितजींच्या भाष्याहूनहि अधिक काव्यमय भासत होते. " पंडितजींचें निराशागीत कोणाहि का स्त्रीवर असेना, जोंपर्यंत या स्त्रीइतक्या रसिक आणि करुण स्त्रिया पृथ्वीतलावर आहेत तोंवर निराशेला स्थान नाहीं ! "—असें कांपऱ्या हातानें एका कागदाच्या कपट्यावर लिहून त्यानें तिच्या नकळत तो माझ्या हातावरहि ठेवला !

कदाचित् तिचें पंडितजींकडे आणखी कांहीं काम असेल म्हणून आम्ही जायला निघालों आणि पंडितजींचें बोलणेंहि आतां संपलेलेंच दिसलें.

पण आम्ही जायला उठतांच, काव्य आणि पंडितजी—दोघांना तेथेंच ठेवून, " चला मीहि येतें. मलाहि तिकडेच जायचं आहे. " असें म्हणून ती तरुणी आमच्याबरोबरच बाहेर पडली.

ती आपल्या सायकलची चेन सांवरण्याकरतां मागें राहिलीसें पाहून कमलाकरला तिची अधिक माहिती सांगण्याची मीं घाई केली.

" तुला ही कोण हें माहीत नाहीं कमलाकर ! ही म्हणजे—"

" तूं मला आणखी हेंच सांगणार ना कीं, हिचें नांव ' मालती ' नाहीं तर ' कुन्दा ', आडनांव ' साठे ' नाहींतर ' रानडे '—ती एम्. ए. ला बसत आहे !— इ. इ. या माहितीला मी काडीचीहि किंमत देत नाहीं ! पंडितजींची कविता ऐकून तिच्या चेहऱ्यावर जी आर्तता आणि सहानुभूति दिसली तीच तिची खरी ओळख ! करायचं काय नांव आणि गांव ? "

कमलाकर आतां कांहींच ऐकण्याच्या स्थितींत नव्हता. पंडितजींचें कागदावरील काव्य आणि विधात्याचें हें भूतलावरील काव्य या दोन गोष्टींखेरीज त्याच्या मेंदूत आतां कांहींच शिरणें शक्य नव्हतें !

तरी मीं धीर करून म्हटलें, " कमलाकर, तुला सांगितलें तर खरें वाटेल का ? ... या कवितेला कारण तुझ्या या कारुण्यमूर्तीचा निष्करुणपणाच झाला आहे ! हीच त्या निराशागीताची नायिका आहे आणि हीच त्यांतील रस चाखून गहिंवरत होती ! "

एखाद्या श्रद्धावान् माणसानें धर्मलंडाकडे पाहावें तशा तुच्छतेनें कमलाकर मजकडे टकमका पाहत राहिला !

ती तरुणी आमच्याजवळ येत चालल्यानें मींहि माझें बोलणें आखडतें घेतलें. पण ती आमच्यापर्यंत पोहोंचली नाहीं.

कागदी फुलें करून विकणारा एक इसम पाहून ती कौतुकानें त्याच्याजवळ थांबली.

" अय्या ! तुम्हीं स्वतः केलींत हीं फुलं ? विकायचींच आहेत ना ? तुम्ही शिकवतां का फुलं कशीं करायची तें ? खरंच, तुमचं दुकान कुठं आहे ?— कीं घरींच करतां ? "

तो अशिक्षित हुन्नरवाला तिची कौतुकानें उडालेली ती धांदल पाहून थोडा गोंधळांतच पडला. तिला सांगण्याइतपत त्याला ' घर ' नसल्यानें, त्यानें केवळ आपल्या त्या कलाकृतीचा विक्रीचा दर सांगून दोन पैसे कमवायचें ठरविलें.

मजकडे टकमका पाहणारा कमलाकर आतां तिजकडे पाहूं लागला. ती रसज्ञ युवती त्या फूलवाल्याकडे पंडितजींहूनहि अधिक आदरानें पाहत होती. हें पाहून त्याला कसेंसेंच वाटलें.

कविता आणि कागदी फुलें....

पडितजी आणि फेरीवाला....

---ही सर्वत्रच सद्गदित होते ? कीं...

पण जी सर्वत्रच गुडघे टेकून आदर दाखविते तिच्या आदराला कांहीं महत्त्व आहे का ?

हिचें सर्वच खरें कीं सर्वच खोटें ? पंडितजींची कविता हातीं घेऊन ही पंधरा मिनिटांपूर्वीं अक्षरशः रडत होती.

माझा मित्र म्हणतो तें खरें असेल का ? तिच्या चांचल्यावर आणि भाव-हीनतेवरच तर ती कविता नसेल ?

आणि हिला हें कधींच कळणार नाहीं ? आणि कमलाकरनं नकळत डोळे मिटले. त्याला त्या वेळीं ख्रिस्ताचें महावाक्य तर आठवत नव्हतें ?

**" परमेश्वरा, त्यांना क्षमा कर; कारण त्यांना आपण काय करतों हेंच कळत नाहीं ! "**

एवढ्यांत त्याच्या पोलो कॉलरमधून उघड्या पडलेल्या गळयाजवळ दोन

सडपातळ आणि मृदु बोटांचा स्पर्श झाल्यासारखें वाटून त्यानें दचकून डोळे उघडले !

" अय्या ! किती सुंदर फुलं आहेत नाहीं ? तुमच्या कॉलरवर किती सुंदर दिसतील !"—असें म्हणत ती प्रेममूर्ति त्याच्या कॉलरवर एक फूल चढवीत होती !



५

# " तूं हुबेहूब साउली.... "

त्या दिवशीं संध्याकाळपासून पावसाची धार लागली होती. मी माझ्या 'चिखलवाडीं'तील निवासांत, स्वतःच खंदक खणून अडकून पडावें, तसा चिखलाच्या रस्त्यांनीं वेढलेल्या अशा बंगल्यांत बसून राहिलों होतों. इतका चिखल तुडवून, पाऊस खाऊन येणारे जीव अर्थात् माझे अनन्यभक्त असेच असत. माझ्यावर अकृत्रिम प्रेम करणारी पूर्वजन्मींची माझी ऋणानुबंधी स्त्री संध्याकाळपर्यंत मजबरोबर विश्रब्धालाप करीत बसली होती. त्यानंतर पावसालाहि न जुमानतां मी थोडा वेळ बाहेर जाण्यास उत्सुक होतां, तोंच माझ्या एका विद्वान् स्नेह्यांनीं माझें दार ठोठावलें. कोणत्याहि स्थितींत मी त्यांना डावलून बाहेर जाणें शक्यच नव्हतें. शेजारच्या खोलींत भात करपत असूनहि, केवळ त्यांच्या वाक्स्रोताला अडथळा नको म्हणून मी खुर्चीवरून हालतहि नसें. ऑफिसला पंधराच मिनिटें अवकाश असला, तरी मी त्यांना " छे ! गडबड मुळींच नाहीं. " असें म्हणून बसवून घेत असें. अर्थात् आजहि मी त्याच्या स्वागतार्थ माझा 'पर्जन्य-विहार' रद्द केला.

" काय हो ! " माझे विद्वान् मित्र जणूं तासन् तास चाललेलें बोलणें पुढें चालू करीत काकुळतीच्या स्वरांत म्हणाले, " काय हो ! एखाद्या व्यक्ती-

करतां मी साराच्या सारा जन्म खर्ची घालण्यास तयार असेन, तर त्या व्यक्तीला उलट माझ्या बाबतींत कांहींच कर्तव्य निर्माण होत नाहीं काय ? "

माझ्या विद्वान् मित्रांना रुष्ट करणें जिवावर येत असूनहि मी म्हणालों, " ती व्यक्ति वचनबद्ध नसेल, तर तुमच्या त्यागाचा आणि तळमळीचा तिला विचार करण्याचें कारण आहे असें मला वाटत नाहीं. "

माझे विद्वान् मित्र क्षणभर स्तब्ध राहिले व नंतर त्यांनीं आपले सुसंगत, तर्कशुद्ध पण अपेशी आणि असिद्ध असे सिद्धान्त एकामागून एक अस्खलित वाणीनें मांडण्यास सुरुवात केली. सात, आठ, नऊ वाजले. त्यांचा भाषणाचा धागा तुटूं न देण्याकरितां अखेर मी घरीं पाकसिद्धि करीत असूनहि त्यांच्याबरोबर खानावळींत जाऊन जेवलों.

पण तो धागा असाच कित्येक रात्रीं चालू राहील अशी मला भीति वाटत होती. त्यांना न दुखवतां विषयाचा ओघ बदलण्याकरितां म्हणून मीं त्यांस नाटकाला घेऊन जाण्याचें ठरवलें. नाटकाचा त्यांना लोभ वाटणें शक्यच नव्हतें. तथापि सुप्रसिद्ध नाटक मंडळीचें मधुर संगीत आणि प्रत्यक्ष नाटककाराचेंच आग्रहाचें आमंत्रण यांमुळें ते मजबरोबर येण्यास सिद्ध झाले.

भोजन होतांच नाटककाराकडून आलेल्या गाडींतूनच आम्ही नाटकगृहाचा रस्ता धरला. थिएटर माणसांनीं फुलून गेलें होतें. आम्हीं जवळ जवळ पहिल्या रांगेवर अधिष्ठित झालों. आमच्या पुढील रांगेत माझ्या समोरच बसलेल्या स्त्रीच्या दर्शनानें अस्थिर न होईल असा पुरुष दुर्मिळ! आणि असल्यास त्याची जागा थिएटर ही खास नव्हे! विपुल केशकलापाची आकर्षक रचना, धगधगीत गौरवर्ण, आरक्त अंगकांतीशीं स्पर्धा करणारें भारी किमतीचें ' चीनांशुक, ' जोडीदाराच्या खुर्चीवर पाठीशीं पसरलेला गौर अनावृत भुजदंड, सुगंधी विलेपनांचा व ' मुखचूर्णा ' चा सुटलेला उन्मादकारी दर्प यांमुळें अर्धे थिएटर बेचैन झालें होतें. शहराला पूर्ण परिचित असलेलें असेंच तें जोडपें आहे, असें आढळून आलें. त्या प्रांतांत दर्दी असलेल्या प्रेक्षकांच्या कुजबुजीनेंहि आमच्या तर्कास दुजोराच दिला.

नाटक सुरू झाल्यानंतर थोड्या वेळानें तरतरीत नाकाडोळ्याचा पण विचारमग्न, मध्यमवयीन पण दिसण्यांत पोक्त असा एक गृहस्थ व्यवस्थापकांनीं

आंत आणला. व्यवस्थापकांनीं त्याला आमच्या समोरचीच आणि या विलास-मूर्तीच्या शेजारचीच खुर्ची मंद स्मित करीत दाखविली.

ते तरुण गृहस्थ इतके विचारमग्न होते कीं, रंगभूमीकडे पाहण्याचेंहि त्यांना पांच मिनिटें भान नव्हतें. मग शेजारच्या परस्त्रीला न्याहाळण्याचें नांवच नको. सुमारें दहा मिनिटांनीं शेजारच्या स्त्रीची जनानी छत्री या गृहस्थांच्या बुटावर पडली. त्यांनीं शिष्टाचाराप्रमाणें देण्याकरितां ती उचलली – तों शेजारच्या स्त्रीनें त्यांच्याकडे तिरप्या नजरेनें पाहत 'Thank you' म्हटलें. सद्गृहस्थांच्या हातून छत्री जवळ जवळ गळूनच पडली. त्यांचा चेहरा एकदम साफ पांढरा झाला. ते नकळत उठण्याचा प्रयत्न करीत आहेतसें दिसलें. सुमारें पांच मिनिटांनीं ते मॅनेजरच्या टेबलापाशीं गेलेले दिसले. मीहि कुतूहलानें दोन मिनिटांनीं नाटककाराचें अभिनंदन करण्याच्या मिषानें बाहेर पडलों. आश्चर्याची गोष्ट म्हणजे सदरहू गृहस्थ मोठ्या दराचें तिकीट मोफत परत करून हलक्या दराचें तिकीट मागत होता. पांच रुपयांचें तिकीट परत करून दीड रुपयाचें तिकीट घेणारा गृहस्थ पाहून भोंवतालच्या मंडळींना एक मोठें नवलच पाहिल्याप्रमाणें वाटलें. अखेर मॅनेजरनें त्यांस तीन रुपयांच्या जागेत नवीन खुर्ची मांडून जागा करून दिली व दोन रुपये परत घेण्याचा आग्रह केला.

माझे विद्वान् मित्र तल्लीन होऊन संगीताची मजा लुटीत होते. मी बाहेर गेलों तो परत आलोंच नाहीं याची त्यांना दादच नव्हती. माझ्या नाटककार मित्रांनीं मला चहाच्या निमित्तानें नेपथ्यगृहांत (Green Room मध्यें) नेलें, व तेथें त्या विचित्र गृहस्थाची जन्मकथा ऐकविली. जी सुप्रसिद्ध कामिनी प्रथम अखिल प्रेक्षकांच्या कुतूहलाला व नंतर अस्थिरतेला कारणीभूत झाली, ती सदरहू गृहस्थावर कित्येक वर्षें अनुरक्त होती. हे गृहस्थ अत्यंत विद्वान् म्हणून लोकादराला पात्र झाले होते. सदर स्त्री देखील त्यांना जणूं परब्रह्म मानी. तिनें त्यांच्यावर केलेल्या कविता सर्वपरिचित व लोकप्रिय होत्या.

मग आतां त्या सर्व प्रेमाचें व सर्वस्वार्पणाचें काय झालें? माझे नाटककार मित्र वरवर तरी नवमतवादी होते. अर्थात् त्या दिवशीं बाहेरच्या नाटकावर पडदा टाकून आम्हीं या विचित्र प्रेमनाटकाचीच चर्चा केली.

माझ्या नाटककार मित्रांनीं घेतलेला पक्षहि फारसा सबळ नव्हता, व त्यांचें समर्थन तर अगदींच वरवरचें होतें. मी मात्र जिवाला पीळ पाडून बोलत

होतों. अर्थात् बोलतांना माझ्या मनश्चक्षूंसमोर तीन वेगवेगळीं दृश्यें होतीं. माझें माझ्या प्रिय व्यक्तीवरील प्रेम व तिचें माझ्यावरील निःसीम प्रेम; माझ्या विद्वान् मित्रांचा प्रेमाच्या विजयाविषयींचा सिद्धान्त व आम्हीं नाटकांत नुकताच पाहिलेला प्रेमाचा पराभव आणि अपमृत्यु! माझ्या म्हणण्याचा अर्थ इतकाच होता कीं, प्रेमाचें सर्वशक्तिमत्त्व जरी काल्पनिक म्हणून सोडून दिलें, तरी निःसीम प्रेम दिल्यावर आणि निःसीम प्रेम घेतल्यावर दोन व्यक्ति एकमेकांस सोडूं शकणार नाहींत. निदान अशा व्यक्तींपैकीं एकीनें दुसऱ्यास सोडणें अमानुष होय,

या माझ्या म्हणण्याला पुरावा म्हणण्यापेक्षां कारणेंच अधिक होतीं. आपल्या मांडीवर दुसऱ्यानें निष्पापपणें व अनन्यभावानें मान दिली असेल तर त्याला कठोरपणें अथवा निर्विकारपणानें खालीं उतरवून ठेवणें अमानुष होय. मनाला मोह अनेक वेळां होईल, पण एकमेकांनीं एकमेकांस हृदय खोलून आंत घेतल्यावर इतर मोह प्रभावी ठरूं नयेत! क्षणिक मोहाला मन बळी पडलें तरी चिरकाल प्रेमाला वेइमान होण्याला कोणतेच कारण पुरेसें होणार नाहीं. मनोविकार क्षीण झाले असले, तरी अनेक वर्षांच्या सहवासानें प्रेम केव्हांच विचाराधिष्ठित झालें असलें पाहिजे. सारांश, एकावर अगर एकीवर प्रेम केल्यानंतर मन अन्यत्र अनुरक्त होणें किंवा निदान प्रेमशून्य होणें हे मला अत्यंत निष्ठुरतेचें व असंस्कृतीचें लक्षण वाटे!

पण 'माझ्या निःसीम प्रेमामुळें दुसरी व्यक्ति द्रवलीच पाहिजे' हा जसा माझ्या विद्वान् मित्राचा अतिरेकी तर्कवाद, तसाच एकदां एके ठिकाणीं प्रेम केल्यानंतर तेथून तें हलणारच नाहीं, हाहि अतिरेकी सिद्धान्त होय, हें मला मान्य करणें भागच होतें. कारण मला त्या नाटकगृहांत नुकतेंच असें शोकपर्य-वसायी प्रेमनाटक पाहावयास सांपडलें होतें. तथापि अर्भकाचा खून 'होणें' शक्य असलें तरी तो 'करणें' अमानुष व भयंकर होय, या दृष्टीनेंच निःसीम प्रेमाच्या गळ्याला नख लावणें, निःसीम प्रेम अश्रुपूर्ण नेत्रांनीं आळवणी करीत असतां थंडपणें 'प्रेम होतें तें निमालें काय मी त्याला करूं?' असें म्हणणें, हें मला अक्षम्य वाटत होतें. दुसऱ्याचें अकृत्रिम प्रेम आपण अनेक वर्षें स्वीकारलें आहे, एवढेंच नव्हे तर गौरविलें आहे, एवढें कारणहि हृदय द्रवण्याला पुरेसें आहे. जो विकार होता तें आतां कर्तव्य झालें पाहिजे. अन्यत्र

धांव घेणाऱ्या विकारालाहि दुसऱ्याच्या हृदयाला होणाऱ्या जखमेच्या जाणीवेनें बांध घातला पाहिजे. किंबहुना ज्याचें मन प्रिय व्यक्तींच्या हृदय-स्फोटानेंहि विकारापासून परत फिरत नाहीं, त्याचें पहिलें प्रेमच हिणकस असलें पाहिजे, केवळ विकारी असलें पाहिजे, एवढें म्हणण्याइतपत तरी माझ्या प्रेमसिद्धान्ताच्या बाबतींत मी कट्टर होतों!

पण ज्याला माझे नाटककार मित्र 'काव्यांतील व्यवहारवाद' म्हणत तो तरी सोडण्यास मी तयार नव्हतों. मी म्हणें, प्रेमांत जसे चढउतार असतात, प्रेमी जीवहि जसे कधीं काव्यमय प्रेमांत, स्वर्गीय वातावरणांत बुडून जातात, त्यांच्या हृदयसागरांना जणूं भरती येऊन चुंबनें व परस्परगौरव यांच्या पर्वत-प्राय लाटा उसळतात तर कधीं तेच जीव शांत व कृतार्थकाणें एकमेकांच्या अस्तित्वाचा अप्रक्षुब्ध असा अनुभव घेत असतात, तर कधीं स्वभाववैचित्र्या-मुळें दोघांचा प्रेमकलह होऊन जन्माचे संबंध तुटले असें वाटून दोघे एकमेकांस कायमचें सोडण्यासाठीं म्हणून बिलगतात—तोंच मेंदूच्या तीव्रतेनें आणि शब्दांच्या दुरुपयोगानें गोठलेलीं हृदयें, कंपित ओष्ठसंपुटि, आरक्त कपोलप्रांत व हेलावणारीं वक्षःस्थलें यांच्या परस्पर-स्पर्शानें फिरून पाझरूं लागतात; दोन दोन तास संतापून, वैतागून दूर बसणारीं जोडपीं कांहीं मामुली कारणानें जवळ येतांच संताप विसरून एकमेकांच्या गळ्यांत पडतात, तशाच 'प्रेम निमालें' म्हणून दूर राहणाऱ्या हट्टी आणि अज्ञानी व्यक्ति वर्ष दोन वर्षांनीं सदृश ऋतूंच्या आगमनानें, परिचित स्थलांच्या दर्शनानें, प्रेम-चिन्हांच्या उपस्थितीनें कदाचित् फिरून त्याच विकाराच्या ओघास जागा देणार नाहींत कशावरून?



नाटक संपत आलें होतें. प्रमुख नटी शेवटची भैरवी करुणालापांनीं आळवीत होती. मी माझ्या विद्वान् मित्राइतक्याच कडवेपणानें आपले सिद्धान्त मांडीत होतों, पण प्लेगच्या सांथींत गांवाला इनॉक्युलेशन करून लोककल्याण साधणारा डॉक्टर अखेर गांव सोडून 'माझीं सोनुली तर सुरक्षित आहेत!' एवढ्यांतच आनंद मानतो! त्याप्रमाणें मीं जगांतील न्याय-अन्याय, चिर-

कालचें नीतिशास्त्र यांतील संचार सोडून अखेर 'निदान आम्हां दोघांचें प्रेम तरी शाश्वत आणि अमर आहे असेंच तुम्हांला दिसून येईल!' असें माझ्या समोरच्या अश्रद्ध ( Cynical ) प्रतिवाद्यास म्हटलें. माझ्या नाटककार मित्रास माझ्या एकपात्री जीवननाटकामागील नितान्त सुंदर प्रेमाची पार्श्वभूमि, ऐकून ठाऊक होती. म्हणून तत्त्व जाणण्याचें सोडून केवळ व्यक्तिगौरवार्थ त्यांनीं माझा शेवटचा मुद्दा मान्य केल्यासारखें दाखविलें.



त्या दिवशींच्या त्रिविध दृश्याला आज बरींच वर्षे लोटून गेलीं होतीं. माझे विकार व विचार कायमच होते. एक स्वतंत्र विचारी विद्वान् म्हणूनच माझा लौकिक झाला होता. पण त्या स्वतंत्र विचाराच्या सिंहासनामागील दारुण अनुभवाचा भुजंग जगाला दिसत नव्हता; इतकेंच नव्हे तर माझा मीहि विसरून गेलों होतों. निराशा पदरीं आली असून आशावादी, विकार पोटांत पचवून विचारवादी, अप्रिय कर्म वांट्याला येऊनहि कर्मवादी असा मी, विकारावर व विधिघटनेवर विजय मिळवून बसलों आहें असें समजत असें. जगानें व विधिघटनेनें वंचना केली तरी आपलें हृदयस्वातंत्र्य कोणीच हिरावून घेत नाहीं. प्रेम करणें हेंच प्रेमाचें सार्थक आहे व दुसऱ्यांनीं प्रेमभंग केल्यावरहि आपण प्रेम करूं शकतों. दुसऱ्यांनीं शाप दिल्यावरहि आपण दुवा देऊं शकतों, हीच ती माझी ध्येयवादी वेदांतपर बैठक होती.

वफाओंके बदले जफा कर रहे हयू।
मैं क्या कर रहा हूँ वो क्या कर रहे हैं।

ही आम्हां उभयतांना प्रिय झालेली 'रेकॉर्ड' माझ्या मनांत व कानांत सदैवच घुमत असे. वेळ घालविण्याकरतां जुन्या स्त्रिया पुराणाला जात त्याप्रमाणें मी सभा-संमेलनाला जात असें. पांच श्रोत्यांच्या सभेंतहि सहावा श्रोता मी येणारच, असा भरंवसा सभा भरवणारास वाटत असे.

या माझ्या आशावादी जीवनांतील आशावाद आज टेबलावरील निमंत्रण-पत्रिकेकडे पाहून 'एक दिवसाची तरी बेगमी झाली!' म्हणून अधिक

सबळ झाला होता. ती निमंत्रणपत्रिका एका इंग्रजी शाळेच्या संमेलनाची होती. सायंकाळचे पांच होतांच चार-दोन साहित्यिक स्नेह्यांसमवेत मी संमेलनाच्या जागीं दाखल झालों. संमेलनांतील विद्यार्थ्यांचे कार्यक्रम एकामागून एक टाळ्यांच्या गजरांत पार पडत होते. मधून मधून आपल्याकडे पाहणाऱ्या व क्वचित् आमच्या खुर्चीशीं येणाऱ्या शाळाचालकांस आम्ही स्मितपूर्वक अभिनंदन पोहोंचवीत होतों. शेवटीं लहान मुलींचा नाचाचा कार्यक्रम होता. पडदा उघडण्यापूर्वीच ऑर्गनमधून इराणी व इंग्रजी सुरांच्या मधुर मिश्रणानें बनलेले नृत्यगायनाचे सूर कानांवर पडत होते. ते सूर मला परिचयाचे वाटले. क्षणांत पडदा उघडला व कोंवळ्या कळ्यांच्या हाराप्रमाणें दिसणाऱ्या मुग्ध बालिकांचें तें लंबवर्तुळ, पायांतील पैंजणांचे रुमझुम आवाज काढूं लागलें. नृत्य नेहमींच्याच प्रकाराचें म्हणजे कृष्ण-गोपींचें होतें. गोपींच्या फेऱ्यांत सांपडलेला 'बालकृष्ण' कुठेंतरी पाहिल्याप्रमाणें मला वाटूं लागलें होतें. पण माझ्या विचारप्रधान मनानें हा केवळ 'विकार' आहे अशी ग्वाही दिली. कोणतीहि रम्य वस्तु पाहिली कीं मन पर्युत्सुक होऊन 'जननान्तर सौहृदा' पर्यंत जाऊन पोहोंचावें, हा भावनाप्रधान जीवांचा धर्मच आहे. मला माझ्या जवळच्या चौकस मित्रानें सांगितलें कीं, मधला कृष्ण देखील गोपींच्या जातीचाच म्हणजे मुलगीच आहे.

"या चला चला ग फेर धरूं या ऽ
नंद-किशोर पिऊं या नयनीं!"

मी त्या मुग्ध बालिकांच्या नृत्यगायनांत विरून गेलों. माझी विचारांची तटबंदी कोसळण्यास इतक्या आयुधांचें खरोखर कारणच नव्हतें. अशा मुग्ध बालिकांचें दर्शन, अशा गूढ करुण आलापांचें श्रवण किंवा त्या गूढ तालाचे आघात यांपैकीं एकानेंहि माझ्या वेदान्ताच्या चिलखतांत छिद्रें पडणें सहज शक्य होतें. मी त्या बालिकांच्या एकेका पदन्यासाबरोबर गतायुष्याकडे वाहत चाललों! प्रथम समानरूप दिसणाऱ्या बालिकांपैकीं मध्यवर्ती मुकुंदवेषधारी अर्भकीचें रूप मला परिचित वाटूं लागलें! होय! माझ्या गतायुष्यांतील सूत्रधारिणी थेट अशीच होती. तोच विपुल केशकलाप, त्याच भुंवया, तीच अस्फुट कमलपुष्पाप्रमाणें जिवणी, क्रमाक्रमानें तारस्वरांत प्रवेश करणारा

अंतरा म्हणून मुली नाचत नाचत फिरून पहिल्या पदावर आल्या. मला तें सर्व असह्य झालें ! माझे विचार झांकण्याकरितां अथवा मोकळे करण्याकरितां मी त्या प्रेक्षकसमूहांतून उठून शेजारच्या हिरवळीच्या मैदानांत जाऊन बसलों.

' आपण प्रेम केलें म्हणजे झालें; प्रिय व्यक्ति प्रेम करीनाशी झाली तरी आपण प्रेम पहिल्याप्रमाणेंच करूं आणि आनंदी राहूं ', ही माझी वेदान्ती भूमिका आतां सुटली होती.

" स्वातंत्र्य तुला कुठंहि जा तूं ।
तूं मद्‌हृदयस्थ पूज्य राणी । "

या माझ्या आवडत्या ओळी आज मला आठवत नव्हत्या. शेजारच्या उपाहारगृहांतील आकाशवाणींतून कोणते सूर निघत होते मला आठवत नाहीं. पण माझ्या हृदयाच्या आकाशवाणींतून मात्र तांब्यांच्या गीतांतले पुढील सूर निघत होते. ' बा प्रेमा !

" परि दया करी त्यावरी, जया भेदिशी ।
नच हत्या करी कवणाची
बघ दशा होय मम कशी ॥ "

◆ •

त्या कृष्णवेषधारी बालिकेला जवळ घेऊन माझी दशा निवेदन करीत तिच्या टपोर बालकपोलाचें शतशः चुंबन घ्यावें असें मला वाटत होतें. माझ्या गतायुष्याच्या दुहिते ! तुझ्या मातेनें जशी माझी दशा केली तशी भावी आयुष्यांत तूं कुणाचीहि करूं नकोस ! माझा वेदान्त विरघळला. प्रेमाचा लोप होणें शक्य कीं अशक्य हा वाद करण्यास मी आज तयारच नव्हतों. प्रेमाचा लोप हा प्राणाच्या लोपाहूनहि भयंकर होय आणि या महत्तर मृत्यूवर इलाज म्हणजे प्रेमांतील एकनिष्ठा ! हें माझें मत दृढतर झालें.

' आमच्या अमर ' प्रेमाबद्दल किंबहुना ' माझ्या विजयी ' प्रेमाबद्दलहि गर्व वाहण्यास आज मी तयार नव्हतो. गर्वोन्नत शिर अवनम्र करून मीं आज प्रचारकाची व प्रार्थनाकाराची भूमिका घेतली होती.

चंचल प्रेमाला एक नृत्य-गायनकुशल अर्भक समजून मी अश्रुपूर्ण नेत्रांनीं आळवीत होतों – " बा प्रेमा ! "

" परि दया करी त्यावरी, जया भेदिशी ।
नच हत्या करि कवणाची
बघ दशा होय मम कशी ॥ "



६

# आक्कांची वटपूजा

ज्येष्ठांतल्या शुक्लपक्षांतली ती एक ढगाळ रात्र होती. ज्येष्ठी पौर्णिमा जवळ आली होती. पुण्यांतल्या नव्या पेठेच्या नदीकांठच्या वस्तीवर झोपेचा अंमल पसरूं लागला होता. लहान मुलांचा गलगा संपत आला होता. पुरुष मंडळी देवळाच्या, नाहीं तर तालमीच्या कट्ट्यावर तंबाखू चघळीत बसली होती. बायका घरांच्या ओट्यांवर शिळोप्याच्या गप्पा करीत होत्या. शहरांतल्या त्या खेडवळ पेठेंतल्या एका गल्लींतून दोन फॅशनेबल सुशिक्षित स्त्रिया आणि एक सौम्य, सभ्य, मराठा गृहस्थ कोणतासा एक घर नंबर शोधीत चालले होते. त्या दोघी स्त्रियांतील एक स्त्री महाराष्ट्रीय नव्हतीं, हें तिच्या पोशाखावरून आणि हिंदी-मिश्रित मराठीवरून सहज ओळखतां येत होतें. ती स्त्रीं वयानं चाळिशीच्या पुढें असावी हें जाणत्यापासून लपलं नसतं. तरी तिचा धगधगता लालसर गोरापान वर्ण, तिचा सरळ ताठ बांधा, तिच्या चालण्याचा नैसर्गिक झोक आणि झपाटा यांवरून ती तिच्या बरोबरच्या पंचविशींतल्या कुमारिकेहूनहि उमेदींत आल्यासारखी भासत होती. तिचा पोशाख त्या मागासलेल्या पेठेंत तरी हिंदु स्त्रीचा पोशाख ठरण्यासारखा नव्हता. तिच्या पायांत सलवार, अंगांत खमीस व डोक्यावर ओढणी होती. तिचं उंच नितळ गोरंपान कपाळ कुंकवाअभावीं

विधवेच्या कपाळासारखं म्लानमनोहर दिसत होतं. त्या तिघांत अधिकारानं वरिष्ठ तीच असावी, हें न सांगतांहि समजत होतं.

'और कितना दूर असेल तो वाडा मास्टरसाब ? ' त्या स्त्रीनं ओढणी सावरीत आपल्या प्रमत्त पंजाबी स्वरांत चव्हाणमास्तरना प्रश्न केला.

मास्तरनीं हातांतला डिटमारचा कंदील वर करून घर नंबर पाहत म्हटलं, ' हा नऊशें ब्याण्णव दिसतो आहे. आपण थोडे पुढं आलों वाटतं ? '

' वा ! आम्हीं तर तुम्हांला या नव्या पेठेंतले माहितगार म्हणून बरोबर घेतलं ! अन् तुम्हीच नंबर शोधायला लागला म्हणजे आमच्या पायांची धडगत दिसत नाहीं बाई ! ' तिघांतली महाराष्ट्रीय तरुणी डोळे मुरडीत माना वेळावीत म्हणाली. कु. प्रमिला घारपुरे ही कर्वे विद्यापीठाची बी. ए. झाल्याला चार वर्षे झाली होतीं. आणि एक दोन मॉटेसरी शाळांतले लहान मुलांवरचे तिचे प्रयोग संपल्यावर ती आपल्या समाजसेवेचे प्रयोग आतां प्रौढांवर करू पाहत होती. श्रीमती कौसल्या कुंझरू आणि श्री. चव्हाणमास्तर यांनीं तिच्या साक्षरताकेंद्राचा जम बसवून देण्याचं आतां नक्की मनावर घेतलं होतं. बरोबर एक वर्षापूर्वी त्यांनीं नव्या पेठेंतल्या शिरोळ्यांच्या वाड्यांत तिला एक केंद्र उघडून दिलं होतं. तें ' तिनं पंधरा दिवसांत मोडलं ' म्हटलं तर थोडा अन्याय होईल. कारण ' त्या केंद्रानं तिला पहिल्या पंधरा दिवसांतच मोडून काढली ' हें म्हणणंहि तितकंच खरं ठरणारं आहे ! कौसल्या कुंझरू ही बाई लाहोराहून निर्वासित होऊन आलेली. तिला कांहीं तरी काम द्यायचं म्हणून पुणें विभागांतल्या साक्षरता केंद्राची संघटना करण्याचं काम सरकारनं तिला दिलेलं होतं. पुण्यांतल्या अशा केंद्रांचं खरं काम चव्हाणमास्तरच करीत. पण त्यांचाहि अलीकडे या कामावरचा विश्वास उडत चालला होता. कारण ते स्वतः जिथं काम करीत, तिथलं केन्द्र तेवढं जोरांत चाले. पण जिथं ते कु. घारपुरेसारख्या पदवीधर स्त्रियांना केंद्र उघडून देत, तिथला त्यांचा अनुभव, सडकेच्या कांठानं लावलेल्या झाडांच्या अनुभवासारखा असे. ओळीनं लावलेलीं झाडं ओळीनंच मेलेलीं आढळायचीं !

प्रमिलेला काढून दिलेलं केंद्र पुरतं मेलं, कीं त्यांत थोडी धुगधुगी आणतां येईल, हें पाहायला आज हे तिघेजण नव्या पेठेंतलीं घरं धुंडीत होते.

एवढ्यांत एका जुनाट वाड्याच्या दारांतून चोरून पाहणारी एक बाई, ' आल्या वाटतं त्या दोघी बया ! ' असं म्हणत वाड्याच्या आंतल्या चौकांत घाबऱ्या घाबऱ्या गेली. त्या वाड्याची रचना मोठी विचित्र होती. वाड्याच्या आंतल्या चौकांत जायची वाट वाड्यांतल्याच एखाद्या बोळासारखी होती. त्या वाटेंत दुतर्फा म्हशी बांधलेल्या होत्या. आंत कुठं तरी रॉकेलचा धुरकट दिवा असावा, याचा लांबून पत्ता लागत होता; पण त्या ' लाल ताऱ्या 'पर्यंतचा प्रवास मात्र काळ्याकुट्ट धुक्यांतून करावा लागत होता. खरी मनुष्यवस्ती आंतल्या चौकांत आहे, हें बाहेरूनहि ओळखत होतं.

' बाई ! हा वाडा तर आपल्या केंद्राचा दिसत नाहीं, आणि तरी आपल्याला ओळखणाऱ्या बाया इथं आहेतसं दिसतं ! आपण आंत तर जाऊं. आपल्याला काय ? आपण सरकारी कामाचीं माणसं ! ' असं म्हणून चव्हाण-मास्तर पुढें झाले. त्यांच्या मागोमाग कौसल्यादेवी आणि कौसल्यादेवींच्या मागोमाग कु. घारपुरे अशीं तीं तिघेजणं, कंदिलाच्या त्या रडक्या प्रकाशांत ठेचकळत, वसरत त्या गोठ्याच्या शेणसड्यांतून आंत गेली.

आंत पाहतात तों साक्षरतेचाच एक वर्ग चाललेला. गरीब स्थितींतल्या आठ मराठ्यांच्या आणि मावळ्यांच्या बायका ओळीनं भिंतीशीं बसल्या होत्या. त्यांच्याशीं काटकोन करून एक तरुण कृश, सतेज, ब्राह्मण स्त्री हातांत वृत्तपत्र घेऊन मोठ्यानं वाचून दाखवीत होती. हीं सरकारी माणसं पाहतांच, शिकणाऱ्या—किंवा श्रवणभक्ति करणाऱ्या !—त्या बायांपैकीं एक पोक्त आणि स्थूलशी बाई आंतल्या चौकाच्या दारापर्यंत पुढें होऊन म्हणाली, ' कायव मास्तर ! काय होवं या बायास्नी पुना ? आतां झाली आमची शिकन्याची सोय ! आतां हैती आमच्या आक्का आमास्नी ! '

एवढ्यांत त्यांच्या त्या आक्का दारापर्यंत आल्या. चव्हाणमास्तरना आक्कांच्या घरच्या मंडळींची माहिती असल्याचं आठवलं. कौसल्यादेवींची आणि आक्कांची गांठ कुठं सभेबिभेंत फार तर एखाद्या वेळीं झाली असेल. पण निदान आक्कांना तरी तें आठवत नव्हतं. तरी ती बाई आक्कांशीं जणूं पूर्व-जन्मींची ओळख असल्यासारखी अंगाला अंग खेटून बोलूं लागली.

' काय हरकत नाय्. आक्कासाहिबा ! क्लास आपन घेतील तरबी अच्छा

मा. ५

होईल! तुम्हीं तुमचा क्लास सरकारांत नोंदवला काय? नहीं तो, आम्ही अभी के अभी नोंदवून टाकील!'

आक्कांच्या चेहऱ्यावर मंद पण निर्मळ हास्य झळकत होतं. पण उत्तर देण्याची मात्र त्यांना घाई दिसत नव्हती. आक्का वयानं तिशीच्या आसपास, थोड्याशा अशक्तच, पण एखाद्या पंधरा-सोळाच्या मुलीइतक्या तरतरीत आणि उल्हासी दिसत होत्या. आक्कांची उंची मध्यम, अंगकांति रेशमासारखी तकतकीत, आणि त्वचा जणूं माशाच्या पोटासारखी पारदर्शक दिसत होती. त्यांचे कपडे...पातळ, जंपर भारी किंमतीचे पण जुनेपाने दिसत होते. अंगावर सोनंनाणं बेताचंच होतं. पण त्यांच्या दागिन्यांकडे कुणाचं लक्षच जात नसे. फ़ार काय, ॲनीमिया (रक्तक्षय), ॲस्थमा (दमा) यांसारख्या हटेल व्याधींनीं त्यांच्या कोमल कायेंत तिशीच्या आंतच तळ दिला होता, याकडेहि कुणाचं लक्ष जात नसे. त्यांचे विशाल, तरल, मत्स्याकृति डोळे आणि ज्याच्या संभाराचं दडपण पाहणाराच्या मनावरहि पडे, असा त्यांचा तो भुजंगप्राय काळाभोर केश-कलाप या दोहोंवरच पाहणाराचं लक्ष जें खिळून बसे, तें पुढें सरकतच नसे! त्या काळ्याभोर डोळ्यांतलं चैतन्य आणि त्या काळ्याभोर केसांचं वैपुल्य पाहिल्यावर पाहणाराला रोगराई दुःख-दुर्दैव यांचं भानच राहत नसे! मानवी दुनियेंतलं एक विलोभनीय वैभवच तेवढं त्याला दिसत असे.

कौसल्यादेवीच्या प्रश्नाला आक्कांनीं कांहींच उत्तर दिलं नाहीं, कीं त्यांच्या चर्येवर उत्तर न देण्याचा उद्धट इरादाहि दिसला नाहीं, असं पाहून चव्हाण-मास्तर म्हणाले, 'काय आक्का! तुम्ही रात्रीच्या वेळेला या वस्तींत याल असं नव्हतं वाटलं आम्हांला तुम्हांला स्वतःला सरकारांत लिहा-बिहायचं नसलं, तर मी उद्यां लिहितों तुमच्यासाठीं;—अन् दिवाबत्ती, पाट्यापेन्सिली यांची ही एवढी यातायात कुणीं केली? सरकारांतनं मिळालं असतं सगळं! अजून मिळेल खर्च झालेला सगळा! पण तुम्ही तुमचं हें केंद्र नोंदवून टाका सरकारांत!'

आक्का किंचित् संकोचानं हंसून म्हणाल्या, 'मला माझं हें केंद्र असंच चालवायचं आहे. खर्च विशेष नाहीं झाला. अन् माझा मीच करीन काय होईल तो!'

आक्का उत्तर देत असतां त्यांच्या डोळ्यांकडे कौसल्यादेवी एकसारख्या

पाहत होत्या. कु. घारपुरेचं लक्ष त्यांच्या केसांकडे होतं. तिनं त्यांच्यामागेहि वळून एकदां पाहून घेतलं. आक्कांच्या पाठीवरून मांड्यापर्यंत लोंबणाऱ्या वेणीला एखादी खोटी पुरवणी दिसली नाहीं, तेव्हां तिला अधिकच नवल वाटलं. ती त्यांच्या वेणीकडे इतक्या अधाशीपणं पाहत होती कीं, चव्हाण-मास्तर नसते तर आपण ती हातांत घेऊनहि पाहिली असती, असंच ती जणू मनाशीं म्हणत होती.

केंद्राच्या नोंदणीचा विषय तसाच सोडून थोड्या मोकळेपणानं आपला हेतु या निर्मळ बाईजवळ बोलायला हरकत नाहीं, असा धीर आतां कौशल्यादेवींना वाटूं लागला होता. पण त्यांनीं आक्कांना थोडं बाहेर यायला खुणावलं. कारण त्यांना आक्कांबद्दल आपुलकी वाटायला लागली असली, तरी त्या शिकणाऱ्या बायांना त्या नव्या दोघींबद्दल आपुलकी वाटणं शक्यच नाहीं, असं त्यांच्या त्या रोखलेल्या डोळ्यांवरून दिसत होतं! त्या उमद्या पंजाबी स्त्रीचा रोख ओळखून आक्का बाहेर आल्या. बाहेर येतांक्षणीं कौसल्यादेवींच्यातर्फे चव्हाणमास्तर आक्कांना म्हणाले—

'अलीकडे एक बाई नव्या पेठेंत साक्षरतेचा वर्ग चालवते असं आमच्या कानांवर आलं होतं. आमच्या पहिल्या वर्गातली – या प्रमिलाबाई चालवीत होत्या त्यांतली – ती सावित्री मालुसरे आहे वाटतं तुमच्यां वर्गांत. ती आमच्या भिडे-साहेबांच्या घरीं धुणंभांड्याला असते. तिच्याकडन कळलं मला. एक दिवस साहेबांच्या मंडळींजवळ ती आपल्या नव्या बाईचं वर्णन करीत होती, अन् एवढ्यांत मी तिथं गेलों. पण त्या बाई कोण ते आज दिसलं आम्हांला आक्का!' असं म्हणून त्या पोक्त मराठा गृहस्थानं त्या ब्राह्मण समाजसेविकेकडे कौतुकानं आणि धन्यतेनं पाहिलं. पण तितक्याच खवचटपणानं कु. घारपुरेकडे पाहत ते म्हणाले, 'अडाणी अन् अंगमेहनत करणाऱ्या बायांची भक्ति उगीच नाहीं बसत एखाद्या माणसावर!'

'तुमी आमच्या प्रमिलाबाईला घेईल का आपल्या मदतीला? तुमालाबी या बरसातीच्या दिवसांत फार तकलीफ नाय् पडायची; और तिलाबी तुमच्या साथीनं थोडी 'सोशल वर्क'ची तालीम मिळेल!' कौसल्यादेवी दोघींकडे आळीपाळीनं पाहत म्हणाली.

आक्कांनीं डोळ्यांनींच 'होय' म्हटल्यासारखं दाखविलं, पण तें स्वतःची 'तकलीफ' वांचेल म्हणून नव्हे, तर त्या सज्जन मास्तरांच्या आणि त्या उमद्या 'पंजाबिणी'च्या मुरवतीखातर म्हटलं, असंच दिसलं. कु. घारपुरे सहजासहजीं कुणा बाईच्या हाताखाली काम करायला तयार होणारी नव्हे. पण आक्कांच्या दाट आणि लांबसडक केसांवर ती इतकी लुब्ध झाली होती कीं, त्या भुजंगासारख्या शेपट्यावरून रोज हात फिरवायला सांपडेल एवढ्याकरतां देखील ती हा कमीपणा पत्करायला राजी झाली असेल !



त्या चांदण्या रात्रीं झालेला तो करार आक्कांनीं दोन दिवसांनीं आपल्या शिष्यिणींना सांगितला. आक्कांच्या सर्वच शिष्यिणी मोलकरणी होत्या असं नव्हे. तरी दहापैकीं सात जणी तरी मोलकरणी होत्या. दोघी जणी तर त्यांच्या वाड्यांतच कामाला होत्या. त्या दहांतल्या तिघीजणी चांगल्या घरदार-दागदागिनेवाल्या होत्या. एक जण तर त्या वाड्याची आणि त्यांत बांधलेल्या आठ म्हशींची मालकीण होती. त्या बायांनीं प्रमिलाबाईला शेजारच्या वाड्यांत वर्ग चालवतांना पाहिलेलं होतं. ती पंजाबीण तेवढी त्यांना नवीन होती. 'पुढच्या सोमवारपासून त्या प्रमिलाबाई एक दिवसाआड येतील' हें त्या बायांनीं आक्कांच्या तोंडून ऐकल्यापासून आक्कांना प्रमिलाबाईसंबंधींचीं त्याचीं मतं ऐकणं भागच होतं.

'कोण ?—ती टवळी ? नग ग बया ! येत व्हती कीं शेडग्याच्या वाड्यांत ! काढली ना शेडग्याच्या सुननं तिला वाड्याच्या भाइर ! तिला म्हणतीया कशी,—तुमच्या गोठ्यांत घाण किती ! तुमच्या पडवीला मच्छर डसतात !—कायन् बाय् ! ही सोता असल वांझोटी, नाइ प्वार ना बाळ ! तवा करतीया दुसऱ्याच्या उठाठेवी ! अन् आक्का, तिचं वाचणंबी आम्हांला समजत नव्हतं बगा तुमच्या वाचन्यावानी !' द्रौपदी धायगुडेची सरबत्ती धडकली !

'अन् ती दुसरी काण व्हती ती मुसल्मानीण ?—अक्षी तुम्हांस्नी शिवून पोंटाशीं धरून ग्वाड ग्वाड गोष्टी कसल्या करीत होती ?' आक्कांच्या वाड्यांत भांडीं घासणारी अनसूयासुद्धां कडाडली.

' अग ! ती मुसलमानीण नव्हती. त्यांना काश्मीरी म्हणतात. ती लांबून लाहोरांतून आली आहे, आमल्याइकड ! हिंदूच आहे ती आपल्या-सारखी ! ' आक्कांनीं सांगितलं.

' आपल्यावाणी ? अन् कुकूवि नाय कपाळाला ? या बया ? पर बिचारी मायाळू दिसली ! आक्कावर लई जीव दिसला तिचा ! '

' होः तिच्याकरतांच मीं हो म्हटलं. येईना का ती दुसरी बाई ! तिला करायचं आहे हें काम माझ्याबरोबर ! '

' अन् आणखी का चार गोल पातळवाल्या बामणिणी येईनात या वाड्यांत ? आमच्या आक्का असल्या म्हंजी झालं ! '

' हो ! ती पंजाबी बाई तेंच म्हणत होती. एखादे वेळीं मला बरं नसलं तर मदत नाहीं का व्हायची ? '

' खरंच बया आक्का ! येऊं द्या तिला, पर म्हणावं त्वांड संबाळ ! काय तुजं लिवणं असल त्येवढंच दाव ! उगीच नसत्या गोष्टींत नग शाणपणा शिकवूं ! ' लक्ष्मी शिंदे तडजोडीदाखल म्हणाली.

आणि मग आक्कांचं वर्गाचं काम चालू झालं. कुणी ग, म, भ, न, काढलं होतं. कुणीं नुसती सहीच गिरवीत होती.–' **सखू कोंडिबा साळुंखे** ' त्यांचं ' लिवणं ' होईपर्यंत आक्का स्वतःशींच एखादं चरित्र नाहीं-तर बखर वाचीत बसत. एखाद्या दिवशीं ' त्यांच्या बाया ' त्यांना भाडेकऱ्याचा कायदाच विचारीत बसत; तर एखादे दिवशीं ' सकाळ ' मध्यें आलेली गंज पेठेंतल्या मारामारीची बातमी वाचून दाखवायला सांगत. दोन दिवसांनीं वटपौर्णिमा आली होती. एका मध्यम वयाच्या बाईनं आर्जवाच्या सुरांत थोडं भीतभीतच आक्कांना पुसल, ' आक्का ! वटसावित्रीची पोथी हाय का तुमच्या घरीं ? आमास्नी दावाल का वाचून सावित्रीची कथा ? '

आक्कांचा चेहरा थोडा गोरामोरा झाल्यासारखा दिसला. पण आपल्या बायांना दिसूं न देतां त्या म्हणाल्या, ' असेल ना घरीं आमच्या ! नाहींतर आणीन मी दुकानांतनं ! दाखवीन तुम्हांला वाचून ! '

बायांच्या चेहऱ्यावर कौतुक आणि कृतज्ञता यांची गर्दी झाली. ' नगा

बया ! आमच्यासाठीं तुमाला तरास कशाला ? असली घरीं तर आना ! नाहीं तर राह्यलं ? काय ग दुर्पदी ? '

आक्कांचं लक्ष बायांच्या शंकांकड आणि संकोचाकडे नव्हतं. त्यांना सकाळींच त्यांच्या घरीं आणि त्यांच्या वाड्यांत वटसावित्रीवरून झालेलं बोलणं आठवलं. आक्कांचं घर म्हणजे त्यांचं माहेर. त्या माहेरीं राहत असत, गेलीं आठ वर्षं. दरसाल वटसावित्रीच्या सुमाराला घरांत धुसपुस आणि वाड्यांत कुजबूज ऐकायचं आतां त्यांच्या अंगवळणींच पडलं होतं जणूं.

' तूं उपास करणार का यरवां सरल ? वडाला येणार का पूजेला ? का गेल्या वर्षासारखं पुन्हा ? भटजी विचारून गेले मघांशीं. मला काय करायचं आहे ? कांहीं का कराना ? पण वाड्यांतल्या बायकांना विषय नको यंदा पुन्हा. दुसरं कांहीं नाहीं बघ माझं म्हणणं सरल ! ' आक्कांच्या आईनं ' सूतोवाच ' करून ठेवलं होत. आक्का अशा वेळीं कांहींच उत्तर देत नसत. मायलेकींचा संवाद, अथवा फक्त आईचं बोलणं आणि लेकीचं ऐकणं चालू असतांनाच वाड्यांतल्या एका बिऱ्हाडांत तोच विषय चालला होता. भिड्यांच्या काकू सुनेला म्हणत होत्या, ' कुठें का कराना पूजा ! करा म्हणजे झालं. देवाधर्माचं नीट कराल तर देव तुमचं नीट करील. नाहीं तर शेजारच्या सरलसारखं राहायचं असलं जन्मभर माहेरीं, तर वड तरी कशाला अन् ती सावित्री तरी कशाला ? '

सरलआक्कांचं संसारसुख आतां वडाच्या हातांत असतं, तर त्यांनीं वटसावित्री तीनशें साठ दिवसमुद्धां पूजली असती. पण सावित्रीपेक्षां आणि वडापेक्षां आपल्याला आतां पावला, तर यमच एक दिवस पावेल, असा भाव सरलआक्कांच्या चेहऱ्यावर दर वटसावित्रीला उमटे. यंदाहि त्यांनीं सत्य-वानाच्या सावित्रीची पूजा करण्याऐवजीं नव्या पेठेंतल्या या फटकळ सीता-सावित्रींचीच पूजा करायचं ठरवलं होतं. पण त्यांनींच हा अवघड विषय काढल्यामुळं आक्कांना धर्मसंकट पडल्यासारखं दिसलं. पण नुसता पोथी वाचण्याचाच विषय असल्यामुळं त्यांनीं ' होय ' म्हटलं.

साक्षरतेच्या वर्गांतन घरीं यायला आक्कांना त्या दिवशीं चांगले दहा वाजले होते. घरीं आल्यावर झोप येईपर्यंत वाचायचं आणि मग अकराच्या सुमाराला दिवा मालवायचा असा आक्कांचा क्रम. पण त्या दिवशीं त्यांनीं

आईची झोप लागेपर्यंत वाट पाहून कपाटं, फळ्या धुंडाळायला सुरुवात केली होती. आक्कांच्या खोलींतली आणि पलीकडच्या हॉलमधली खुडबुड ऐकून आईनं आपल्या खोलींतन हाटकलं, 'सरे! निजायचं नाहीं का आज? काय धुंडाळती आहेस?'

सरलआक्कांनीं, 'कांहीं नाहीं!' म्हणून उत्तर दिलं, तरी तेवढ्यानं आईचं कुठून समाधान व्हायला? हॉलमधल्या फळीवरून काढलेलीं पुस्तकं आक्का पुन्हा वर चढवीत असतांच आई येऊन म्हणाली, 'कसला ग पसारा काढला आहेस? रात्रींचे अकरा होऊन गेले! असं म्हणून त्यांनीं शेजारच्या स्टुलवर पाहिलं तो वटसावित्रीची पोथी!

'सरे! पूजेला चल म्हटलं तर दर वर्षी माझं रक्त आटवतेस आणि आतां रात्रींची ही पोथी घेऊन काय कुठं पूजा सांगायला जाणार आहेस कीं काय तरी आतां मध्यान्हीला? चमत्कार आहे एक एक! चल नीज आतां, नाहींतर मी मेन स्विच् बंद करून टाकीन बत्र!'

सरलनं आपण होऊनच दिवा घालवला. त्या दिवशीं तिला वाचण्याचं समाधानहि लाभलं नाहीं. दुसरे दिवशीं हातांत कंदील, काखेला पोथी, अशा थाटांत आक्का आपल्या नव्या पेठेंतल्या केंद्राकडे जाण्याच्या तयारींत होत्या. तोंच त्यांच्या कानांवर भिड्यांच्या काकूंचे शब्द पडले. 'म्हणे सासरीं जाच आहे! आम्हांला नव्हता वाटतं जाच! म्हणून आम्हीं कांही तरण्याताठ्या वयांत मुलगा सासरीं टाकून माहेरीं तुकडे मोडायला राहिलो नसतों. कांहीं नाहीं! सासूपेक्षां सुनेचंच गुण सुनेला भोंवताहेत! हल्लींच्या पोरी! स्वतंत्र राहायची संवय! फट् म्हटलं कीं लगेच झाली ब्रह्महत्या! घातली डोक्यांत राख! आल्या माहेरीं! म्हणे रात्रीचा क्लास चालवती आहे, त्या मराठ्यांच्या वस्तींत! आम्हांला दिवसां भीति वाटते त्या पेठेची या वयांत! अन् ही तरणीताठीं, नवरा सोडलेली बाई, रात्रीं-बेरात्रीं त्या पेठेंतून आपली एकटी येते, तेव्हां काय म्हणायचं? अहो, एकदां लाज सोडली म्हणजे बायकांना भीति कुठली? ऐकलंस का? म्हणून म्हणतें—' त्या आपल्या सुनेकरितां ही सगळी उजळणी करीत होत्या—'देवधर्म, चाल-रीत वाडवडलांनीं करून ठेवलंय तें उगीच नव्हे!' सासूचं हें दैनिक प्रवचन पुरं व्हायच्या आधींच भिड्यांच्या

सुनेला रोज झोंप लागत असे. आजहि ती आतां तें ऐकायला जागी नव्हती !

◆

आज वास्तविक दिवस कु. घारपुरेचा; पण बायांनीं सावित्रीच्या कथेचा बूट काढल्यामुळं आपला दिवस नसून आक्का नव्या पेटेंत निघाल्या होत्या. सगळ्या बाया गोळा होऊन पाव्यापेन्सिली दिवाबत्ती घेईपर्यंत दहा-पांच मिनिटं जात. आक्कांच्या दिवशीं आक्का, बाया जमायच्या आधींच आंत जाऊन आलेल्या बायांशीं बोलत बसत. कु. घारपुरे मात्र बाहेरच रस्त्यावरच्या लाइट-मध्यें हातांतलं पुस्तक, नाहीं तर वर्तमानपत्र वाचीत उभी राही आणि आंतून एखादी बाई बोलवायला आल्यावरच आंत जाई. त्या दिवशीं आक्का यायच्या ठरल्यामुळं कु. घारपुरेला बोलवायला कुणी आलंच नाहीं. आंत बाया मात्र वेळेच्याहि आधीं जमल्या होत्या. त्यांच्या बोलण्याचा विषय बाहेर कु. घारपुरेला ऐकूं येत होता.

‘ आक्कास्नी ? — अन् धा वर्सांचा मुलगा ? पर खरं वाटत नाहीं बगा. इवढं त्यांचं वय ? अक्शी कालिजाच्या पोरावाणी वाटत्यात ! ’

‘ अन् घ्वार सोडून कशी राहिली बिचारी कुणाला टावं ! ’

‘ अग कान् सुखासुखी राहील सासर सोडून ? आक्कावाणी बाईतरी उगीच न्हाई सोडायची ! अन् किडं न्हाई का पडायचं आपल्या तोंडांत, उगीच त्यांच्या वाड्यांतल्या बामणिणीगत वेडंवाकडं बोललों तर ? ’

आक्कांच्या वाड्यांत कामाला जाणाऱ्या सावित्रीनं आक्कांच्या पूर्वचरित्रा-वर प्रकाश टाकला.

‘ पर मी म्हनतें असल्या सोन्यावानी बाईला टाकायला काय झालं तरी काय ? ’

‘ अवं ! ती सास्वासुनांचीं, नवराबायकोंचीं भांडणं ! तिऱ्हाइताला त्येचा काय पत्त्या लागायचाय ? पर आमच्या आक्कासारखी बाई मिळायची नाहीं बघा. वाड्यांतल्या बामणिणी रंडक्या सोता गांव भटकत्याल, पर एकांद्या माउलीचं उणं दुणं काढत्याल ! ’

‘ अग बामणाचीं माणसं ! धुवट सवळं तेवढं बघुन घ्यावं ! पर त्या जातीला माया न्हाई ! ’

आक्कांचं हें चरित्र आणि त्या अशिक्षितांनीं चालवलेली ही 'जातीय' चर्चा ऐकून कु. घारपुरेच्या डोक्यांत नवाच प्रकाश पडला. आंत जाण्याचं भान न राहून ती आक्कावरच विचार करीत उभी राहिली. तेवढ्यांत आक्का आल्या.

'प्रमिलाबाई, आज मी त्यांना वटसावित्रीची पोथी वाचून दाखवणार आहें. तुम्हांला उगीच हेलपाटा पडला. गेलांत तरी चालेल तुम्ही!'

'मग त्यांत काय मोटं! मी ऐकायला बसलें तर चालेल ना आक्का?"

'न चालायला काय झालं? पण मी सरळ पोथीप्रमाणें सांगणार! त्यांत तुमची संशोधनाची दृष्टिबिष्टि नाहीं वापरणार!'

कु. घारपुरे वटसावित्रीच्या दिवशीं 'सत्यवानाच्या जिवंत होण्याचा वैज्ञानिक अर्थ' याविषयावर एका स्त्रियांच्या आश्रमांत व्याख्यान देणार होती.

त्या दिवशीं आक्कांनीं सावित्रीची कथा थोडी वाचली; थोडी सांगितली. वडाच्या पूजेला जायला आक्का राजी नसल्या, तरी सावित्रीच्या कथेंत त्या इतक्या रंगल्या कीं, भटजींच्या तोंडून ती कथा ऐकण्याऐवजीं आक्कांच्या तोंडूनच ऐकावी असं त्या अडाणी बायांना वाटूं लागलं! पण या सर्व रसाळ निरूपणाचा परिणाम मात्र असा झाला कीं, दुसरे दिवशीं सकाळीं आक्कांनीं आपल्याबरोबर नव्या पेठेंतल्या वडावर यावं असा त्यांनीं हट्ट धरला!

'आक्का, अमीबी तुमच्या सदाशिव पेठेंतल्या वडावर आलें असतों बगा, पर राग नका धरूं, – तुमच्या बामणिणी लई द्वाड! 'शिवशील!' 'बाजूला हो!' हें चालतंया बघा सारखं! पुजा न्हायली बाजूलाच!'

दुसरे दिवशीं सकाळीं आक्कांच्या वाड्यांतल्या बायकांची वटसावित्रीला जायची एकच धांदल उडाली होती. भिड्यांची सून, गोखल्यांची थोरली सून आणि धाकटी लेक, भिड्यांच्या काकू, आक्कांची आई अन् शिवाय समोरच्या वाड्यांतल्या! खरं म्हणजे एखाद्या गल्लींत तिसाहून अधिक मुलं शाळेंत जाणारीं असलीं, म्हणजे नगरपालिकेकडून स्वतंत्र शाळा मागून घेतां येते, तसा तिथल्या सासवासुना, मायलेकी मिळून एक स्वतंत्र वड मागून घेऊं शकल्या असत्या हक्कानं! सर्वांनीं एकदम निघण्याचा बूट दरसालच निघायचा आणि अखेर सर्वच वेगवेळ्या आणि उशीरां निघायच्या. प्रत्येकीच्या सोवळ्याचा रंग वेगळा, प्रत्येकीची नेसण्याची तऱ्हा वेगळी! पण सर्वांचीं एकी जर कशांत होत असली,

तर सवाष्ण असून घरीं बसून राहणाऱ्या सरलबद्दल कुचकं बोलण्यांत ! वटपूर्णि-मेच्या दिवशीं सावित्रीच्या नांवापेक्षां त्या वाड्यांतल्या सवाष्णी सरलच्या नांवा-चाच जप अधिक करीत !

यंदां मात्र बिचाऱ्या एकदम चूपचाप ! कारण सरल त्यांच्या आधींच वेणीफणी, अंगधुणं करून तयार होती ! सासरच्या तडाक्यांतून राहिलेले दोन दागिनेहि तिनं अंगावर आज इतक्या वर्षांनीं घातले होते. तरण्या आणि म्हाताऱ्या; चार इयत्ता शिकलेल्या आणि बी. ए. झालेल्या सर्व; तऱ्हांच्या बायका त्या दोन वाड्यांत मिळून होत्या. पण सर्वांच्या कुत्सित चिंतनाचा विषय मात्र आज एकटी सरल हीच होती.

' काय मंगलाबाई ! आज वेगळाच बेत दिसतोय ! नशीब त्या सदाशिव पेठच्या वडाचं ! फारां दिवसांनीं बिचाऱ्याचे ग्रह पालटलेले दिसतात ! ' शोभना-बाई गोखले आरशांत पाहत गळ्यांतली मोत्याची ' कॉलर ' ठाकठीक करीत पलीकडच्या माडींतल्या मंगलाबाईंना म्हणाल्या. दोघीहि ' फिलॉसफी ' घेऊन बी. ए. झालेल्या आणि बी. ए. झाल्यानंतर कुटाळक्यांखेरीज सर्वच विषयांना रामराम ठोकलेल्या गृहिणींपैकीं होत्या !

मंगलाबाई आरशांत पाहत होत्या. स्वतःच्या गोऱ्यापान टवटवीत मुखा-वर ' रेमी प्रसाधनां 'चा संस्कार करीत, पाटमोऱ्यानंच त्यांनीं आपल्या जुन्या कॉलेजमैत्रिणीला तितकाच तिरकस आणि कुत्सित दुजोरा दिला. ' नशीबच म्हणा त्या सावित्रीचं आज ! पण काय हो शोभनाबाई, या नव्या नवसाच्या, फारां दिव-सांच्या पूजेपुढं आपल्या दरसालच्या शिळ्या पूजेची काय मातब्बरी ! आपण आपल्या दुसऱ्या कुठल्या तरी वडालाच जाऊं कशा ! '

पण मंगलाबाई–शोभनाबाईंचा जामानिमा पुरा व्हायच्या आंतच जेव्हां सरल एकटीच पूजेचं साहित्य घेऊन वाड्याच्या बाहेर पडली, तेव्हां सर्वांचे डोळे अधिक तिरपे आणि चेहरे अधिकच उपरोधपूर्ण झाले. पण सरल जेव्हां सदाशिव पेठच्या वडाच्या दिशेनं निघण्याऐवजीं उलट्याच दिशेनं नव्या पेठेकडे चालूं लागली, तेव्हां तर सरलच्या वाड्यांतल्या बायका अधिकच स्तिमित झाल्या !

' हें ऽऽ काय ? कुठल्या सावित्रीची तरी पूजा व्हायची आहे म्हटलं आज ? ही कुठली नव्या पेठेंतली नवी सावित्री निघाली आणखी ? का आमच्या

धुणं भांडीवाल्या सावित्रीचीच पूजा करणार आहे ही जन्मसावित्री माहेरवाशीण ?" एक हात रेशमी ब्लाउझच्या अर्धवट घातलेल्या बटणाला आणि दुसरा हात अचंब्यामुळं फुलून निघालेल्या आपल्या लालबुंद मुखड्याच्या हनुवटीला अशा 'पोज्'मध्यें मंगलाबाई उद्‌गारल्या.

आणि खरंच, नव्या पेठेंतली सावित्री, शोभनाबाईंचीं भांडीं घांसून आक्कांच्या मागोमागच निघाली होती. तिच्या मनांत तर अवघडल्या हातांनीं आक्कांनीं घेतलेलं पूजेचं सामान घेऊन आक्काबरोबर चालावंसं होतं. पण सोंवळ्यांतल्या जिनसा आपण कशा हातांत घ्याच्या, म्हणून विचारायचंहि धाडस झालं नाहीं बिचारीला! आणि तरी आक्कांच्या मागोमागच चालत होती ती.

खिडक्यांतून मंगलाबाई-शोभनाबाईंच्या परस्परच खुणा झाल्या. त्यांचं काय ठरलं कोण जाणे, पण त्याहि इतर बायकांची वाट न पाहतां तडक पूजेचं साहित्य घेऊन घाईघाईनं सरलच्या मागोमाग निघाल्या. दोघीहि चांगल्या ताडमाड असल्याकारणानं त्यांनीं सरलला लवकरच गांठली: पण गांठल्याचं दिसूं मात्र दिलं नाहीं. त्या मुद्दामच मागें रेंगाळल्या.

आज नव्या पेठेंतल्या अडाणी पण प्रेमळ वर्स्तीला एक नवंच दृश्य दिसत होतं. रात्रींच्या वेळीं जुनंपानं नेसून कंदील-पुस्तकं घेऊन नव्या पेठेंत येणाऱ्या 'बामणाच्या आक्का' आज अस्सल ब्राह्मणी थाटांत होत्या. नऊवारी रेशमी सोंवळं, रेशमीच ब्लाउझ, हातांत पूजेचं साहित्य आणि पायांत कांहीं नसल्यामुळं चालणं नेहमींच्या मानानं सावकाश; मागें दोन पावलांवर धन्यतेनं डोळे भरून पाहणारी श्रमजीवी सावित्री आणि तिच्यामागून चार पावलं चालणाऱ्या त्या वस्तींत कधींच न फिरकलेल्या त्या दोघी उंच्या पुऱ्या, गोऱ्यागोमट्या, नटून सजून निघालेल्या 'बामणिणी', – अशी ती छोटीशी मिरवणूक त्या वस्तीला थोडी अपूर्वच वाटली. पण शोभनाबाई-मंगलाबाईंना मात्र आज पाहावं तें नवलच वाटत होतं. आधीं आक्का कधीं नव्हत आज वडाला निघालेल्या. त्या रोज ज्या 'भयंकर' पेठेंत जात म्हणून ऐकलं होतं, त्या पेठेंत या दोघी प्रतिष्ठित बायांनीं प्रथमच पाऊल टाकलेलं; आणि सर्वांच्या वर नवल म्हणजे त्या पेठेंतली उभी वस्ती आक्कांना पाहायला दारा-खिडक्यांत लोटलेली! कांहीं बायका नुसत्या कौतुकानं पाहत; तर कुणी एकमेकींत 'या बया!

आक्का आपल्या वडावर चालल्यात बघा पूजेला !' असं हर्षानं म्हणत. बाहेरून आडदांड पहिलवानी पेशाचे दिसणारे गल्लींतले कांहीं म्होरके चपापून बाजूला होत, तर कांहीं जण लवून आदबीनं आणि प्रेमानं आक्कांना रामरामहि करीत. हें दृश्य पाहून तर आक्कांच्या वाड्यांतल्या त्या दोघी जहांबाज बायका थिजतहि आणि जळतहि ! पण आज आक्का या 'झाडाच्या' पूजेला चालल्या असल्या तरी चार महिन्यांमागें झालेल्या निवडणुकींत आक्कांनीं दुसऱ्या एका ( समाजवादी ) 'झाडाला'च या आडदांड पेठेंतून दीडशें मतं मिळवून दिलीं होतीं, याची खबर त्या सुखवस्तु गृहिणींना कोठून असणार ?

अखेर ही छोटी मिरवणूक नव्या पेठेंतल्या वडावर येऊन पोहांचली. वडावर बहुतेक बायका मराठा आणि इतर जातींच्या होत्या. एकदोघीच, जागेच्या टंचाईमुळं नव्या पेठेंत राहणाऱ्या, ब्राह्मण बिऱ्हाडांतल्या बायका होत्या. पोथी सांगण्याला आलेले भटजीहि साधेसुधे, काळेबेरे — ज्यांचं 'प्रॅक्टिस' सदाशिव पेठेंत नीट चालत नव्हतं असे खेडवळसेच होते. आणि तरी ते पहिल्या प्रथम ब्राह्मण स्त्रियांची पूजा उरकून नंतरच त्या इतर जातींतल्या स्त्रियांकडे वळणार होते.

आक्कांच्या वाड्यांतल्या बायकांना आतां प्रश्न पडला. या मराठ्यांच्या बायकांच्या गर्दींत सामील व्हायचं, कीं आक्कांच्या पदयात्रेचा छडा लागल्यावर आतां मागच्या पावलींच परतायचं ? पण एवढ्यांत त्यांच्या मागून दोन बाया येत असलेल्या त्यांना दिसल्या. त्यांतील एक ब्राह्मण होती, पण ती पूजेला चाललेली दिसली नाहीं. आणि तिच्याबरोबर कुजबुजत चाललेली दुसरी तर धड मराठाहि दिसत नव्हती. तिच्या कपाळाला कुंकू असूनहि ती हिंदु वाटत नव्हती. स्त्री असूनहि ती स्त्री वाटत नव्हती. ती एका वयस्क ब्राह्मण स्त्रीशीं बोलत आहे याचंदेखील नवल वाटावं, इतकी ती वेगळ्या वस्तींतली आणि राहणींतली दिसत होती. आक्का वडापर्यंत पोहोचायच्या आंतच ती स्त्री झटकन् पुढें सरसावली आणि आक्कांच्या जवळ जाऊन कायसं बोलली. आक्कांच्या मागं आतां सावित्रीहि नव्हती.

'बघा म्यां आक्कास्नी आनलं का नाय ?' असं म्हणत सावित्री आधींच वडापाशीं गेली होती !

आक्कांनीं एकदां आश्चर्यानं आणि तुच्छतेनं त्या अनोळखी स्त्रीकडे पाहिलं आणि मागें अंतरावर असलेल्या त्या ब्राह्मण स्त्रीकडेहि पाहिलं. त्या पुढच्या असंस्कृत स्त्रीकडे त्यांनीं तुच्छतेनं पाहिलं, तर तिच्याबरोबरच्या पोक्त ब्राह्मण स्त्रीकडे पाहतांना त्या जणूं आपल्याला संपूर्ण गत आयुष्याकडे आणि भविष्याकडेच खिन्न नजरेनं पाहत आहेतसा भास झाला. त्यांच्या हातून पूजेचं साहित्य गळून देखील पडलं असतं, पण लगेच त्यांनीं स्वतःला सांवरलं आणि त्या पुढं चालूं लागल्या. ती बाई चरकून बाजूला सरली; पण तिचं तोंड चालूच होतं. ' दादल्याकडे नांदाया नग, अन् वडाला चाललिया भवानी ! कुणाची माळ गळ्यांत घातलियास – अन् कुणाचं तें चांदीचं फुलपात्र ? फीर माघारीं ! तुझी सासू बघ ततं हाय उभी, तुला बोलावतीया ! '

वास्तविक त्या सासूला पुढं जाऊन आपल्या सुनेला बोलवायला कांहींच हरकत नव्हती. पण आपली सून आपल्याला भीक घालीत नाहीं हें तिला माहीत होतं. ' मोठी समाज-सेवा चालवली आहे बयानं ! तिच्या ' समाज-सेवे 'ची तिच्या पेठेंतच शोभा करतें मी ! ' असा चंग बांधून आक्कांच्या सासरची ही बया एक इरसाल स्त्री-हस्तक घेऊन आली होती, त्या दिवशीं ! हो ! नव्या पेठेंत जायचं तेव्हां नव्या पेठेंतल्या बायकांनाहि पुरून उरेलशी बाई हवी हाताशीं !

आक्कांच्या बायांना झाडाजवळून नीट कळेना काय चाललंय तें. एवढ्यांत मागून घाईघाईनं कु. घारपुरे येत होती. आदले दिवशीं रात्रीं तिनं बायांच आणि आक्कांचं झालेलं बोलणं ऐकलं होतं. तिला अद्याप त्या अडाणी, मळकट, बायांचं प्रेम नव्हतं वाटूं लागलं; तरी त्यांचं जिच्यावर प्रेम होतं, तिच्यावर मात्र तिचं प्रेम बसलं होतं. रात्रीच्या बैठकींत असं ठरलं होतं कीं क्लासांतल्या सगळ्या बायांनीं वडावर यायचं. वास्तविक त्यांतल्या एक दोघी विधवा होत्या. कु. घारपुरेच्या मनांतहि या सगळ्या बायांची ही सार्वजनिक वटपूजा पाहायला जायचं होतं ! पण ती पडली कुंवारीण ! आणि शिवाय तिनं त्याच वेळेला एका स्त्रियांच्या आश्रमांत ' सावित्रीच्या कथेचा वैज्ञानिक अर्थ ' या विषयावर व्याख्यान द्यायचं पत्करलं होतं. तें व्याख्यान उरकून ती घाईघाईनं आक्कांची बहुजनसमाजवादी वटपूजा पाहायला येत होती. आपण आपल्या व्याख्यानांत सत्यवानाच्या जिवंत होण्याचा जो आधुनिक अर्थ सांगितला, तो

ती आक्कांना मोठ्या अभिमानानं सांगणार होती. आक्का वडावर पोहोंचायच्या आंतच आपण त्यांना गांठलं, म्हणूनहि तिला थोडा हर्ष झाला होता. आक्कांशीं लगट करणाऱ्या बाया बहुजनसमाजांतल्याच असाव्या असं तिला दुरून वाटलं होतं ! पण जवळ येऊन पाहते तो तिला त्यांतली एक स्त्री ब्राह्मणच असल्याचं दिसलं आणि दुसरी स्त्री म्हणजे बहुजनसमाजाचं दुसरंच एक टोक असल्याचं दिसलं. ती स्त्री आतां आपल्याबरोबर आलेल्या ब्राह्मण स्त्रीच्या विद्यमानं चांगल्याच अश्लील शिव्या देत होती ! व जबरदस्तीनं सरलच्या गळ्यांतले जिन्नस काढण्याची धमकीहि देऊं लागली होती.

आक्कांसारख्या सोज्वळ आणि बाणेदार बाईला ती स्त्री, ऐकवत नाहींत अशा शिव्या देत आहे हें पाहून कु. घारपुरेच्या डोक्यांत वामनरावांच्या कादंबऱ्यांतून शिरलेलं सगळं सामाजिक तत्त्वज्ञान पार थिजून गेलं. अशा हलकट वर्तनावर लागू पडणारं रामबाण तत्वज्ञान म्हणजे त्या बाईचं थोबाड ठेचून काढणं हेंच, हेंहि तिला कळत होतं. एखादा मांगगारुडी जातींतली बाई तिच्या हातांतलीं 'मनीबॅग' उडवून पळाली असती, तर तिचा पाठलाग करण्याइतपत धमक कु. घारपुरेच्या अंगीं होती; पण एखादी स्त्री लाज आणि भय दोन्ही सोडून एखाद्या सोज्वळ बाईला घाणेरड्या शिव्या देऊं लागली तर जें काय करायचं, तें थंडपणें करण्याइतपत ती अजून वास्तव जगाला सरावलेली नव्हती !

आक्कांच्या क्लासच्या वाड्याची मालकीण लांबूनच या लढाईचा रागरंग ओळखून वडापासून आक्का होत्या तिथपर्यंत धावूनच आली. आक्कांच्या डोळ्यांत जणूं ठिणग्या चमकत होत्या. समाजाचं आणि स्त्रीत्वाचं एक ओंगळ रूप पूजेला जातांना आडवं आलं, म्हणून लगेच कु. घारपुरेप्रमाणं त्यांचे हातपाय गळाले नव्हते. समोरच्या दोन्ही बायांचीं कंबरडीं एकेका लाथेनं मोडून त्याच पावलीं पुढें जाण्याची धमक त्यांच्या तुच्छतेच्या नजरेंत दिसत होती. त्या हलकट वस्तींतल्या स्त्रीनं अंगाला नुसता हात लावण्याचं धारिष्ट केलं असतं, तर कांहीं कारणानं स्वतःवर घालून घेतलेल्या बंधनाचं आक्कांना भानहि राहिलं नसतं. पण वाड्याची मालकीण तिथं धावत येऊन पोहोंचली, तेव्हां आक्का नुसत्या दाहक दृष्टीनं पाहत होत्या त्या दोघी ओळखीच्या बायांकडे !

'क्वान हैती या सटव्या व आक्का! अन् तुमच्या नजरेला नजर देऊन बोलण्याची काय है यांची पुण्याई! आक्का, तुम्ही नुसतं 'हं' म्हना कीं दोघींचींबी हाडं मोडत्यात का नाई बगा!' मालकीणबाई आक्कांपेक्षां त्या दोघी बायांकडे पाहतच कडाडल्या.

त्या बाईला त्यांच्या आक्कांचं चरित्र कळायचा अवकाश, कीं आक्कांच्या समाजसेवेचं दिवाळं वाजणार अशा अटकळीनं त्या दोन अनोळखी बायांतली ब्राह्मण स्त्री म्हणाली, 'वडसावित्री पूजते आहे! मोठी सती सावित्रीच कीं नाहीं? नवऱ्याजवळ नांदायचं नाहीं तर मग वडसावित्री ग कशाला तुला?'

'हें सर्व बोलणं आपल्या चांगलं ओळखीचं आहे.' अशी चर्या करून आक्का थंड पण कठोर वृत्तीन, शांत उभ्या होत्या. वाड्याच्या मालकिणीनंच एकंदर हकीकत झटकन् ओळखून त्यांच्याऐवजीं उत्तर दिलं, 'अग हे टावं, मोटं शास्तर सांगतियास तें! नवरा असतो का काय पुजायचा वडपुनवला? पूजा करायची असतिया वडाची आन् सावित्रीची! सोडतीस वाट त्या सवाष्णीची का घालूं एकेकीच्या कंबरंत लात? म्हणं नवऱ्याजवळ नांदायला नग! आक्का-सारखी सावित्री नांदवायला पुन्याई लागती, है टावं! बिचारींच्या संसार-सुखांत तर कालवलीच माती, अन् पुजेच्याबी आड येतां व्हय टवळ्यानु? कुठं फेडाल ही पापं!' असं म्हणून ती बाई त्या दोघींपैकी त्या हीन जातीच्या बाईच्या अंगावर प्रथम चालून गेली. मालकीणबाईचा अवतार पाहूनच त्या दोघी बाया चरकल्या आणि मागें सरल्या. आक्का पूजेच्या साहित्यासह मालकीणबाईबरोबर पुढें चालूं लागल्या.

हा सगळा अनपेक्षित देखावा पाहून सुखवस्तु शोभनाबाई-मंगलाबाई चांगल्याच चरकल्या! 'कुठल्याकुठं आपण या मसणवटींत आलों!' असं त्यांना वाटलं! पूजा राहिली अन् वड राहिला, केव्हां एकदां आपण घर गांठतों असं झालं त्यांना! सरलच्या गळ्यांतल्या मोहनमाळेऐवजीं आपल्या गळ्यांतली मोत्यांची कॉलर व हातांतल्या सोन्याच्या बांगड्याच कुणी काढून घेतंय असा त्यांना धाक पडला! आणि ती एकाएक इरसाल शिवी ऐकून तर त्यांच्या पोटांत गोळाच उठला! या माडीच्या खिडकींतून त्या माडीच्या खिडकींत ऐकूं जाईलसं कुचकं बोलणं वेगळं, आणि गलिच्छ अश्लील शिव्या ऐकून थंड राहणं वेगळं! त्यांना क्षणभर सरलचं कौतुकहि वाटलं आणि थोडी तिची

भीतीहि वाटली. त्या झपाझप मागच्या पावलींच परतल्या. अडाणी वस्ती जसजशी मागें पडत गेली तसतशी त्यांची भीतीहि कमी होत गेली. आणि भीति कमी झाली तसतसे त्यांचे कुचके नासके वेतहि पुन्हा त्यांना आंठवूं लागले.

'शोभनाबाई!' मंगलाबाईनीं जणूं हर्षाची उकळी येऊन शोभनाबाईंचा डावा हात पकडला. 'शोभनाबाई! चांगलंच नाटक पाह्यलं कीं आज आपण बिनपैशाचं! 'पूजा करणारणीचीच झाली चांगली जोड्यानं पूजा!' म्हणून सांगू आतां दोन्ही वाड्यांतल्या बायकांना! चांगला ब्राह्मणाचा वड सोडून नव्या पेठेंत कशाला गेली ही मरायला कोण जाणे!'

'खरंच, जोड्यानं पूजा म्हणालांत तुम्ही मंगलाबाई तें अगदीं खरं! कारण दोघी जणी होत्या त्या सरळची पूजा करणाऱ्या!' आपण खूप मोठा विनोद केला अशा फुशारकीनं शोभनाबाईनीं मंगलाबाईंचा उघडा दंड दाबला! 'पण हा फार्स पाहतां पाहतां चांगलाच उशीर झाला कीं आपल्याला! आतां वडसावित्रीला द्यायचा फाटा! अन् सरळ घरीं जाऊन फराळाच्या जिनसांवर ताव मारायचा!'' शोभनाबाई आपल्या मनगटावरच्या सोनेरी रिस्टवॉचकडे पाहत म्हणाल्या!

त्या दोघी हे कुत्सित वेन रचीत सदाशिव पेठेची वाट चालत होत्या, तेव्हां आपल्या बायांसमवेत आक्का निर्वेधपणें वडाची पूजा करीत होत्या.

शहरांतल्या शंभर वडांवर पाहिलेल्या पूजांहून ती पूजा वेगळीच होती. शहरांतील शंभर वडांवर चाललेल्या प्रार्थनांहून आक्कांच्या प्रार्थनाहि वेगळ्या होत्या!

जिला आपला पति यमापासून मागून घ्यायचा नव्हता, 'जल्मोजल्मीं' परत मागून घेण्यासारखं सुखच जिला या जन्मीं लाभलं नव्हतं, आणि तरीहि जिच्या हृदयांतलं बहुजनसमाजासंबंधींचं प्रेम आणि जिचं समाजसेवेविषयींचं औत्सुक्य ताजं टवटवीत राहिलं होतं, तिची प्रार्थना कोणती असेल?— तिची वटपूजा कशी असेल?

त्या अडाणी भाबड्या बायांना आणि त्या भोळसर भटजीला बाहेरून तिची पूजा इतरांच्या पूजेसारखी दिसत असली, तरी अक्कांची वटपूजा निराळी

होती; आणि नकळत त्या नव्या पेठेंतल्या वडाखालीं एक नवीन वटपूजा निर्माण होत होती.

एक नव्या धैर्याची आणि नव्या प्रार्थनेची सावित्री, त्या नव्या पेठेंत जन्माला येत होती. मेलेला सत्यवान नव्हे, मेलेली सावित्री पुन्हा जिवंत होत होती.

सत्यवानाच्या पुनरुत्थानाचा ओढून ताणून बसवलेला वैज्ञानिक अर्थ विसरून कु. घारपुरे आतां या सावित्रीच्या पुनरुत्थानाचं चिन्तन करीत होती. केव्हां एकदां आक्कांची ही वटपूजा चव्हाणमास्तरना आणि कौसल्यादेवीला जाऊन सांगेन, असं तिला झालं होतं !

७

# प्रायश्चित्त-विवाह

ज्येष्ठांतच सुरू झालेल्या सरींनीं आज श्रावणांत थोडी उघडीप दिली होती. पुणें शहराला वेढून वाहणाऱ्या मुठेच्या क्षीण पात्राला आषाढ-श्रावणांतील वार्षिक मस्ती चढली होती. आडव्या येणाऱ्या लकडी पुलाच्या अडथळ्यानें अधिकच खवळलेलें मुठेचें लालबुंद पाणी संभाजी उद्यानांत घुसेल कीं काय अशी भीति वाटत होती. सकाळचें आकाश निरभ्र असलें तरी सभोंवतालचीं तरारलेलीं झुडुपें, स्वच्छ धुऊन निघालेलीं घरें, पावसाळ्याची जाणीव करून देत होतीं.

रविवारीं सकाळीं निश्चित गांठ पडेल म्हणून जंगलीमहाराज रोडवरच्या एका गृहस्थांना गांठण्याकरितां मी अगदीं लवकर उठून बाहेर पडलों होतों. पण तोच विचार करून ते दुसऱ्या कुणाकडे गेल्याचें त्यांच्या घरधनिणीनें सांगितल्यावर सैल चालीनें पायींच परत निघालों होतों. संभाजी बागेच्या प्रवेशाजवळ, तशाच रिकामपणच्या मुशाफरीवर निघालेल्या माझ्या बालपणच्या मित्रानें – विश्वास शिंदेनें – मला हाताला धरून बागेंत नेलें. इतक्या निरुद्योगी, निरुद्देश मनःस्थितींत त्यानें मला पकडलें होतें कीं, 'वेळ नाहीं' ही नेहमींची सबब सांगणेंच अशक्य होतें. एखाद्या जुन्या मित्राजवळ जिव्हाळा भरपूर असला, — पण त्याचे आपले व्यवसाय अगदीं भिन्न असले, म्हणजे गांठ

पडल्यावरहि ' बोलायचं काय ' ही पंचाईतच असते. मनांतून या संकटांत पण बाहेरून मोठ्या औत्सुक्यांत कुशल प्रश्न विचारीत मी माझ्या जुन्या मित्राच्या खांद्यावर हात ठेवूनच बागेतल्या बांकापर्यंत येऊन पोहोंचलों. वेळ सकाळची, दिवस पावसाळ्याचे. संभाजी बागेंत येणारे आमच्यासारखे वेडे आज थोडेच निघायचे! एकेका ताटव्याजवळ एकेक दाई गोऱ्या-गोमट्या मुलांची बाळगाडी खडी करून माळ्याशीं चकाट्या पिटीत होती. दूर पर्वतीची टेकडी हिरवी साडी लपेटून उभी होती. समोर ओंकारेश्वराच्या घाटावर दोन चिता – उघडीप असल्यानें निर्विघ्नपणें – धगधगल्या होत्या !

बोलायला दोघांत समान विषय नसल्यानेंच कीं काय, मी पावसाळ्यांत बोलक्या बनलेल्या सृष्टीकडे आतुरतेनें पाहत होतों. पण आजच्या पुण्याच्या धिसाडघाईच्या राहणींत तिचीहि ओळख विसरल्यासारखी झाली होती! समोरच्या आंब्याच्या झाडावर पंख झाडीत आहे तो ' भार्गवराम कीं कोकीळ ? ' ही शंका माझ्या कलावंत मित्राला – विश्वास शिंदेचा बुधवार चौकांत फोटो स्टुडिओ होता – विचारावी म्हणून म्हटलें, ' कायरे ! तो भार्गवरामच का ? बघ कसा पंख झाडतो आहे ! तुझ्या कॅमेऱ्याला शिकार आहे आज ! करणार का ' शूटिंग ' ? '

' आधीं ' ती ' शिकार बघ ! – ' अगदीं उलट दिशेकडे, बागेच्या दाराकडे पाहून माझा मित्र म्हणाला.

बागेच्या फाटकांतून म्हाताऱ्या मोलकरणीच्या खांद्यावर हात ठेवून एक तरुण स्त्री मोठ्या कष्टानें पावलें टाकीत होती. टॅक्सीवाल्याचे पैसे चुकते करण्यांत दोन मिनिटें गुंतलेला, तिच्याबरोबर आलेला तरुण त्या दोघींच्या मागून तितक्याच मंदगतीनें चालूं लागला. त्या तरुण सुखवस्तु जोडप्याच्या मानानें त्या म्हाताऱ्या मोलकरणीच्या तोंडावरच उल्हास आणि गोडी अधिक दिसत होती.

तें जोडपें आमच्या अंगावरून गेलें, पण मोलकरणीखेरीज त्या तिघां-तल्या कुणीं आमच्या बाजूला डोळे वळवले नाहींत. त्या तरुण बाईची नजर सकाळच्या निरभ्र आकाशावर खिळली होती. अन् तो पुरुष तर कुणाची तरी नजर टाळतोयसेंच वाटत होतें. शक्य असतें तर तो बागेच्या दुसऱ्या टोकालाच जाऊन बसला असता; पण आपल्या अधू बायकोला अधिक त्रास नको म्हणून

त्यानें जवळच्याच एका मोकळ्या बाकाकडे बोट केलें. तीं तिघेंहि बसलीं. त्यांतलें बोलत कुणीच नव्हतं. बागेंत मुलें घेऊन आलेल्या दाया त्या अभागी सुंदरीकडे पाहून हळहळत होत्या.

" बाळातपणांत पाय गेल म्हनं ! " पिचकारी टाकून त्यांतली एकजण पुटपुटली.

" अग ! कशाचं बाळातपण ? लग्नालाच उभी राह्यली बया दुसऱ्या बायांच्या खांद्यावर हात देऊन ! मला ठावं न्हाय् का काय ! ती म्हातारी आमच्या गांवचीच हाय् ना ! समदं ठावं हाय् मला ! "

माझी त्या जोडप्याशीं ओळख नसली, तरी मला त्यांची ऐकून माहिती होती. पायांनीं अधू असलेल्या मुलीशीं एका गोऱ्यागोमट्या सुखवस्तु तरुणानें लग्न केल्यामुळें त्या लग्नाची कथा पुण्यांत अनेकांच्या तोंडीं होती. त्या जोडप्याच्या दिशेनेंच पाहत मीं म्हटलें, " याला म्हणावं खरं प्रेम ! एवढं व्यंग असलेली वधू नुसत्या प्रेमाखातर पत्करणं ही साधी गोष्ट नाहीं. " त्या जोडप्याला इतक्या जवळून इतक्या स्वस्थपणें मीं कधीं पाहिलेलें नव्हतं. माझ्यांतलें कारुण्य, दाक्षिण्य, ध्येयवादित्व... उफाळून आलें. त्या तरुणीच्या नुसत्या सौंदर्यानेंहि एखाद्याच्या भावना उचंबळून आल्या असत्या: मग त्या सौंदर्याला दुर्दैवाची आणि ध्येयवादाची प्रभावळ लाभल्यावर......

तिचें तें व्यंग ती उभी आहे तोंवरच जाणवत होतं. बसल्यावर ती जणूं ज्याचा रंग अद्याप वाळला नाहीं, अशा एखाद्या ' पेंटिंग ' सारखी भासूं लागली. तकतकीत तांबूस गौरवर्ण, विशाल भाबडे डोळे, किंचित् उन्नत कपोलास्थि, कमानीसारख्या भुंवया, गोड जिवणी, सरळ नाक, कपाळावर, मानेवर वळणदार विपुल केंस, सुबक मांसल अंगलट... या सर्व वैभवांत तिच्या शून्य दृष्टीनें पडलेली ती जहरी भर......या सर्वांमुळें ती एखाद्या करुणरम्य चित्राप्रमाणें भासत होती.

" तुम्हां साहित्यिकांना कुठें प्रेम दिसेल अन् कुठं दाक्षिण्य वाटेल याचा नेम नाहीं ! " माझ्या मित्रानें माझी तंद्री मोडली.

" म्हणजे काय ? प्रेमाकरतां नव्हे...ध्येयवादाकरितां नव्हे, तर मग त्यानें तिच्याशीं कशाकरतां लग्न केलं ? तिचे पाय लग्नापूर्वीपासून अधू होते हें तर खरं ! " मीं माझ्या मित्राच्या अश्रद्धपणाची कींव करीत विचारलें.

" होती ना ? दोन्ही पायांनीं अधू होती ! नाहीं कोण म्हणतो ? अन् तरी तिच्याशीं लग्न करण्याचं कारण मात्र......प्रत्येक पुरुषाच्या लग्नाचं जे कारण तेंच !...अर्थात् मूर्खपणा ! "

" छट् ! दुसरं कांही कारण असल्याशिवाय असलं व्यंग कोण पत्करील ? प्रेम !...प्रेमाखातर माणूस शंभर दोष विसरूं शकतो !.. ...तुला ब्राउनिंग कवीच, निदान चित्रपटावरून तरी माहीत......"

" तुझे ते कवि असूं दे तुझ्याजवळच !...पुरुषाला लग्न करायला कारण लागत नाहीं ! पुरुष मूर्ख असतो, पागल असतो अन म्हणून लग्न करतो ! त्यांतल्या त्यांत तुमचे ते कवि, ते चित्रकार, ते गायक, ते नट...ही मंडळी तर अशा मूर्खपणाचे उस्तादच म्हणेनास !......तूं पाश्चात्य वाङ्मयच फक्त वाचलं असशील, पण मी पाश्चात्य जग फिरून आलोय् धंद्यानिमित्त ! तिकडे चित्रकार म्हटले कीं, ' मॉडेल 'शीं लग्न करायचं हें आपलं ठरल्यासारखं !- अन् ती तरी कोरी कुमारिका ? अरे, ती दुसऱ्याजवळ राहिल्याचें ठाऊक असून करतात !...कां करतात ? कुणींच सांगूं शकणार नाहीं ! आपल्याला काय वाटतें कीं, चित्रकारापुढें ' मॉडेल ' म्हणून बसणाऱ्या बाहुलीवजा, स्वत्वशून्य जातीशीं सदैव संबंध असल्यामुळें या कलावंतांना तसल्या बाहुल्यांचा वीट येत असेल, तर बिलकूल नाहीं ! ते त्या बाहुल्यांना आपल्या पुढे बसव बसव बसवतात; अन् अखेर त्यांच्याबरोबरच बोहल्यावर चढतात. ' Artists' Wives ' हें पुस्तक वाच. इतकं सुंदर, इतकं वास्तव आणि इतकं न्यायनिष्ठुर पुस्तक माझ्या तरी पाहण्यांत दुसरं नाहीं !...आतां,—या आपल्यासमोरच्या जोडप्याच्या बाबतींत मात्र जरा वेगळी गोष्ट आहे – जरा ' ट्रॅजिक 'च आहे ते. अरे या पोरीनं एक ' फार्स् 'च करून दाखवला – फार्स म्हणण्यापेक्षां आपल्या पुराणांतल्या आत्माहुतीच्या प्रसंगासारखं तिनं एक ' अति शोकनाट्य ' करून दाखवलं म्हणेनास ! खरं सांगायचं म्हणजे तिनं लग्नाच्या एका सौद्यांत आपलं सर्वस्व पणाला लावलं !---

आतां, तूं म्हणशील ती प्रामाणिक होती का ? म्हणजे, तिचं या माणसावर खरं प्रेम होतं का ? पण तें अशा प्रकारांत कुणीच हमखास सांगूं शकत नाहीं. बायकांच्या कृतींतला किती भाग भावनेचा आणि किती भाग त्यागाचा हें ब्रह्मदेव देखील सांगूं शकणार नाहीं. भावनांचा प्रामाणिकपणा बायकांत

नेहमींच असतो; पण त्यांच्या त्या भावनाच मुळीं क्षणिक असतात! तेवढ्या वेळापुरत्या एकनिष्ठ आणि प्रामाणिक असतात! बायका ज्या काय उत्कट, उलट्या काळजाच्या, भक्तिमान्, उदात्त अगर क्षुद्र बनतात, त्या अशा क्षणिक भावनांच्या इशाऱ्यानुसार बनतात. अन् त्यांना स्वतःला त्याची जाणीवहि नसते. 'अनृतं साहसं माया' असं मनुस्मृतींतच म्हटलें आहे ना? खोटें नाहीं तें. बायका सदैव खोटं बोलत असतात,—सहजगत्या बोलतात, अनिच्छेनें बोलतात, विचार न करतां बोलतात, पण खोटं बोलतात हें खरं आहे! इतकं सगळं असूनहि त्यांच्यांत पुरुषांच्याहूनहि भावनात्मक सचोटी अधिक असते हें कबूल केलं पाहिजे. कारण जीवनांत त्या जे निर्णय घेतात ते घोर, अगम्य, तर्क-विरुद्ध आणि अतर्क्य असतात. आपलं पुरुषांचं तर्कशास्त्र, आपला सावधपणा आणि आपले स्वार्थी हिशेब त्यांच्या अतर्क्य आणि अघोर कृतींपुढें लटपटून जातात. पुरुषांना स्त्रिया कायमचें कोडें वाटण्याचें कारण म्हणजे स्त्रियांचे हे अतर्क्य आणि आकस्मिक निर्धारच होत! अन् मग आपण स्वतःलाच विचारीत बसतों :—"ह्यांच हें सगळं खरं समजायचं कीं नाटक समजायचं?"

बाबारे! त्यांचें खरें वागणें आणि त्यांचे खोटें नाटक एकमदच चालू असतें! कारण एकाच वेळीं परमावधीचें उत्कट आणि परमावधीचें मायावी असणें अन् फिरून दोन्हीहि नसणें, हा तर स्त्रीचा मूळ स्वभाव! अन् हाच 'अनृतं साहसं माया...' या मनुवचनाचा अर्थ!

पुरुषांकडून आपले हेतु साध्य करून घेण्याकरतां त्या जे मार्ग योजतात तेंच पाहा ना!—अगदीं त्यांतले शुद्धांत शुद्ध मार्ग घे. ते कुटिलहि असतील आणि सरळहि असतील. त्यांचे मार्ग इतके कुटिल असतील कीं पुरुषांना त्यांची कल्पनाच करतां येणार नाहीं; पण पुन्हां ते इतके साधे असतील कीं इतक्या साध्या चेंडूला आपण 'आऊट्' गेलों म्हणून अखेर पुरुषानें स्वतःची कींवच करावी!

अन् बाबारे! जेव्हां नवरा मिळवायचा असतो तेव्हां तर आपलें खरें करून दाखवल्याशिवाय राहणारच नाहींत त्या!

अरे! पण आपल्या समोरच्या जोडप्याची गोष्ट तशीच राहिली कीं!

ही पोरगी चित्राचं मॉडेल नव्हती—शिष्यीण होती—दचकूं नको. तुमच्या साहित्याच्या आणि कॉलेजांच्या जगाचें नाहीं मी सांगत.—हा तिचा

नवरा म्हणजे प्रसिद्ध म्युझिक डायरेक्टर दौलतराम पर्वतकर आहे! अन् ती त्याची शिष्यीण–मूळची मंजुळा नार्वेकर–आतां सुनेत्रा पर्वतकर. मुंबई रेडिओवरून सुगम संगीत गात असे ना मागें! आतां या अवघड 'चिजे'ला हात घातल्यामुळें थांबलें तिचें तें सुगम संगीत!...ती देखणी होती – चलाख होती आणि बांधा तर रविवर्म्याच्या रंभेसारखा होता बत्र. आतांच्या तिच्या वांकण्यावर आणि भकास डोळ्यावर जाऊं नकोस!... पण सांगावयाची गोष्ट म्हणजे आपल्या गुरूजवळ रागापेक्षां ही अनुरागाचाच अधिक 'रियाझ' करूं लागली. ती खरीखुरी प्रेमांत पडली, कीं प्रेमाचा अभिनय करीत होती, हें तिचं तिलाहि सांगतां येणार नाहीं. पण स्त्रियांनीं नुसता अभिनय केला तरी पुरुष खरंच प्रेम करायला प्रारंभ करतो! बाकीं,–कुठलीहि बऱ्यापैकीं स्त्री वरचेवर नजरेला पडली कीं पुरुष प्रेमांत पडतोच. कारण स्त्रियांना दोनच अभिनय ठाऊक असतात–एक 'नफरत' तरी, नाहींतर 'मोहब्बत' तरी! पण त्या दोन्हींत तिचा मुख्य उद्देश आपल्या चेहऱ्याला मोहक आकार देण्याचा असतो,–आपल्या देहाला नृत्यांतली मोहक 'मुद्रा' किंवा 'पोज' देण्याचा असतो. मूर्ख बिचारा पुरुष! ती आपल्यावर लुब्ध आहे असा याचा अर्थ करतो. हा झाला त्याचा एक मूर्खपणा; पण दुसरा मूर्खपणा म्हणजे एखादी स्त्री 'आवडली' याचा अर्थ ती आपल्याला जन्माची हवी आहे असा तो करतो. ही 'जन्माच्या सोबतीची' भूक आपल्याला दरमहा एका तरी नव्या स्त्रीबद्दल वाटलेली आहे हेंहि त्याला ठाऊक असतें. इच्छा तृप्त झाली कीं आकर्षणाचं रूपांतर शिसारींत होत असतं, हाहि अनुभव त्याला आलेला असतो. सबंध जन्म दुसऱ्या मनुष्यप्राण्याबरोबर काढायचा, म्हणजे त्याला एका घटकेंत विरणारं नव्हे, किडणारं–! श्वानयोनींतलं आकर्षण पुरेसं नाहीं,–दोन जिवांचं आणि स्वभावांचं सख्य हवं आहे हेंहि तो जाणतो. आकर्षणाच्या झपाट्यांतहि त्याला तें मनाचं मीलन आहे कीं केवळ इंद्रियांना चढलेली धुंदी आहे हें ठरवतां यायला हवं, वास्तविक.

तें कांहींहि असो, आपलं तिच्यावर प्रेम आहे अशी या कलावंतानं समजूत करून घेतली आणि एकनिष्ठेची मनोमन शपथ घेतली.

"पण ही स्त्री भुरळ पडण्यासारखी होती हें मात्र खरं. पुण्याच्या मुलींना सहज अवगत होणारी वरवरच्या तरतरीतपणाची कला तिला माध्य

होती. ती लाडिकपणें बोले आणि अर्थशून्य वाक्यं अशा गोड पद्धतीनं उच्चारी कीं तींच मोठ्या चातुर्याचीं वाटावींत! आणि अंगविक्षेपांत तर तिचा हातखंडा असे. चित्रपटाच्या छायाचित्रणांत शंभर ‘ Retakes ’ घेऊनहि ज्या ‘पोजेस्’ जमणार नाहींत, त्या ती जातां जातां घेई. तिचं नुसतं हात उचलणं, वांकणं,– सहज टॅक्सीचं दार उघडणं – फार काय, नुसतं ‘ येतें बरं का ! ’ म्हणून हात जोडणं......प्रत्येक गोष्ट जणूं ठेक्यांत आणि रेखीव असे.

‘ इतर चार गोंडस मुलींसारखीच ही ! ’ असं तिच्या या नवऱ्याला त्या काळांत दुसऱ्यांनीं सांगितलें तरी कळत नसे.

अखेर त्यानं त्या उन्हाळ्यांत खंड्याळ्याला एक बंगला भाड्यानं घेतला.

माझा या माणसाचा पुष्कळ दिवसांचा घरोबा. एक दिवस माझा मुक्काम खंड्याळ्याला त्याच्याचकडेच होता. अन् त्या दिवशीं प्रथमच या गृहस्थाच्या मनांत तिच्या या अखंड अभिनयासंबंधीं शंका आली !

त्या रात्रींचं गूढ वैभव मला अजून डोळ्यांपुढें दिसतं. मींच त्या दिवशीं धरणाच्या कांठीं फिरायला जायचा बूट प्रथम काढला. त्या शांत, सुस्त, अफाट जलाशयांतलं पाणी पिठासारख्या चांदण्यांत लकाकत होतं. पाण्याच्या कांठा-कांठानं फिरत असतां, त्या स्वप्नप्राय दृश्यानं मनांत अंकुरलेल्या अज्ञात सुखसंवेदनेनं आम्हांला किंचित् उन्माद चढल्यासारखा झाला होता. आपण आज अतिमानुष कृतीहि कदाचित् करून जाऊं, असं जणूं मनांत येत होतं. आपल्या काव्यमयतेंतून निर्माण झालेल्या एखाद्या कल्पित सुंदरीच्याच प्रेमांत आज आपण पडूं...असं वाटत होतं. विचित्र भावना, आकांक्षा आणि हुरहुरी उरांत उसळत आहेत, अशी चमत्कारिक जाणीव होत होती. आम्ही निःशब्दपणें पावलं टाकीत होतों आणि त्या ‘ बेमिसाल ’ रात्रीच्या उत्तेजक वायुलहरींनीं पुलकित होत होतों. तो शीतल चंद्रप्रकाश जणूं आमच्या देहाच्या आरपार जाऊन आमच्या अंतरात्म्याला तृप्तीच्या गुलाबपाण्यांत बुचकळून काढीत होता. एवढ्यांत त्या तरुणीच्या आकस्मिक चीत्कारानं माझ्या समाधीचा किंचित् भंग झाला.

“ ई ऽ ऽ ! दौलत ! पाहिलांत का – केवढा मोठा मासा उसळून व आला तो ऽ ! ”

तिचा तो चीत्कारयुक्त उद्‌गार दौलतच्या कानांत शिरलाच नाहीं! तिच्याकडे तोंडहि न वळवतां तो म्हणाला—

" होय, पाहिला मंजू! "

झालं! तिची मर्जी गेली.

" नाहींच पाहिलंन मुळीं! तुमची तर तिकडे पाठ होती! " ती चिडक्या आवाजांत म्हणाली.

तो हंसला. त्यानें गुन्हा कबूल केला. " अगदीं बरोबर मंजू! आत्तांची रात्र इतकी मोहक आहे कीं, माझ्या डोक्यांत आत्तां कशाचाच विचार नाहीं."

ती कांहींच बोलली नाहीं. पण क्षणभरांत तिला जणूं बोलल्याशिवाय चैनच न पडून तिनं विचारलं,

" दौलत! तूं उद्यां मुंबईला जातो आहेस? "

" कोण जाणे! " तो गंभीरपणें म्हणाला.

ती अधिकच चिडली. " मला वाटतं, फिरायला जायच आणि बरोबरच्या लोकांशीं बोलायचं नाहीं यांत तुला मोठा पुरुषार्थ वाटतो! माणूस शुद्धींत असेल तर बोलेल ना? "

तो कांहींच बोलला नाहीं; अन् मग दौलतला कशानं चीड येईल तें जणूं स्त्रियांच्या जन्मजात अंतर्दृष्टीनें ओळखून, जें गाणें रेडिओवर दर चार दिवसांनीं ऐकून आपले कान किटले,...आपल्या रसिकतेचा ज्या गाण्यानें अवमान केला, असे एक भिकार, चीड आणणारें गाणें गुणगुणायला तिनें प्रारंभ केला.

" माफ कर मंजू!–कृपा करून गाऊं नको! " तो भीत भीत पुटपुटला.

तिनें चिडून हल्ला परतवला, " मी काय म्हणून गप्प बसावं? "

" मंजू, तूं अशा रुपेरी रात्रींत माती कालवते आहेस! "

अन् मग काय विचारतोस? परस्परांना विटलेल्या नवराबायकोंतच पाहायला सांपडेल, असा ठरीव किळसवाण्या मूर्खपणाचा फर्मास ' सीन् ' झाला. दोघांनींहि तोंडाला येतील त्या उखाळ्यापाखाळ्या काढल्या; परस्परांवर वाटेल

ते आरोप, मागचा पुढचा विचार न करतां केले, अन् शेवटीं दोघेहि ओक्साबोक्शीं – माझ्या देखत रडले! अगदीं प्रेमाचं साग्रसंगीत नाटक झालं त्या चांदण्यांत. मौज ही कीं त्यानं तिच्या तोंडाच्या तोफखान्याला अडथळा म्हणून केलाच नाहीं. – मग त्या चांदण्या रात्रीनें तो मुग्ध झाला म्हणून असो, कीं तिच्या बेताल बोलण्यानं गुदमरून गेला म्हणून असो, ऐकत होता बिचारा !

दोन-तीन महिने गेले या 'सीन्' नंतर. मग त्याला थोडी शुद्ध आली, नखशिखान्त जखडणाऱ्या या अदृश्य रेशमी जाळ्याशीं झगडायला! तिनें आपला जेवढा म्हणून पगडा होता त्याच्यावर तेवढ्या सगळ्याचा उपयोग त्याला दाबांत ठेवण्याकरितां आणि त्याचें जिणें असह्य करण्याकरितां केला. त्या पावसाळ्यांतसुद्धां ते खंडाळ्यांतच राहिले. कारण बिऱ्हाड हलवायचें कुणीं? सकाळपासून संध्याकाळपर्यंत भांडत असायचे बिचारे! भांडण, शिव्याशाप आणि अखेर डोकेफोड!

अखेर त्यानं तो नरकवास संपवायचा आणि चालू लागायचं असं ठरवलं. मुंबईच्या दोन हिंदी चित्रनिर्मात्यांशीं करार होणार होते, ते त्यानं घाईघाईनें मिळतील त्या अटींवर करून टाकले; त्यांच्याकडून आगाऊ रकमा घेतल्या, मित्रांकडून कर्ज काढलं; अन् पंधरा हजार रुपये उभे केले!

पांच हजारांच्या नोटा, पांच हजारांचीं कॅश सर्टिफिकिटं अन् पांच हजारांची पॉलिसी इतकं तिच्या मनीबॅगमध्यें घालून ती तिच्या उशीखालीं सरकवली. उशीवर एक पत्र लिहून ठेवलं आणि तिला कायमचा रामराम ठोकला.

बिचारा निर्वासित होऊन माझ्या आश्रयाला आला एके दिवशीं सकाळच्या प्रहरीं पुण्याला! दुपारीं तीन वाजतां मी स्टूडिओंत फोटोची निगेटिव्ह पाहात होतों; दौलत बाहेरच्या कोचावर झोंपला होता. सहा महिन्यांत आज त्याला स्वस्थपणानें झोंपायला सांपडलं होतं!

बाहेर दरवाजाची घंटा वाजली. त्याची झोंपमोड होऊं नये म्हणून मी झटकन् बाहेर झालों दार उघडायला, – गिऱ्हाइक कॉपी न्यायला आलं असेल अशा कल्पनेनं. जातां जातां झोंपलेल्या दौलतच्या वनवासी चेहऱ्याकडे पाहून कींव आली मला बिचाऱ्याची.

मीं दार उघडलं. दारांत एक स्त्री उभी होती, ती मला घसटूनच आंत सटकली. मंजूच होती ती !

त्याला याचं स्वप्न आधींच पडल्यासारखा तो तयार होऊन उभा राहिला.

तिनं तें पत्र, त्या नोटा, ती पॉलिसी त्याच्या पायाशीं ऐटीनें फेकली आणि ती कोरड्या पडलेल्या आवाजांत म्हणाली, " हे तुमचे पंधरा हजार. आग लावा त्यांना ! "

ती नखशिखांत कांपत होती. तिचे गाल कापरासारखे पांढरेफटक पडले होते. ती आज काय करील त्याचा नेम नाहीं अशा अवस्थेंत दिसत होती.

तोहि संतापानं, उद्वेगानं पांढराफटक पडला होता. आणि त्याच्या डोक्यांत कांहींतरी भयंकर कृति घोळत होती.

'तुला काय हवं आहे?' त्यानं विचारलं. तिनं उत्तर दिलं, 'मला बाजारच्या बाईप्रमाणं वागवतां येणार नाहीं तुम्हांला. तुम्हांला मी हवी होतें, तेव्हां तुम्हीं तुमची इच्छा पुरवून घेतलीत. मीं तुमच्यापासून कांहींच मागितलं नव्हतं. तुम्ही मला टाकूं शकत नाहीं, '

त्यानें डोळे फाडून पाहिलं, दांत आवळले आणि जोरानें उजवा पाय फरशीवर आपटला. त्या साल्स गायकाला अशा भेसूर अवतारांत मीं कधींच पाहिला नव्हता.

" मी सांगतां, आतां हें फार झालं. मंजू! तुला वाटत असेल..."

केसांची 'पोनीटेल्' सोडलेल्या मंजूच्या गोऱ्यापान मानेशीं गेलेला दौलतचा हात मींच घट्ट धरला. मंजू मात्र एक रेसभर सुद्धां मागें सरकली नव्हती.

दौलतला मागं कोचाकडे सारून मी मंजूजवळ गेलों. गरिबीच्या, मायेच्या शब्दांत तिला चार समजुतीच्या गोष्टी सांगितल्या;—बाकी अशा प्रकारांत नवीन तें काय सांगायचं असतं म्हणा! प्रेमिकांच्या संवादांत जसा सर्व दुनियाभर एकच मजकूर असतो, तसं नवराबायकोंच्या, प्रेयसी-प्रियकरांच्या, भांडणांत ऐकवायचं शहाणपण जगाच्या आंरंभापासून तेंच आहे !

तीहि ऐकत होती !—एक अक्षर न बोलतां, तारवटलेल्या डोळ्यांनीं नाकासमोर पाहात निश्चलपणें आणि हट्टीपणें उभी होती माझ्यासमोर!

माझं सर्व शहाणपण सांगून झालं, पण या नाटकाचं आनंदपर्यवसान होण्याचं मात्र चिन्ह दिसेना. तेव्हां शेवटचा राखीव बाण म्हणून मीं सोडला—" मंजूताई, तुम्ही मला माझ्या धाकट्या बहिणीसारख्या!...म्हणून माझं ऐका,—दौलतचं तुमच्यावर अजूनहि प्रेम आहे; पण, पण – त्याच्या घरच्या मंडळींची इच्छा त्यानं लग्न करून टाकावं अशी आहे." एवढं म्हणून मीं तिच्या नजरेला नजर भिडवली, अन् आपोआपच खालावलेल्या आवाजांत म्हणालें, " लक्षांत आलं ना मंजूताई ?"

ती दचकल्याप्रमाणें एक पाऊल मागं सरली. आणि कांपऱ्या, घोगऱ्या आवाजांत म्हणाली, " अस्सं ! आत्तां आलं माझ्या ध्यानांत..." अन् मग दौलतकडे वळून ती म्हणाली, " तुम्ही...तुम्ही काय लग्न करणाऽऽर ?"

" हो–य ! " तो करारी स्वरांत उद्गारला.

ती त्याच्या दिशेनें एक पाऊल पुढें सरकली आणि म्हणाली,

" तुम्ही लग्न कराल तर मी जीव देईन, समजलांत ? " तिच्या मानेला आपोआप एक झटका बसला.

त्यानं तुच्छतेनं पाहून म्हटलं,

" फार छान, – देच तूं जीव ! "

" काय म्हणालांत ?— काय म्हणालांत ? पुन्हां उच्चारा बरं !... "

त्यानें पुन्हा उच्चार केला—

" हो–य ! तुझी इच्छा असेल तर खुशाल जी–व–दे ! "

तिचा चेहरा प्रेतासारखा पांढराफटक पडला. आवाज संतापानं घोगरा येऊं लागला. " मी नुसत्या तोंडच्या गोष्टी करीत आहे असं समजूं नका ! मी या मजल्यावरून उडी घेईन. "

तो मोठ्यादां हंसला; सरळ खिडकीपर्यंत गेला. त्यानें खिडकी पुरती उघडली आणि एखाद्या पाहुण्याला दरवाजा उघडून देतांना लवतात, तसं आदबीनं लवून तो म्हणाला—" हं ! या, अशा या ! "

तिनं त्याच्याकडे थोडा वेळ रोखून पाहिलें. वेड लागलेल्या, नाहींतर अंगांत आलेल्या बाईचे डोळे जसे तर्र दिसतात तसे दिसले तिचे. अन् मग उंच उडीच्या शर्यतींत एखादा सराईत गडी जसा किंचित् मागें सरून एकदम

तीरासारखा धांवतो, तशी ती आम्हां दोघांच्या डोळयांसमोरून धांवली आणि खिडकीपुढील कठड्यावरून पार झाली !

एका स्त्रीचा देह जिच्यांतून बाहेर पडत आहे, अशा त्या सताड उघड्या खिडकीचें दृश्य अजून माझ्या डोळ्यांपुढून हालत नाहीं. रोजचीच खिडकी, पण मला त्या दिवशीं जणूं आकाशाच्या पोकळीसारखी अफाट अन् भकास वाटली. नकळत दचकून मी मागें सरलों. नुसतं वांकून खालीं पाहण्याची देखील छाती होईना !

दौलत तर जणूं चक्कर आल्यासारखा कांहीं न करतां उभा होता.



दोन्ही पाय मोडलेल्या त्या दुर्दैवी बाईला मीं स्टुडिओच्या मागच्या बागेंतून आंत उचलून आणली. जन्माची पांगळी झाली बिचारी !

दौलतनें अर्थातच तें सगळं पाप आपल्या माथीं घेतलं. त्या घोर घटनेनं त्याला वेडच लागायचं बाकी राहिलं. त्यानं सपशेल माघार घेतली. तिला परत घरांत घेतली, अन् लग्न लावलं तिच्याशीं.

अशी हकीकत आहे बरं बाबा, या लग्नाची ! – याला आतां प्रेमविवाह म्हणा, नाहीं तर 'प्रायश्चित्त-विवाह' म्हणा, तुम्ही साहित्यिक !"

असं म्हणून माझा हात धरूनच उठला तो. तें जोडपं अद्यापहि शून्य दृष्टीनं पाहत त्याच बाकावरच बसलं होतं. समोरच्या घाटावरच्या चिता आतां शांत झाल्या होत्या.

मीं त्या विलक्षण स्त्रीकडे एकदां शेवटचं पाहून घेतलं. मला अद्यापहि तिच्याबद्दल कींव वाटत होती; त्या जोडप्याच्या विलक्षण हकीकतीवरून 'पुरुष मूर्ख असतो म्हणून लग्न करतो' हा माझ्या मित्राचा सिद्धांत पटण्याऐवजीं मला दुसराच एक प्रश्न सतावूं लागला. ज्याची एक गोष्टहि आपल्या पसंतीला येत नाहीं, ज्याच्याशीं क्षणभरहि पटत नाहीं, अशा नवऱ्याशीं या मंजूसारख्या चमत्कारिक स्त्रिया लग्न कां करतात ? छळण्याकरतांहि या बायकांना खास पसंतीचं माणूस हवं असतं कीं काय ?

पलीकडच्या ताटव्याजवळ सकाळचीं मुलं जाऊन नवीं बाळं आणि नव्या दाया दिसत होत्या. बागेंतील झाडावर टपोरे गुलाब, लालबुंद डाळिंबं लटकलेलीं

दिसत होतीं. हिरवळीवर कोंवळ्या उन्हांत लोळणाऱ्या त्या गोऱ्यापान मुलांचे लाल लाल गाल पाहून मी मनांत म्हटलं—

"या गुलाबासारखीं, या डाळिंबासारखीं हीं गोड मानवी फुलंफळंहि जर झाडाला लागत असतीं, तर दौलतासारख्या दुर्दैवी नवऱ्याचं रक्षण करणं थोडं सोपं नसतं का झालं?"

कारण, विश्वासनं मला दाखविलेली त्या गाजलेल्या प्रेमविवाहाच्या आंतली आग, आतां माझ्या अंतरंगांत त्या घाटावरच्या चितांहूनहि अधिक भडकली होती!

८

# आंतली गांठ

एका इंग्लिश लेखकानें कित्येक व्यक्तींत दिसून येणारी — नसते दोष स्वतःच्या अंगीं आहेतसें भासविण्याची — हौस वर्णिली आहे. कित्येकांस बहिरे असण्याचा बहाणा करावासा वाटतो. कित्येक दोन वेळ भरपूर स्नानसंध्या करूनहि नास्तिक असल्याची ग्वाही देतात, तर कित्येक आपल्या बायकोच्या ताटाखालचें मांजर असूनहि, बायकोस उठतां लाथ बसतां बुक्की असें करण्याचें पाप पदरांत घेण्यास उत्सुक असतात. एवढी दोषांची आवड कां? याचें मात्र त्या बिचाऱ्यास कोडें पडलें आहे. आपल्या मगदुराप्रमाणें या दोषाभिरुचीची उपपत्तीहि त्यानें बसविली आहे.

मला सांप्रत ज्या एकदोन विचित्र आवडींचा अनुभव येत आहे त्या सदर लेखकाला कळत्या, तर त्यानें त्याचेंहि खास मार्मिक वर्णन केलें असतें व त्यांना वाढवणाऱ्या मनोभूमीची पारखहि त्याला मजहून खास अधिक साधली असती. तथापि, मन मोकळें केल्याखेरीज राहवत नाहीं, एवढ्याचकरिता मी आज माझ्या अनुभवाचें यथाशक्ति निवेदन करणार आहें.

मला सुदैवानें अत्यंत प्रेमळ मित्र लाभले आहेत. अडचणींत उपयोगी पडणें, सुखदुःखांची चौकशी करणें वगैरे कर्तव्यांत त्यांच्याइतके दक्ष मित्र

कुणाला क्वचितच लाभत असतील. मलाहि मदतीची व सहानुभूतीची अत्यंत अपेक्षा असल्यामुळें मी मनांतून त्यांना शतशः धन्यवाद देत असतों, या वाढत्या अन्योन्य स्नेहभावांत वास्तविक खळ पडण्याचें कारणच नव्हतें. परंतु मध्येंच आमच्या स्नेहाला दृष्ट लागली, ध्यानींमनींहि नसतां, माझे एक मित्र माझ्यावर मी आंतल्या गांठीचा आहे असा आरोप करूं लागले. एवढेंच काय, पण सर्वांनीं मजजवळ आपलें हृदय खुलें करावें अन मीं मात्र कोणास कांहीं थांग लागूं देऊं नये, याबद्दल मजवर कृतघ्नतेचाहि आरोप ठेवूं लागले. मी तर गांगरूनच गेलों. वस्तुतः, माझ्या प्रेमळ मित्रांशीं मी शक्य तितक्या प्रेमळपणानें वागत होतों. असें असून माझ्यावर हा गहजब ! यावरून मी त्यांच्या व माझ्या वर्तनांचा बारकाईनें मागोवा घेतला. असें करण्याचा पहिला मार्ग म्हणजे त्यांच्या ' मोकळेपणा 'चा छडा लावणें. त्यांनीं मन मोकळें म्हणजे काय केलें होतें ? त्यांच्या माझ्या परिचयाचे पहिले दिवस, परिचयाचें स्नेहांत झालेलें रूपान्तर, हळूहळू एकमेकांच्या हृदयांत प्रवेश वगैरे सर्व अवस्था माझ्या डोळ्यांपुढून चित्रपटाप्रमाणें सरकल्या ! तक्रार करणारांतील प्रमुख, माझे मित्र मधुमाधव यांच्याबरोबर मी चौपाटीवर घालविलेली चांदणी रात्रहि आठवली. मीं लपविलेलं मला कांहींच सांपडेना: तरी त्यांनीं उघडलेलें हृदय मात्र मला हळूहळू दिसूं लागलें.

त्या रात्रीं त्यांनीं सुमारें दहापासून दोनपर्यंत स्वतःचे तीन व आपल्या चौघा मित्रांचे आठ मिळून एकंदर अकरा प्रेमभंगाचे इतिहास साद्यंत सांगितले होते. वास्तविक एका रात्रीत हें उरकायचेंच नव्हे; परतु त्यांतील कित्येक प्रेमकथांचे प्रांत एकमेकांना भिडले होते, तर कांहींचे प्रदेश समाईकहि होते. कोठें एका स्त्रीनें दोघांचीं हृदयें भंगून टाकल्याचें समजलें, तर कोठें एका व्यक्तीचे दोन प्रेमभंग (एकाच गोळीनें दोन पक्षी मारावे त्याप्रमाणें) एकाच मुलीच्या बाबतींत झाल्याचें समजलें. त्यामुळें एवढा गुंतागुंतीचा हा प्रेमभंगाचा इतिहास पण एका ' चांदरातीं 'त सांगण्याइतपत संक्षिप्त होऊं शकला ! प्रत्येक प्रकरणाच्या प्रारंभीं व शेवटीं माझे सन्मान्य मित्र मला ' हे अर्जुना ! हे गुह्यात् गुह्यतम असें ज्ञान मी तुला म्हणून देत आहें ' असें बजावून सांगत व दर वेळीं मी उपकाराच्या ओझ्याखालीं अधिकच खचें. कित्येक दिवस आपल्या तोंडून ह्या गुप्त हकीकती फुटून आपण फुकट मित्रत्वास मुकतो कीं काय, अशी दहशत

मला बसली होती. वास्तविक ही दहशत व्यर्थ होती. कारण लोकांना सांगण्या-इतपत हा प्रेमब्रह्माचा घोटाळा माझ्या ध्यानांतच आला नव्हता व शिवाय यात्र मित्रांच्या अनेक शत्रुमित्रांच्या तोंडून हा इतिहास इतक्या लोकांना माहीत झाला होता कीं, सांगायचाच म्हटल्यास मला तो एखाद्या अनोळखी पांथस्थांस अडवून ऐकवावा लागला असता. उलट, मलाच या हकीकती फिरून सांगायला येणाऱ्या अनेक व्यक्तींची मला निराशा करावी लागली! तें कांहीं असलें तरी माझ्या सन्मान्य मित्रांनीं मला हृदयदर्शन घडवून उपकृत केलें होतें, हें मी कधींच नाकबूल करीत नाही. पण त्यांनीं हृदय उघडलें म्हणजे माझ्या हृदयांतील 'गांठ' सिद्ध झाली असें थोडेंच होतें! मजवर हा आळ आला कसा व मी यांतून मुक्त होणार कसा हा प्रश्न फिरून राहिलाच.

इकडे माझ्यावरील दोषारोप नुसत्या पुनरुच्चारानेंच दृढमूल होत चालला! प्रथम पुराव्याची अपेक्षा तरी दाखविली जाई; पुढें पुढें तीहि कोणी दाखवीना. माझें नांव निघतांच लोकांस 'आंतली गांठ' हे शब्द आपोआप आठवूं लागले. 'आंतल्या गांठीचे' हें माझें आडनांव पडणार कीं काय अशी भीति वाटण्याजोगी परिस्थितीहि एकवार उत्पन्न झाली! पण तेवढ्यांतच एक दुसरीच भानगड उपस्थित झाली व त्यामुळें माझा हा दोष मागें पडला.

ती भानगड कोणती हें येथें सांगितलें पाहिजे. या सुमारास माझें लग्न झालें. यांत माझ्या दृष्टीनें तरी भानगड अशी कांहीच नव्हती व माझ्या मित्रांच्या दृष्टीनेंहि असण्याचें कारण नव्हतें. कारण त्यांपैकीं कांहींचीं लग्नें प्रेमभंगा पूर्वींच झालीं होतीं तर कांहींचीं प्रेमभंग चालू असतां ठरत होतीं. माझ्या लग्नांत पार्श्वभूमीदाखल प्रेमभंगाची भानगड नव्हती एवढेंच त्यांच्या माझ्या लग्नांत अंतर. तरी लग्न झाल्यापासून माझ्यावरील कांहीं नवीनच दोषारोपाची कुजबूज ऐकूं येऊं लागली. प्रथम स्पष्ट कांहींच कळेना व माझ्या आरोपकांनाहि ठाऊक नसावें. कोणी माझी बायको 'माझ्या मानानें' (मी गोरा नसूनहि!) काळी म्हणून नाक मुरडीत. कोणी आपल्या कुटुंबाच्या मानानें माझ्या बायकोस अशिक्षित ठरवीत. तर कोणी लग्नांत वाजंत्री लावल्याच्या निमित्तानें मला स्वतःलाच अडाण्यांत काढीत. लग्नापासून कुठें तरी बिघडलें आहे, एवढें माझ्याहि ध्यानांत आलें. पण काय बिघडलें तें मात्र उमगेना.

कर्मधर्मसंयोग असा कीं, आमच्या मित्रांचे डोळे आमच्या दोषावर खिळण्यास व आम्हां वधू-वरांची दृष्टि नूतन मोहानें अधू होण्यास एकच गांठ पडली. यामुळें आधींच थोडासा एकमार्गी असलेला मी पुरताच बावचळलों! आणि माझ्या पत्नीवरून मजवर येऊन थडकणाऱ्या आरोपांची संख्या व गुंता-गुंत चक्रवाढीनें वाढूं लागली. मी अविवाहित असतां माझ्या खोलींत खुलेपणानें वावरणाऱ्या सुधारलेल्या मित्रभार्या आतां माझ्या बायकोकडेहि येईनात!

खरोखर, बायको नसती तर अशा स्थितींत मी अगदींच एकटा पडलों असतों!

बरें, ज्या बायकांशीं तोलून माझी बायको माझे मित्र कमी ठरवीत त्यांच्या-वर तरी ते मोठे फिदा होते असें थोडेंच होतें? माझ्या लग्नापूर्वी ते मजकडे येत तेव्हां आपापल्या बायकांच्या तक्रारी घेऊनच येत व त्यांच्या बायका येत त्याहि 'तिकड'च्यां गाऱ्हाणीं 'इकडे' पोंचवण्याकरतांच!

मला समजेना कीं, अशा क्षीण सौभाग्याच्या आणि मंद गृहसौख्याच्या जोरावर ही मंडळी माझें नवोदित सौख्य कसें कमी ठरवूं पाहात!

पण त्यांचें सौभाग्य आणि गृहसौख्य कमी असो वा जास्ती असो. एवढी गोष्ट खास कीं, त्यांच्या कुजबुजीमुळें आमचें उभयतांचें कूजित मात्र बेसूर होण्याचा रंग दिसूं लागला.

मागें जसा चांदण्यांत माझ्या भग्नहृदय मित्रांना मी घेऊन बसे, तसाच आतां एक दिवस माझ्या नूतन पत्नीला घेऊन बसलों असतां, आम्हीं दोघांनीं या गोष्टीचा छडाच लावावयाचें ठरविलें. थोड्याच परिचयांत माझ्या पत्नीनें माझ्या मित्रांची पूर्ण पारख केली आहे असें मला दिसून आलें. हा विषय निघण्याची ती जणूं वाटच पाहत होती. अखेर आमचें नवीन धोरण ठरवूनच आम्ही चौपाटीवरून घरीं परतलों. आणि सांगायला आनंद वाटतो कीं, आमचें नवीन धोरण अचूक लागू पडलें! आम्हां उभयतांवरील आरोप झपाट्यानें धुऊन निघूं लागले. जो तो आमच्यांत सुधारणा होत असल्याबद्दल बोलूं लागला. चौपाटी-वरील चांदण्यांत जुन्या-नव्या प्रेमभंगाविषयीं गोष्टी निघण्याऐवजीं, बिघडलेलें जोडपें कोणीं सुधारलें, याची चर्चा होऊं लागली. कोणी माझ्या बायकोला सुधारून माणसांत आणल्याचें श्रेय घेत, तर कोणी माझी 'आंतली गांठ' सोडण्याचें कौशल्य आपलेंच म्हणून ग्वाही देत! फार काय, गोरेपणा हाच

जिचा टळक गुण अशी माझ्या एका मित्राची बायको, जेव्हां माझी बायको 'तितकीशी काळी नाहीं' म्हणूं लागली, तेव्हां तर आमचें धोरण पूर्ण यशस्वी ठरलें याबद्दल मला शंकाच उरली नाहीं.

आमचें धोरण ठरलें त्या रात्रीपासून आम्ही दुसरें कांही केलें नाहीं. मी माझ्या सन्मान्य मित्राजवळ माझाहि एक (काल्पनिक) प्रेमभंग कबूल केला! तर इकडे माझ्या पत्नीनें एका मित्र-पत्नीस माझ्या उदासीन वृत्तीचा वृत्तान्त स्पुंदून सांगितला अन् माझी 'लग्नापूर्वीची कांही भानगड असावी' अशी शंकाहि प्रकट केली! मीं तर याहूनहि एक बहार केली. रहस्य भेदास उत्सुक म्हणून विख्यात असलेल्या एका मित्रास 'अत्यंत गुप्त' म्हणून वर लिहून एक तेरा पानी पत्र धाडलें व त्यांत बायकोच्या बाबतींत मी सर्वस्वी हतभागी असल्याचें जाहीर केलें. या पत्रांत माझ्या संसाराचें मीं केलेलें सुरस व चमत्कारिक वर्णन येथें समग्र देण्याचें कारण नाहीं. त्यांतील शेवटच्या वाक्यावरुन माझ्या हृदयाविष्करणाची कल्पना होईल–"प्रिय सुरेश! ही घोरपड गळ्यांत आहे तोपर्यंतहि जीव देण्याचीहि चोरी झाली आहे. नाहीपेक्षां तुझ्यासारख्या जिवाला जीव देणाऱ्या मित्रांचा वियोग पत्करूनहि मीं जीव दिला असता, इतका मी या विवाहापासून दुःखी झालो आहें, यांत काय तें उमज!"

माझ्या नूतन पत्नीच्या मदतीनें कां होईना अखेर माझ्या मित्रांचे मनोरथ मला उमगले; व त्यांच्या म्हणण्याप्रमाणें आम्ही दोघेहि 'आंतली गांठ' सोडून हृदयें खुलीं करूं शकलो, याबद्दल आजकाल मी माझ्या पत्नीचें व परमेश्वराचे उपकार मानीत असतों. तथापि, त्यांच्या त्या विचित्र मनोरथांची उपपत्ति बसवण्यांत मात्र मजप्रमाणेंच माझ्या चतुर पत्नीलाहि हात टेकावे लागत आहेत हें कबूल केलें पाहिजे!



# सेतुपार्वती

## प्लेटॉनिक् प्रेम

पुण्याच्या पूर्वभागांतील एका गजबजलेल्या चौकांतून पुढं गेल्यावर एका गलिच्छ बोळाच्या तोंडाशीं 'संस्कृत-निष्ठ हिंदी विद्यालय' अशी पाटी लटकलेली दिसली असती. तुम्ही पश्चिम भागांत राहणारे असाल तर या बोळांत जाण्याचं तुमच्या जिवावरच आलं असतं. बोळाच्या तोंडाशीं मुतारी; आणि बोळाचं दुसरं तोंड कुठं आहे,—कीं त्याला दुसरं तोंडच नाहीं,—याचा पत्ता नाहीं. दिवसाच्या ठराविक वेळांना, त्या अरुंद बोळांतील म्हशींच्या रहदारीमुळं घाबरट पादचारी माणसांना आणि धाडशी सायकलवाल्यांना दुतर्फाच्या वाड्यांच्या पायऱ्यांचा आश्रय घ्यावा लागायचा. अशा स्थितींत त्या बोळांतच वस्ती असणारांखेरीज तिथं कोण शिरणार ? पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे, आज ऐन तिन्हीसांजच्या वेळीं तो बोळ नीटनेटका पोशाख केलेल्या तरुणांनीं आणि समारंभाचा साज चढवलेल्या युवतींनीं भरून गेलेला होता. तुम्हीं धिटाईनं बोळाचं आंतलं ठोंक गांठलं असतंत, तर 'त्वष्टा कासार धर्मशाळा' अशी पाटी असलेला एक भव्य वाडा तुम्हांला दिसला असता. आजची तिन्हीसांजची गर्दी या वाड्याच्या रोंखानंच चालली होती.

म्हणजे या वाड्यांत कुणाच्या लग्नाचा जानवसा होता असं मात्र नव्हे.

धर्मशाळेच्या पाटीशेजारींच 'संस्कृतनिष्ठ हिंदी विद्यालया'ची पाटी आणि विद्यालयाच्या सातव्या वाढदिवसानिमित्त स्वागताचीं सोनेरी अक्षरं लटकवलेलीं दिसलीं असतीं. थोड्याच वेळांत बोळाच्या तोंडाशीं अध्यक्षांची गाडी येऊन थडकली. आजच्या सातव्या वाढदिवसाचं महत्त्व त्या नूतन विद्यालयाच्या जीवनांत काय असेल तें असो; त्याचं महत्त्व विद्यापीठांतील लोकप्रिय अध्यापिका कु. गार्गी अभ्यंकर हिच्या जीवनांत कांहीं वेगळंच होतं खास. या विद्यालयाची आजची प्रगति त्याचे संस्थापक धीरेंद्र वर्मा यांच्या त्यागामुळं आणि चिकाटी-मुळं जितकी झाली होती, तितकीच ती कु. गार्गी अभ्यंकर या तडफदार पदवीधर तरुणीमुळंहि झालेली होती. कु. अभ्यंकर बी. ए. झाल्यापासून या विद्यालयांत शिक्षिकेचं काम करीत होती. इथं काम करीत असतांनाच ती नागपूर विद्यापीठाची एम्. ए. झाली; नुकतीच 'पंडित' परीक्षेंत ती पहिली आली होती; आणि आतां बनारसच्या एम. ए.ला बसण्याचा ती विचार करीत होती. इतक्या परीक्षा देतांदेतां ती कन्यादशेंतून युवतिदशेंत केव्हां शिरली हें तिला कळलंहि नाहीं. पण तिला कळलं नाहीं, तरी तें लोकांना कळायचं कसं राहील? गार्गी अभ्यंकर ही आपल्या आडनांवापेक्षां स्वतःच्या नांवानंच विद्यालयांत अधिक प्रसिद्ध होती. 'गार्गीबाई आल्या,' 'गार्गीबाई गेल्या', 'गार्गीबाई आल्या नाहींत' यासारख्या साध्या गोष्टींचा निर्देश करतांना विद्या-लयांतल्या तरुणांच्याच काय, पण तरुणींच्या चेहऱ्यावरहि एक प्रकारच्या धन्यतेची छटा उमटे. नुकतीच पंचविशी ओलांडलेल्या गार्गीला निसर्गानं कांहींच कमी केलेलं नाहीं, हें कुणींहि कबूल केलं असतं.

टवटवीत, तकतकीत कांति असलेल्या गार्गीच्या उंच शरीरयष्टीला निसर्गानं जणूं लुसलुशीत पारदर्शक परिवेष्टन कायमचंच दिलेलं आहे असं वाटे. दिवसाच्या कोणत्याहि प्रहरीं ती ताजीतवानी दिसे. तिची चालण्याची ढब, तिची मान झुकवण्याची तऱ्हा, एकाच खांद्यावर रुळणारी तिची पिंगट रेशमी केंसांची भरदार वेणी, तिचा किन्नरा आणि कांहींसा अँग्लो-इंडियन स्त्रियांसारखा कोरींव आवाज, या सर्व सरंजामामुळं ती त्या आडबाजूच्या विद्यालयाची जणूं 'रौशनी' बनून राहिली होती. गार्गी अभ्यंकर आल्या-बरोबर विद्यालय भरल्यासारखं वाटे; गार्गी अभ्यंकर आली नाहीं तर एखादा समारंभ नीट साजरा झाला नाहींसा वाटे. गार्गीबाईसंबंधीं एखादं तरी वाक्य

बोललं नाहीं तर मुलींना दिवस वायां गेल्यासारखं वाटे !

मुख्य पाहुणे महामहोपाध्याय गदाधर मुजुमदार यांची ओळख करून देण्याचं काम आज गार्गीबाईकडेच आलं होतं. विद्यालयांतल्या कुणाहि अध्यापक-अध्यापिकेपेक्षां गार्गीबाईच्या भाषणाची छाप अधिक पडतच असे, पण विद्यालयाचे मुख्याध्यापक धीरेंद्रजी यांचंहि भाषण तिच्यापुढं कधीं कधीं फिकं पडे. तिच्या भाषणाची वाट पाहणं, तिच्या भाषणाची छाप पडणं आणि मुख्य पाहुण्यांकडून तिच्या भाषणाची वाहवा होणं, या गोष्टी आतां इतक्या ठरून गेल्यासारख्या झाल्या होत्या, कीं कांहीं वेगळं घडलं असतं तरच तो समारंभ गाजण्याचा क्षधिक संभव होता !

—आणि आज घडलंहि तसंच !

महामहोपाध्याय गदाधर मुजुमदार यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत गार्गीबाईच्या भाषणाची स्तुति केली असली, तरी समारंभाचा शेवट ज्या आभाराच्या भाषणानं झाला त्यानं अध्यक्षच काय, पण सारा श्रोतृसमाज हालून गेला. तें भाषण अध्यक्षांच्या भाषणानंतर झाल्यावर अध्यक्ष आपल्या भाषणांत त्याचा उल्लेख कसा करणार ? पण आभार मानणाऱ्या त्या तरुण वक्त्यानं आपलं सात मिनिटांचं भाषण संपवतांच अध्यक्षांनीं मुद्दाम त्याचं नांव विचारून ओळख करून घेतली.

आभार मानणाऱ्या त्या तरुण अध्यापकाचं नांव होतं, जगदीश चौहान. जगदीश चौहान या विद्यालयांत काम करूं लागल्याला अद्याप पुरे सहा महिनेहि लोटलेले नव्हते. सहा महिन्यांत चौहानजी विद्यार्थ्यांच्या आणि मुख्याध्यापकांच्या आदराचा विषय झालेले, तरी अद्याप थोडेफार नवखे आणि परकेच समजले जात. त्यामुळं जुन्या शिक्षकांऐवजीं त्यांच्याकडे आभाराचं काम यावं ही गोष्ट थोडी नवलाचीच होती.

गार्गीबाई भाषण चांगलं करीत असल्या, तरी त्या काय बोलतील याचा अंदाज आधींच बांधतां येत असे. परंतु चौहानजींच्या खाजगी अगर जाहीर भाषणाचा अंदाज कुणालाच करतां आला नसता, अशीच त्यांची एकंदर तऱ्हा होती. आणि म्हणूनच त्या दिवशीं ते बोलायला उभे राहिल्यापासून विद्यार्थी आणि अध्यापक यांच्या चेहेऱ्यांवर एक विशेष कुतूहल दिसत होतं. ‘आजच्या पाहुण्यांचे आपल्यावर इतके उपकार आहेत, कीं त्याबद्दल त्यांचे आभार

मानण्याऐवजीं त्यांच्या ऋणांत रहाणंच मला अधिक पसंत आहे... ' यासारखे शंभरदां चघळलेले शब्दप्रयोग चौहानजींनीं वापरले नाहींत. पण यापेक्षांहि सर्वांना त्यांच्या भाषेचं आणि उच्चारपद्धतीचंच अधिक कौतुक वाटलं. इतरांपेक्षां त्यांचं हिंदी कमी पंडिती, कमी पुस्तकी, पण अस्सल हिंदी वाटत होतं. त्यांत फारसी शब्द अधिक होते असंहि नाहीं. पण त्यांची भाषा पुणेरी हिंदी-कोविदांच्या भाषेपेक्षांच काय, पण खुद्द धीरेंद्र वर्मासारख्या उत्तर हिंदुस्तानी पंडितांच्या भाषेपेक्षांहि वेगळी आणि सोपी होती. आणि तरी त्यांच्या उच्चारांची सफाई आणि झोंक यांवरून त्यांचं ' हिंदी ' एखाद्या परीक्षेकरितां मिळवलेलं नसून प्रत्यक्ष लोकव्यवहाराकरितां मिळविलेलं आहे, हें तत्काळ कळत होतं.

जगदीश चौहान यांच्या नांवावरून, पोशाखावरून, उच्चारांवरून आणि अदबीवरून ते महाराष्ट्रीय नसून उत्तर हिंदुस्तानी आहेत अशीच समजूत विद्यालयांत प्रचलित होती. कुणीकुणी तर ते ' सुभद्रादेवी चौहान ' या प्रसिद्ध कवयित्रीचे भाऊ आहेत अशीहि माहिती पसरवीत असत. याहून थोडे कमी धाडसी लोक त्यांना सुभद्रादेवींचे पुतणे ठरवीत.

पण जगदीश चौहान बाकीच्या अध्यापकांपेक्षां वेगळे दिसत, एवढं मात्र कुणीहि कबूल केलं असतं. जगदीश चौहान कांहीसे आडव्या अंगाचे, रुंद छातीचे, उमद्या चेहऱ्याचे, काळ्या पण सतेज वर्णाचे गृहस्थ होते. त्यांच्या चर्येवरून त्यांचं वय पंचविशीच्या आंतबाहेरच वाटलं असतं. पण त्यांच्या चेहऱ्यावरचं सौजन्य आणि त्यांच्या बोलण्याचालण्यांतला सफाईपणा यांमुळं आजच्या जमान्याच्या मानानं ते थोडे प्रौढ वाटत. कृत्रिम नरतरी, उथळ विनोद, सहेतुक ज्ञानप्रदर्शन ही जर हुषारीचीं आणि तारुण्याचीं लक्षणं मानलीं तर जगदीश चौहान हे तरुणहि ठरण्यासारखे नव्हते, कीं हुषारहि ठरण्यासारखे नव्हते. तथापि त्यांच्या विश्वासयुक्त हिंदी बोलण्यामुळं आणि साफ उच्चारामुळं तिथल्या इतर पुस्तकी हिंदीवाल्यांवर त्यांची छाप नकळत पडे, एवढं मात्र खरं !...

त्या दिवशींच्या चौहानजींच्या भाषणाला त्या सर्व सभेनं मान डोलावली. गार्गीबाईनींहि मान डोलावली; पण त्यांच्या या ' खुषी'च्या आड थोडीशी ' नफरत ' छपून राहिली आहे, हें त्यांच्याकडे बारकाईनं पाहणाऱ्या त्यांच्या भक्तभक्तिणींच्या ध्यानांत आल्याखेरीज राहिलं नाहीं. सभा जिंकण्याच्या आपल्या

कायमच्या हक्काला धक्का देणारा वक्ता आपल्या विद्यालयांत दाखल झाल आहे हें तर त्यांनीं ओळखलंच; पण तेवढ्यानंच त्या बेचैन झाल्या नव्हत्या, तर ज्यानं आज सभा जिंकली तो सभा जिंकण्याचीहि फारशी पर्वा करीत नाहीं, हेंहि त्यांच्या अंतरंगांत कुठंतरी जाणवलं. – अन् या गोष्टीची दुखापत 'पंडित' परीक्षेंत पहिल्या आलेल्या पंडिता गार्गीबाईंना अधिक झाली. गार्गीबाईंनीं अध्यक्षांच्या गळयांत घालण्याकरतां करंडींतून हार काढून तो जगदीश चौहानांच्या हातीं दिला. हार हातीं देतांना त्यानीं चौहानजींकडे ज्या रुष्ट पण आतुर नजरेनं पाहिलं, तींत धड आदरहि नव्हता कीं रोषहि नव्हता. त्यांत एक प्रकारची व्यथितता होती; – एक प्रकारचं आव्हानहि होतं. विद्यालयांतील तरुणीनीं तर तो हार या हातांतून त्या हातांत जात होता त्या क्षणार्धाला जणूं वेगळाच अर्थ दिला ! त्या क्षणिक हारसंक्रमणालाच जणूं हारसमर्पण समजून त्यांनीं टाळ्यांचा गजर करून घेतला !

गार्गीबाईंच्या विद्यालयीन जीवनाला त्या दिवसापासून वेगळं वळण लागलं. ज्या साध्यासीध्या, ओबडधोबड अब्राह्मण अध्यापकाला – चौहानजी ग्वाल्हेरकडचे मराठेच होते – गार्गीबाई अकुशल आणि उपेक्षणीयच समजत होत्या, त्याच्या वाणींतला ढंग पाहून त्यांना विद्यालयीन कामाचं केंद्रच जणूं ढळल्याप्रमाणं वाटूं लागलं. आतांपर्यंत 'गार्गीबाई' हा विद्यालयाचा मध्यबिंदु होता आणि विद्यालय गार्गीबाईंच्या जीवनाचा मध्यबिंदु होता. सर्व विद्यालय आजवर जणूं गार्गीबाईंच्या तरतरीत, धगधगीत आकृतीभोंवतीं फेर धरीत असे. पण आतां गार्गीबाईंच कुणाभोंवतीं तरी फेर धरीत आहेत, असा भास झाला असता. आजवर कुठल्याहि बैठकींत गार्गीबाईंकडेच मुख्य वक्त्याचं काम येई; आणि गार्गीबाई ज्या वेळीं श्रोत्याचं काम करीत त्या वेळीं त्यांच्या कानीं त्यांची स्वतःचीच स्तुति येई. आतां अनेकदां जगदीश चौहान हे बैठकींतले प्रमुख वक्ते आणि गार्गीबाई या तल्लीन श्रोत्या, असं दृश्य दिसूं लागलं होतं.

या फरकामुळं चौहानजींमध्यें मात्र फारसा फरक पडला नव्हता. तेंच खरखरीत खादीचं धोतर, तेंच खादीचं कुडतं, त्यावरून शालीप्रमाणं लपेटलेली तीच खादीची चादर, फणीकंगव्याच्या सहकार्याखेरीज मागं परतवलेले तेच बंडखोर काळेभोर केंस, तेंच पेहेलवानी शरीर आणि तीच सौम्य, काव्यमय

चर्या, असा त्यांचा थाट आजहि होता. गार्गीबाई आतांशा चौहानजींकडे जितकं लक्ष पुरवीत होत्या त्याच्या दशांश जरी त्यांनीं दुसऱ्या एखाद्याकडे पुरवलं असतं, तरी तो त्यांचा दास बनला असता. जगदीश चौहानहि त्यांची अगदीं उपेक्षा करीत असत असं नव्हे;—उलट, ते उघड आकर्षित झालेलेहि दिसत. तरी ते गार्गीबाईंचे पूजक मात्र बनलेले दिसले नाहींत.

गार्गीबाईंना यामुळेंच बेचैन वाटत असे. चौहानजी आपली उपेक्षाहि करीत नाहींत, कीं उपासनाहि करीत नाहींत; तसंच त्यांच्याबद्दल तीव्र आकर्षण वाटत असलं, तरी आपल्यालाहि त्यांचं उघड पूजन मात्र करण्याची छाती होत नाहीं, याचं त्यांना गुप्त वैषम्य वाटे. दोघांचा सहवास तर नकळत वाढतच चालला होता. आणि याहूनहि अधिक सहवास घडावा अशी गार्गीबाईंना उत्कंठा वाटत होती. पण सहवास वाढवायचा म्हणजे गार्गीबाईंनींच उठून चौहानजींच्या घरीं गेलं पाहिजे !

अलीकडे गार्गीबाईंनीं तेंहि धाडस करून पाहिलं होतं. पण जगदीश चौहान यांच्या अभिजात वागण्याचा त्यांच्या भोंवतालच्या अकाली वातावरणाशीं मेळ घालणं त्यांना जड वाटूं लागलं. विद्यालयांतल्या तासापुरत्या गार्गीबाई जिमखान्या-वरच्या आपल्या बंगल्यांतून उठून पुण्याच्या पूर्व भागांत येत. पण चौहानजींचं रहाणंच पूर्व भागांत आणि त्यांतूनहि चाकूहल्ल्यांकरतां प्रसिद्ध अशा गणेश पेठेंत होतं. गार्गीबाई जीव आणि नाक मुठींत धरून कशाबशा चौहानजी राहत होते त्या गवळी बिल्डिंगमधून जाऊन येत. वास्तविक त्या वस्तींत गार्गीबाईंना उपद्रव असा कधींच झाला नाहीं. आणि चौहानजींच्याकडे या बाई येतात हें कळल्यावर तर संबंध बिल्डिंगमधले मराठे, सिंधी, पंजाबी त्यांच्याकडे आदरानंच पाहूं लागले. तथापि गार्गीबाईंना मात्र तें एक मोठं दिव्य वाटत असे खास !

चौहानजींचा ब्लॉक तीन खोल्यांचा होता. ते आपल्या धाकट्या भावाच्या बिऱ्हाडांत राहत असत. त्यांचा धाकटा भाऊ पोलिस खात्यांत सब्-इन्स्पेक्टर होता. धाकट्या भावाचीं बायकामुलं घरांत दिसत; पण जगदीशजींची मंडळी कुठं असतात, हें विचारायचं गार्गीबाईंना धाडस होत नसे. या बाबतींत त्यांना विद्यालयांत ऐकूं येणाऱ्या गटारगप्पांवरच अवलंबून राहावं लागे. कुणी म्हणत, जगदीशजी आपल्या बायकोला नांदवीत नाहींत; कुणी म्हणत, जगदीशजींची बायको त्यांच्याजवळ नांदत नाहीं. जगदीशजींच्या बैठकीच्या खोलींत, त्यांच्या

आई-वडिलांचा फोटो दिसे, त्यांचे स्वतःचे दोन फोटो दिसत; त्यांच्यासारख्या दिसणाऱ्या एका तीन वर्षांच्या गुटगुटीत मुलाचा फोटो दिसे; पण त्यांच्या बायकोचा फोटो मात्र दिसत नसे! यावरूनहि त्या गटारगप्पांना दुजोराच मिळे.

भोंवतालच्या वातावरणांतला विजोडपणा आणि जगदीशजींच्या 'विजोड' जीवनांतील रहस्यमयता, यामुळं गार्गीबाईंचं त्यांच्या घरीं येणंजाणं कमी व्हायचं, तें उलट वाढूंच लागलं हें नवल नव्हे का? पण स्त्रीपुरुष आकर्षण हेंच जिथं एक गूढ आहे, आणि गार्गीबाईसारखी बाई हेंच जिथं एक नवल आहे, तिथं त्यांच्या तारुण्यसुलभ वर्तनाचं वेगळं नवल तें कसलं? ज्या लोकांना गार्गीबाईचा अहंकार माहीत होता, त्यांना मात्र त्यांच्या या गणेश पेठेच्या दैनिक दर्शन-क्रमाचं नवल वाटूं लागलं!

एक गंभीर आणि दुसरं अहंकारी अशा या दोन तरुण माणसांच्या वर्तनावर त्यांच्या स्वभावाचंच स्वाभाविक बंधन पडलं असलं, तरी तारुण्यानं सळसळणारं रक्त आपली वाट कापीतच होतं. जगदीशजींना गार्गीबाईच्या पंचवीस गोष्टीपैकीं चोवीस अमान्य असल्या, तरी त्यांचं लोभस रूप आणि यौवन त्यांना मतभेदापलीकडचं वाटत होतं. मोत्यावरच्या पाण्यासारखी अंगकांति, गरगरीत गोल चेहेऱ्यावर फुललेले गुलाब, पोवळ्यासारख्या लाल लुसलुशीत ओठांतून ईषत् दृश्य होणारे पांढरे शुभ्र दात, गोरे गोरे दंड, लांबसडक बोटं, गौरवर्ण मुखमंडलाभोंवतीं मेहेरपीप्रमाणं शोभणारा काळाभोर दाट केशकलाप ...या सर्व सरंजामाला स्वतःचं असं कांहीं 'सँक्शन' आहे, कांहीं दैवी सनद आहे, असं जगदीशजींनीं आपल्या एका उर्दू कवितेंत प्रतिपादिलेलं होतं.

पण गार्गीबाईंच रूपसंपन्न यौवन आणि चौहानजींची 'हुस्नपरस्ती' (सौंदर्यपूजन) या दोहोंत दोघांच्या स्वभावविशेषांचाच फक्त अडथळा होता असं नाहीं; चौहानजींच्या उदात्ततेला आणि गार्गीबाईच्या अहंकाराला एकदमच फुंकर घालणारी नंदनवनांतल्या वाऱ्याची एक झुळुक त्या दोघांच्या मधून मधेंच वाहत असलेली अलीकडे अनेकांना दिसूं लागली होती. रास्ता पेठेंतून 'कोविद' च्या तासाकरतां येणारी, हिंदी आणि मराठी दोन्हीहि सारखंच सदोष आणि अडखळत बोलणारी, वाडिया कॉलेजच्या सीनिअर बी. ए. च्या वर्गातली एक मुलगी अलीकडे चौहानजींच्या घरीं अधूनमधून दिसूं लागली होती. सहज लक्षांत भरण्यासारखी उंची, सुरूच्या झाडासारखा सरळ उभा डौल, काळसरच

परंतु कर्दळीच्या पानासारखी टवटवीत अंगकांति, हजारांत उठून दिसतील असे काळेभोर स्वच्छ डोळे, तरतरीत सरळ नाक, हंसतांना-बोलतांना दिसणारे निमुळते दर्शनी दांत आणि या सर्वांत भर घालणारी अशी बोलण्याचालण्याची 'अनोखी' ( कर्नाटकी ) ढब, यामुळं ती विद्यालयांत सर्वांच्या चर्चेचा विषय होऊन बसली होती. ती विद्यालयांत दाखल होतांच तिच्या उंच, श्यामल दाक्षिणात्य लावण्यानं जे कुतूहल निर्माण केलं होतं, तें तिचं नांव कळल्यावर तर शिगेलाच पोंचलं होतं. तिचं नांव होतं, सेतुपार्वती ! पांढरपेशा पुणेरी मुली एकमेकींच्या कानांत कुजबुजत : 'अय्या ! ती म्हणे म्हैसूरकडची लिंगायत कीं कायशीशी आहे !' 'अग ए ! घरीं गेली होतीस का कधीं तिच्या ? तिची आई गळ्यांत चांदीचं लिंग घालते आणि कपाळाला भस्म ( विभूति ) लावते म्हणे !'

सेतुपार्वतीसंबंधींच्या या विस्मयवार्तांना ओसर पडून अलीकडे ती कित्येक पुणेरी मुलींच्या कौतुकाचा विषय बनली होती. तिचीं बंगलोरी पातळं, तिच्या ब्लाउझचा कट्, तिच्या केंसांचं वळण, या गोष्टी आतां आश्चर्याचा विषय राहिलेल्या नसून अनुकरणाचा विषय ठरलेल्या होत्या. पण तिच्यांतील सर्वांत मनमोहक भाग अनुकरणाच्या पलीकडचा होता. तो भाग म्हणजे तिचं बोलणं. ती सुशिक्षित पुणेरी मुलींसारखी अस्खलित पुस्तकी बोलत नसे, कीं कित्येक वाचनप्रेमी मुलींप्रमाणं कोटिबाजहि बोलत नसे. ती साधं, तुटक, अल्प आणि काहींसं अशुद्ध बोले. पण इतर मुलींचं बोलणं सुरू झाल्यावर फक्त कान उघडे ठेवले म्हणजे पुरेसं होई; —किंबहुना तेहि बंद केले तरी चालण्यासारखं असे !— पण सेतुपार्वतीच मंद, परिमित, सहास्य भाषण सुरू झालं म्हणजे कानापेक्षा डोळ्यांनाच काम अधिक पडे.

वास्तविक सेतुपार्वतीची आणि गार्गीबाईची कशांतच तुलना होण्यासारखी नव्हती. रूप, विद्या आणि दर्जा यांत गार्गीबाई — सामान्य मापांनीं तरी — सेतुपार्वतीपेक्षां एकदम वरिष्ठ पदवीवर होत्या. पण आंतून गार्गीबाईना या सडसडीत, हंसतमुख कर्नाटकी कन्येची भीतीच वाटत असे. गार्गीबाई चौहानजींकडे जात त्या वेळीं सेतुपार्वती तिथं असली, तर लगेच चौहानजी सेतुपार्वतीलाच रजा देत आणि तरी त्या रजा देण्यांतहि इतकी आपुलकी आणि इतका आदर असे, कीं गार्गीबाईना एक प्रकारचा न्यूनगंड वाटावा. गार्गीबाईच्या

स्नेहाचा प्रवाह या गोड विघ्नामुळें खंडित होण्याऐवजीं अलीकडे अधिक वेगानंच वाहूं लागला होता. कारण आतां त्या प्रवाहाला स्पर्धेची धार आलेली होती.



मला वाटतं, मदनाच्या सेनेला विसाव्या शतकांतल्या कोंदट वस्तींत लढणं तितकंसं सोईचं वाटत नसावं ! सामान्य सैन्याप्रमाणं मदनाच्या सैन्यालाहि निर्णायक लढ्याकरतां मोकळं मैदानच पाहावं लागत असावं. विद्यालयाची सहल ' बोटॅनिकल गार्डन 'वर जाणार असं ठरलं, तेव्हां गार्गीच्या सौंदर्यसेनेला जणूं गुप्त इषाराच मिळाल्यासारखं झालं. ' ट्रिप ' जाणार होती शंभर मुलामुलींच्या विद्यालयाची; पण लोकांना तर ती वाटत होती खास गार्गी–जगदीशांचीच ! कर्मधर्मसंयोग असा कीं, त्याच दिवशीं सेतुपार्वतीच्या कॉलेजची ' ट्रिप ' खंडाळ्याला जात असल्यानं तीं बोटॅनिकल गार्डनमध्यें येणं शक्य नव्हतं. त्या दिवशींची ती ट्रिप म्हणजे गार्गी-जगदीश यांचीच खास ट्रिप होती – बाकींचे स्त्रीपुरुष म्हणजे केवळ सोहाळ्याकरतां गोळा झालेले वऱ्हाडी, असाच कांहींसा भास होत होता.

पण प्रेमी युगुलाला कधींकधीं कौतुकार्थ जमलेल्या वऱ्हाड्यांचीहि अडचण होऊं लागते. त्या दिवशीं जगदीश–गार्गीनाहि तसंच होऊं लागलं. बागेंत जमा होतांच सर्वांनीं आवडीप्रमाणं तुकड्या करून खोखो, लंगडी वगैरे खेळ खेळायला प्रारंभ केला. वयानं अगर प्रकृतीनं थकलेल्या लोकांनीं झाडाखालीं तळ ठोकून ग्रामोफोन – रेकॉर्ड्स लावल्या. कॅमेरावाल्या मंडळींनीं फोटोंची मोहीम काढली. गार्गीनं कॅमेरा आणला होता, तर जगदीशनं आपली बंदूक आणली होती. वास्तविक जगदीशनं अलीकडे निरुपद्रवी पशुपक्ष्यांचे जीव घ्यायचं सोडून दिलं असलं, तरी वेळप्रसंगीं विषारी जिवाणू मारण्याकरिता म्हणा, कीं संवय म्हणून म्हणा, तो रानावनांत हिंडतांना तरी आपली ही जुनी सहचरी बरोबर नेई.

जगदीश आणि गार्गी यांची जोडी फिरत-फिरत बागेच्या पलीकडच्या टोंकाला, नदीच्या कांठापर्यंत जाऊन पोंचली. कॉलेजांची पहिली टर्म संपण्याचे दिवस होते. पावसाळा संपून आश्विनांतील उन्हाची तिरीप जाणवत असली, तरी पर्जन्यकाळानं धरित्रीला दिलेलं वैभव अद्याप भरपूर कायम होतं. सर्वत्र

हिरवंगार होतं. नदी भरून वाहत होती; पण पावसाची चिकूचिक् मात्र संपली होती. वनश्रीचे चारदोन फोटो घेतल्यावर गार्गीला गळ्यांत अडकवलेल्या कॅमेऱ्याचं विस्मरण झालं होतं. महासर्पाच्या अनुपस्थितीमुळें जगदीशनं दोन खेकडे आणि एक विरोळा एवढ्यांचाच आपल्या कांखेंतल्या रणचंडीला नैवेद्य समर्पण करून समाधान मानून घेतलं होतं.

बंदुकीच्या पहिल्या बारानं दचकून गार्गी म्हणाली होती---

" अन आत्तांचा नेम चुकला असता तर त्या सापानं डूख धरला असता ना ? "

" तो साप नव्हता. — विरोळा होता ! " जगदीश हंसून म्हणाला.

" म्हणजे ? "

" म्हणजे काय ? विरोळा विषारी नसतो. "

" मग कां मारलंत त्या बिचाऱ्याला ? "

" तुमच्यासारख्या मुलींना हें माहीत नसतं म्हणून ! "

" म्हणजे ? आम्हांला माहीत नसलं म्हणून त्याला गोळी घालायचं काय कारण बाई ? " गार्गी मानेला आणि पाठीवर सोडलेल्या वेणीला एकदमच झटका देत म्हणाली.

" तुमच्यासारख्या स्त्रियाच केवळ नव्हेत, तर पुरुषासारखे पुरुषहि, या प्राण्यांना गैरमाहीतपणानं घाबरतात म्हणून ! " जगदीश हंसत म्हणाला.

गार्गीच्या प्रश्नांत खऱ्या कुतूहलापेक्षां कौतुक करण्याचा आणि कौतुक करून घेण्याचाच भाग अधिक होता. आश्विनांतल्या हिरव्यागार वनश्रीची पार्श्वभूमि, कॅमेरा घेतलेली गार्गी, आणि बंदूक चालवणारा जगदीश, हें दृश्य एखाद्या सिनेमा-डायरेक्टरलाहि भुरळ पाडण्यासारखंच होतं. मग गार्गीला चित्रपटाच्या नायिकेसारखं चुरूचुरू बोलावंसं वाटलं तर नवल कसलं ?

बोलतांबोलतां हीं नायक-नायिका नदीच्या पाण्यांत भुशिराप्रमाणं शिरलेल्या खडकापर्यंत आलीं. जगदीश थेट टोंकाला जाऊन उभा राहिला. गार्गीहि आपल्या ' प्लॅटफॉर्म सँडल्स्'चा तोल संभाळीत त्याच्यापर्यंत येऊन पोंचली. समोर दूर दुसऱ्या एका विद्यालयाच्या गटांतील दोनतीन मुलं हात मारीत पाणी कापतांना दिसत होतीं. त्यांना पाहून जगदीश नकळत आपल्या बुशकोटाचे बटन खोलूं लागला.

" हें काय ? "— गार्गीनं त्याचा हात पकडून विचारलं.

" त्यांना पोहतांना पाहिल्यावर मला इथं हात जोडून बसणं अशक्य आहे ! " जगदीशनं तिचा हात धरून उत्तर केलं. त्यानं उत्तर कांहींहि दिलं असलं, तरी त्याचा पोहण्याचा बेत आधींच अर्धाअधिक गारठला होता हें गार्गीच्याहि लक्षांत आलं.

" इथं सुसरी असतात, माहीत आहे ना ? " गार्गीनं लाडिक रोषानं विचारलं.

बटन पुन्हा लावीत जगदीशनं उत्तर केलं, " रहित केला आमचा बेत !– पण तो पाण्यांतल्या सुसरींमुळं नव्हे बरं का ! "

गार्गीचा हात अद्यापहि जगदीशनं सोडला नव्हताच. आपला हात सोडवण्याचा लटका यत्न करीत गार्गी म्हणाली, " मग कुठल्या ? "

गार्गीला एकदम जवळ ओढून जगदीश म्हणाला, " या – या जमिनी-वरच्या सुसरीनं मला पकडलंय् म्हणून ! "

' या सुसरीनं आपल्याला पकडलं आहे, ' असं म्हणणाऱ्या जगदीशनं उलट त्या सुसरीलाच त्या उत्तेजक उघड्या वातावरणांत आपल्या बाहुपाशांत घट्ट पकडलं होतं. गार्गी मनांत चरकून एकदम दूर सरून बसली. एवढ्यांत पलीकडच्या झाडींत ऐकूं येणारा बोलण्याचा आवाज अधिक स्पष्ट ऐकूं येऊं लागला. विद्यालयांतल्या विद्यार्थिनी आपल्या आवडत्या अध्यापकांना फराळाची वेळ झाली हें सांगण्याकरता येत होत्या. त्यांच्या येण्याची वाट न पाहतांच ही जोडी त्यांच्या रोखानं चालूं लागली. आतां सूर्य डोक्यावर आला होता. उन्हाची तिरीपहि लागूं लागली होती...

फराळानंतर तीनचार तास ही सर्व मंडळी बागेंत होती. जगदीश दिवसभर एरव्हीपेक्षांहि उल्हसित दिसत होता. गार्गीबाईंना एकदम काय झालं, हें मात्र कुणालाच कळेना. ' ऑक्टोबर हीट्चा परिणाम ! ' असाहि कांहींनीं तर्क केला !



दुसऱ्या दिवशीं जगदीश थोड्या उशीराच निजून उठला. आदल्या दिवशींच्या सहलीचा शीण रात्रींच्या विश्रांतीनं संपला असला, तरी आदल्या

दिवशींचा गोड उन्माद मात्र अद्याप कमी झालेला नव्हता. नित्याच्या रूक्ष रहाटगाडग्यानं तो कमी झाला असता; पण त्याकडे वळायलाच जगदीश आज तयार नव्हता. स्वतः गार्गीच इकडे वळेल आणि मग हें गोड अस्वास्थ्य कमी होईल, अशी त्याला उगीचच आशा वाटत होती. ही त्याची कल्पना दुहेरी चूक होती. एक तर गार्गीचा आज येण्याचा विचार नव्हता, आणि दुसरं म्हणजे ती आल्यानं हा गोड ज्वर वाढणारच होता. एवढ्यांत दारावर जनानी अंगुलिध्वनि ऐकूं आला. गार्गीच आली असणार अशा कल्पनेनं जगदीशनं दार उघडलं, तो दारांत सेतुपार्वतीची उंच, सडपातळ आकृति विस्फारित, सकौतुक नेत्रांनीं आपल्याकडे पाहत उभी असलेली त्याला दिसली.

दुसरं कुणीहि असतं, तर जगदीशला या अपेक्षाभंगामुळं क्रोधच आला असता. पण सेतुपार्वतीला पाहून मात्र त्याची अपेक्षापूर्तीहि झाली नाही, कीं अपेक्षाभंगहि झाला नाही. सेतुपार्वती कोणत्याहि क्षणी दिसली तरी प्रियच होती; पण अद्याप कधींच ती आजच्याइतक्या विचित्र क्षणीं भेटली नव्हती, एवढं मात्र खरं !

सेतुपार्वती नेहमींच प्रसन्न, प्रेमळ आणि दिलदार दिसे. पण तिची प्रसन्नता निश्चिंततेची द्योतक नसून सौजन्याची द्योतक असे, हें जगदीशच्याहि अलीकडे ध्यानांत येऊं लागलं होतं. तिला कुठल्याहि चांगल्या वार्तेनं, चांगल्यां बोलण्यानं, चांगल्या सहवासानं झटकन् संतोष झालेला दिसे. जगदीशच्या सहवासांत तर ती विशेषच आनंदित दिसे. तथापि तिला कुठलीच काळजी नाही, त्रास नाहीं, असं मात्र तिच्याकडे बारीक नजरेनं पाहणाराला वाटलं नसतं. पण छे : ! तिच्याकडे बारीक नजरेनं पाहणारांनाहि ती प्रसन्न आणि निश्चिंतच दिसली असती.—कांहींना तर ती बेगुमान आणि अभिमानीहि वाटत असे. आपुलकीच्या, सहानुभूतीच्या नजरेनं पाहणारांना मात्र तिच्या प्रसन्नतेच्या आड त्रास आणि दुःख लपलं आहे असं दिसत असे. आज जगदीशला तर तिनं उदारपणानं अनेक दुःखं पोटांत घातली आहेतसं भासलं.

एकां क्षणांतच आदल्या दिवशींचा तो वनविहार, तो उल्हास, ती शिकारीची खुमखुमी, गार्गीचं तें उन्मादकारी सान्निध्य जगदीश विसरून गेला. — छेः ! विसरून जाणं कसं शक्य होतं ? त्याला तें चांगलं चांगलं स्मरत होतं.

आतां तें त्याला अस्वस्थ मात्र करीत नव्हतं; तें त्याला आपल्या काबूंत आल्याप्रमाणं वाटत होतं, एवढंच. तें त्याला प्रभावशून्यहि वाटत नव्हतं कीं अप्रियहि वाटत नव्हतं. त्याची धग मात्र त्याला एका क्षणांत कमी झाल्यासारखी वाटत होती.

जगदीशच्या चेहेऱ्यावरची अस्वस्थता जाऊन तिथं प्रसन्नता दिसूं लागली; अतृप्तता जाऊन तिथं तृप्तता – नव्हे, जवळजवळ निरिच्छतेची बेगुमानी चमकूं लागली; पण सेतुपार्वतीच्या चेहेऱ्यावरील भेटीचा तात्पुरता आनंद मावळून आंत लपवलेलीं दुःखं अधिकच उमटूं लागलीं. स्वागताचा उत्साह आणि प्रक्षोभ थोडा ओसरल्यावर जगदीश तिच्या चर्येंतला बदल पाहूं शकला!

"हें काय? तूं आज अशी काय दिसते आहेस, सेतुपार्वती?" जगदीशनं जणूं तिचं मुखमंडल हातीं धरून न्याहाळल्याप्रमाणं करीत म्हटलं.

"लक्षांत येण्याइतका का माझा चेहेरा वेगळा दिसतोय् आज?" गुप्त दुःखाची चहाडी करणारी आपली चर्या पालटण्याकरितां बळेंच हंसून सेतुपार्वती म्हणाली.

"माझ्यापासून कांहीं लपवायची तुला गरज भासेल असं मला नव्हतं वाटलं, सेतुपार्वती!" दुखावलेल्या अभिमानाच्या स्वरांत जगदीश म्हणाला.

"परवां तुम्हीं म्हटलेल्या त्या दोन उर्दू ओळी कोणत्या? मला काल खंडाळ्याच्या डोंगरांत भटकतांना त्या सारख्या आठवत होत्या." सेतुपार्वतीला ओळी आठवायच्या होत्या, कीं विषय बदलायचा होता, हें तिच्या चेहेऱ्यावरून तरी कळत नव्हतं.

"हजारों ख्वाइशें ऐसी कि हर ख्वाहिश पे दम निकले..."

—जगदीश शून्य दृष्टीनं पाहात गुणगुणूं लागला.

"नाहीं, या गालिबच्या ओळींपेक्षां मला इक्बालची ती दुसरी ओळच अधिक आठवत होती: 'निगाहे फक्रमें—' सेतुपार्वती आठवण्याचा यत्न करूं लागली.

"निगाहे फक्रमें शाने सिकंदरी क्या है?"

जगदीश आपल्या घनगर्जितासारख्या आवाजांत ओळ पुरी करून म्हणाला, " पण या ओळी तुला आत्तां आठवायचं कारण काय ? "

" ज्या प्रत्येक मनीषेबरोबर प्राण कासावीस व्हावा, अशा मनीषांचा अनुभव माझ्यासारखीलादेखील येईल, जगदीशजी ! पण ज्या फकिरी नजरेपुढं ' सिकंदराची शान 'सुद्धां तुच्छ आहे, तिची आमच्यासारख्या यःकश्चित् माणसांना या जन्मांत कुठली आली आहे आशा ? "

" हें आज तूं काय गूढ बोलते आहेस, सेतुपार्वती ? तुझ्या मनांतलीं दुःखं मला सांगण्यासारखीं नसलीं तर नको सांगूस; पण या फकिरीच्या रानांत तुझ्यासारखी तरुण मुलगी एकटी शिरली म्हणजे माझ्यासारख्यानं काय समजायचं ? "

" तुम्हांला न सांगण्यासारखं माझ्याजवळ काय असणार, जगदीश-बाबू ?—आणि दुःख सांगण्यांत मोठंसं सुख नसलं, तरी मला तेंहि तुमच्या-जवळ सांगण्यांत समाधानच आहे. पण जगांत सुख नसल तर माणसाच्या वांट्याला निदान दुःख तरी यावं असं मी देवाजवळ मागणं मागत ! "

" तूं अधिकच गूढ बोलायला लागलीस, सेतुपार्वती ! दुःखापेक्षांहि वाईट असं काय आलं आहे तुझ्या वांट्याला या वयांत ? " एवढं म्हणून जगदीशबाबू सेतुपार्वतीच्या चर्येचा आपल्या व्याकुळ डोळ्यांनीं जणूं ठाव घेत उद्गारले, " नसलं सांगण्यासारखं तर नको सांगूस ! पण त्याला वाजवीपेक्षां जास्त महत्त्व देऊन आपल्या मनाला त्रास तरी करून घेऊं नकोस. मी तुझं दुःख कमी करूं शकणार नाहीं; पण त्या दुःखाचं महत्त्व थोडं कमी करूं शकेन खास ! "

सेतुपार्वती जगदीशबाबूंच्या नजरेला नजर भिडवून उदासवाणं हास्य करीत म्हणाली, " या सुट्टींत मी म्हैसूरला जाणार ती कायमचीच जाणार, हें सांगायला आलेंयू मी तुम्हांला. " जगदीशजींची चरकलेली चर्या पाहून ती लगेच पुढें म्हणाली, " आजच निघालें नाहीं मी; जाण्यापूर्वी पुन्हा येईन एकदां तरी ! "

जगदीश बाबूंना हा घोटाळा कांहींच समजेना. सेतुपार्वतीच्या पोशाखा-वरून, राहणीवरून तिच्या नात्यागोत्याच्या लोकांवरून पाहतां पैशाच्या अड-चणीमुळं तिचं शिक्षण थांबत आहे असं म्हणणं शक्यच नव्हतं; आणि

सीनियर बी. ए. च्या दुसऱ्या टर्मपर्यंत पोंचलेली मुलगी पैशाच्या दृष्टीनं अडचणींत असली, तरी सहजासहजीं पदवीची परीक्षा हातची दवडणार नाहीं, हें लहान पोरसुद्धां सांगू शकलं असतं. सेतुपार्वतीनं सांगितलेल्या वार्तेनं खुलासा होण्याऐवजीं घोटाळाच वाढत होता.

"तूं कॉलेजच्या होस्टेलमध्यें राहत असलीस तरी तुझे आईवडील इथंच रास्ता पेठेंत आहेत, असं मीं ऐकलं होतं. तुझ्या आईवडिलांच्या मनाविरुद्ध तूं शिकत होतीस कीं काय ?"

"इथं आहे ती माझी आई नव्हे, मावशी." सेतुपार्वतीनं खुलासा केला, "माझे वडील म्हैसूरकडे आहेत. मी त्यांच्या मनाविरुद्ध शिकत होतें असंहि नव्हे; पण यापुढं मात्र मीं शिक्षण बंद करावं आणि तिकडे निघून यावं असं त्यांचं मला नुकतंच पत्र आलं आहे."

"पण एका टर्मसाठीं असं एकदम शिक्षण थांबवण्यासारखं काय झालंयू ? मध्यंतरीं तूं आजारी होतीस, तेव्हां म्हटलं असतं तर एक वेळ माणूस समजूं शकलं असतं." या सर्व घोटाळ्याचा कांहीं थांग लागतो का तें पाहत विचार-मग्न मुद्रेनं जगदीशबाबू म्हणाले.

पुन्हा एकदां उदास हास्य करून जगदीशबाबूंकडे पाहत सेतुपार्वती म्हणाली, "म्हणूनच म्हणतें ना ? नुसत्या दुःखापेक्षां माणसाच्या वांटणीला कांहीं अधिक वाईट गोष्टी येऊं शकतात."

"मी तुला अधिक विचारून क्लेश देऊं इच्छित नाहीं. पण मग काय तूं एकटीच तुझ्या दुःखाशीं झगडणार ?"

"दुःखाशीं नव्हे, जगदीशबाबू, विटंबनेशीं !"

"विटंबनेशीं ?" जगदीशनं भयचकित मुद्रेनं विचारलं.

"होय ! मध्यंतरीं मी आजारी होतें आणि त्याच्या आधीं ओळीनं एक टर्मभर माझी प्रकृति फारच छान झाली होती. त्यांतून आमच्या आई-साहेबांनीं कांहीं वेडावांकडा अर्थ काढला आणि माझ्या वडलांच्या डोक्यांत भरवला !"

आजारीपणांतून कसला बोडक्याचा अर्थ काढला ?—आणि तोहि आईनं स्वतः !" तुच्छतायुक्त संतापानं जगदीशच्या नाकपुड्या स्पंदन पावत होत्या. जणूं असले घाणेरडे अर्थ काढणारा कुणी समोर असून त्याचा तो गळाच

धरीत आहे! संतापाची जागा विषण्णतेला देत तो पुढं जणूं स्वतःशींच पुटपुटला, " स्त्रियांच्या जीवनाची विटंबना करणं हा आमच्या समाजाचा एक निर्दय खेळच बनून राहिला आहे कीं काय ?—"

" समाजाचा कशाला म्हणतां जगदीशबाबू ?—स्त्रियांची विटबना करणं हा आम्हां स्त्रियांचाच एक क्रूर चाळा आहे! मला सख्खी आई नसून सावत्र आई आहे हें अद्याप मीं तुम्हांला सांगितलं नव्हतं. "

" असेल सावत्र! पण म्हणून तुझ्या वडिलांना कांहीं काळीज, कांहीं बापाची माया आहे कीं नाहीं ? " जगदीश अद्याप संतापून बोलत होता.

" त्यांची माझ्याबद्दलची माया मेली हें तर दिसतंच आहे. त्यांची माया सरली तशी माझीहि त्यांच्याबद्दलची माया सरली असती तर त्रास तरी संपला असता ! "

" म्हणजे काय ? "

" मला अजून त्यांच्याबद्दल माया वाटते, म्हणून तर घरीं जायचं. नाहीं तर घरच्या माणसांचं मीं तोंड पाहिलं नसतं. प्रेमाखातर बदनामी सहन करणं ही तुम्ही उर्दू कवि, प्रेमाची अखेरची कसोटी मानतां ना ? पण प्रेमाच्या माणसांनींच चालवलेली ही बदनामी तुमच्या उर्दू प्रेमिकांच्यादेखील ऐकण्यांत नसेल !"

जगदीशचा संताप कमी झालेला नव्हता; पण शब्द मात्र संपले होते. सेतुपार्वती त्याच्या संतप्त चेहेऱ्याकडे पाहत होती, आणि तो तिच्या विरुद्ध दिशेच्या खिडकींतून बाहेर कुठं तरी दूर पाहत होता. खोलीचं दार उघडंच होतं. एवढ्यांत गार्गी केव्हां गॅलरींत येऊन दाखल झाली याचं त्या दोघांनाहि भान नव्हतं.

" काय, कुठल्या उर्दू प्रेमाची आणि कसल्या बदनामीची वार्ता चालली आहे, सेतुपार्वती ? " गार्गी थोड्या हेटाळणीच्या सुरांतच म्हणाली. आणि या तिच्या शब्दांनींच तीं दोघं प्रथम भानावर आलीं. सेतुपार्वती ही गार्गीबाईंची विद्यार्थिनीच असल्यामुळं तिच्यावर दरडावून बोलण्याचा त्यांना हक्कच होता. सामान्यतः गार्गीबाई एकट्या जगदीशपुढं जो सूर काढीत, त्यापेक्षां आज त्यांनीं थोडा पोक्त आणि कडक सूर लावला होता. मनांतून मात्र त्यांना ही एक नवीनच मानखंडना वाटत होती. आपल्यासारख्या रूपवती विदुषीशीं एवढ्या तोऱ्यानें आणि हक्कानं वागणारा जगदीश, या सडसडीत, पोरसवदा कर्नाटक-कन्येपुढें

इतका विव्हल झालेला पाहून, आणि त्या कानडी कन्येलाहि एवढा वेदान्त सांगायचं अवसान चढलेलं पाहून, गार्गीबाईंना ' आपण इथं आलों कशाला अपमान करून घ्यायला ? ' असं वाटल्यावांचून राहिलं नाहीं.

जगदीशला मात्र आज त्यांचं नेहमींइतपतहि स्वागत करायला शुद्ध नव्हती. गार्गी तशीच स्तिमित उभी होती. जगदीश आलटूनपालटून तिच्याकडे आणि सेतुपार्वतीकडे पाहत होता. आपल्या दोघां गुरुवर्यांचा बोज राखण्याकरतां सेतुपार्वती सूचनेशिवायच जायला निघाली. जगदीशबाबूंना गार्गीबाईबद्दल ' विशेष ' वाटतं, हें माहीत असल्यामुळंच ती अधिक कांहीं न बोलतां निघून गेली. नाहींतर प्रेमाच्या विषयांत तरी तिनं गार्गीबाईचं हें हेटाळणीचं बोलणं खासच ऐकून घेतलं नसतं. कांहीं कंपूंत सेतुपार्वतीची ख्याति जशी गोडव्याबद्दल होती, तशी कांहींत तोडून बोलण्याबद्दलहि तिची प्रसिद्धि होती ! जगदीश तिला जिन्यापर्यंत पोंचवून, पुन्हा यायला बजावून खोलींत परत आला.

" मीं तुमच्या दोघांच्या बोलण्यांत व्यत्यय तर नाहीं ना आणला ? " गार्गी थोड्या कुर्ऱ्यांतच म्हणाली.

" सेतुपार्वतीचं आणि माझं बोलणं खाजगी असलं, तरी त्यांत न ऐकण्यासारखं कांहींच नसतं. तें बोलणं आडून ऐकणाराबद्दल आमचं मत काय होईल तें होईल; पण आडून ऐकणाराचं मत मात्र आमच्याबद्दल अधिक चांगलंच होईल खास ! " जगदीश अद्याप सेतुपार्वतीच्याच चिंतनांत चूर होता.

" मीं तुमचं बोलणं आडून ऐकलंहि नाहीं. आणि तुमच्याबद्दल कांहीं नवं मत मला बनवायचंहि नाहीं ! मी फक्त दोन मिनिटांपुरती आलें आहें. अजून तिला बोलवायचं असल्यास बोलवा परत ! " गार्गी थोड्या कडवट सुरांत म्हणाली. अवहेलनेच्या जाणिवेनं तिचा चेहेरा पांढरा फटफटीत दिसूं लागला होता. तिचा स्वर कांपरा येत होता.

भावनेच्या भरांत आपण काय बोलून गेलों हें ध्यानांत येऊन जगदीश म्हणाला, " गार्गी, मी जें बोललों तें सेतुपार्वतीसंबंधीं बोललों; त्यांत तुला लागण्यासारखं कांहींच नव्हतं. तूं आज उभ्यानंच का बोलून जाणार आहेस ? "

" हो ! पण त्याला कारण तुमचं आजचं बोलणं नसून कालचं वागणं आहे ! " गार्गी, सेतुपार्वतीनं रिकाम्या केलेल्या खुर्चीच्या पाठीवर दोन्ही हात ठेवून उभीच होती.

" म्हणजे ? " जगदीश अचंब्यानं म्हणाला, " कोणतं वर्तन कालचं ? "

" कोणतं तें घ्या तुमचं तुम्हीच पाहून!" असं म्हणून गार्गीनं आपल्या ब्लाउझच्या वरच्या भागांत हात घालून झटकन् एक पत्र काढलं आणि तें जगदीशच्या शेजारच्या टेबलावर भिरकावलं.

" हें काय ? पत्र कसलं ? " असं म्हणून जगदीश तिला रोखणार, तोंवर ती जिन्यापर्यंत पोंचलीदेखील ! क्षणांत ती जिन्याच्या शेवटच्या पायरीवर पोंचल्याचंहि तिच्या सॅंडल्स्नीं जाहीर केलं ! जगदीशनं दारापर्यंत जाऊन पाहिलं, तों गार्गीच्या रुष्ट चेहेऱ्याऐवजीं दोन बाजूंच्या दोन शेजारणीचे अर्थपूर्ण चेहेरे गॅलरींत त्याला दिसले !

जगदीशनं दार लावून पत्र वाचायला प्रारंभ केला.

" माननीय जगदीशबाबू,

काल बोटॅनिकल् गार्डनमध्यें नदीकांठीं आपण दोघंच असतां, तुम्हीं जें वर्तन केलंत, तें पाहून मी हतबुद्धच झालें आहें ... मी तुमच्याकडून अशा वासनात्मक प्रेमाची अपेक्षा करीत नव्हतें. तुमच्या कांहीं गझलमधलं तें ' कुर्बानी ' चं प्रेम, तुमच्या भाषणांतला तो ध्येय-वाद आणि तुमच्या जीवनांतला तो त्याग पाहून मला तुमच्याबद्दल जबरदस्त आकर्षण वाटूं लागलं. तुमच्या जीवनांतला एकटेपणा पाहून माझी सेवावृत्ति जागृत होऊन उठली, पण आपणांसारख्या त्यागी दार्शनिकाला माझ्या शरीरावरच्या चंचल वैभवाचा लोभ वाटेल असं माझ्या स्वप्नांतहि आलं नाहीं. शरद्बाबूंच्या सव्यसाचीशीं भारतीचं जे निरागस नातं दिसतं, ' शेष प्रश्नां ' तल्या आशूबाबूंचं कमलबद्दल जे कोमल वात्सल्य दिसतं, त्याची मी तुमच्याजवळ भिक्षा मागत होतें. पण माझ्या झोळींत तुम्हीं कामुकतेचा धोंडा टाकलांत !

" मी सात्विक, अशरीरी प्रेमाची भुकेली आहें ... तुमच्या भाषेंत सांगायचं झालं तर ' प्लॅटॉनिक प्रेमा ' ची प्यास मला व्याकुळ करून राहिली आहे. आणि तुम्हीं तर माझ्यावर वासनेच्या नागिणीला मोकळी सोडीत आहां ! ...

" तुमच्याबद्दलच्या माझ्या आदराला केवढा धक्का बसला काल, जगदीशबाबू ! माझी पूजा भ्रष्ट न करणं, – माझ्या मंदिरांतली मूर्ति विच्छिन्न न करणं तुमच्या हातीं आहे, – सर्वस्वीं तुमच्या हातीं आहे, जगदीशबाबू !

" अधिक काय लिहूं ?

" आपल्या पायांची पुजारीण,
गार्गी. "

' पंडिता ' गार्गीबाईचं पत्र अर्थातच उंची हिंदीत होतं ! पत्र निम्मं वाचून होण्याच्याहि आधीं जगदीशबाबूंच्या चेहेऱ्यावर तुच्छतेचं हास्य चमकूं लागलं. पत्र वाचून संपतांच तें फाडून फेंकून द्यावं असंहि त्यांच्या मनांत आलं. परंतु कांहीं विचार करून त्यांनीं ती ऊर्मि दाबली. एकदां त्यांना वाटे, गार्गीच्या त्या विचित्र पत्राला त्याच बैठकींत एक जहरी उत्तर लिहून टाकावं. पुन्हा वाटे, त्या पत्राला तेवढीहि किंमत देऊं नये. ...

नुकतीच आपली हृदयव्यथा सांगून गेलेली सेतुपार्वती...तिच्या मागोमाग येऊन अशरीरी प्रेमाची मागणी करणारी गार्गी...आणि तिच्या मागोमाग मनांत गर्दी करून राहिलेल्या आजवरच्या तिच्या शारीरिक विभ्रमांच्या आठवणी, यांच्या परस्परविरोधी तसबिरी जगदीशबाबूंच्या डोळ्यांपुढं उभ्या राहूं लागल्या.—पण सर्वांत विचित्र जर कोणती आकृति असेल, तर ती अशरीरी प्रेमाची मागणी करणाऱ्या शरीर-विभ्रमनिपुण गार्गीची ! खोलींत येरझारा करीत असतां तिच्यासंबंधींच्या उलटसुलट विचारांचा खेळ जगदीशबाबूंना अधिकच अस्थिर करूं लागला. गार्गीच्या शरीराबद्दल मला आकर्षण वाटतं हें खोटं नाहीं; पण मीं तें कधींच लपवलं नव्हतं...माझी त्यांत कांहीं चूक आहे का ? मी त्या आकर्षणाला वेगळं वळण देऊं शकेन का ?...पण तें कां म्हणून द्यावं ?– गार्गी म्हणते म्हणून ? ...कदाचित् अशरीरी प्रेम करण्याची माझ्यांत पात्रताच नसेल...पण—पण मग मला सेतुपार्वतीबद्दल वाटतं तें काय ? तिच्या शरीराचं आकर्षण ? छेः ! ती मला नितान्तसुंदर वाटते; पण तिच्या शरीराचा लोभ—कालत्रयींहि शक्य नाहीं मला तो वाटणं ! मला तिच्या बाबतींत मुद्दाम संयम करावा लागतो का ?—कीं मला तिच्याविषयीं वाटतं तें वात्सल्य म्हणायचं?...

छेः ! मला काय वाटतं आणि काय वाटावं या बाबतींत मला गार्गीच्या शब्दपांडित्याची गरज नाहीं...उद्यां गार्गी मला शीत आणि उष्ण यांतला फरकहि समजावून देऊं लागेल !...मग गार्गीच्या या ध्येयवादी भाषेची संगति कशी लावायची ? पण प्रेम भाषेवरून ठरत नसून दुसऱ्याच कशावरून तरी ठरत असतं. कांहीं माणसं प्रेमांतहि पांडित्य लढवूं पाहतात म्हणायचीं !...

अखेर जगदीशबाबूंनीं गार्गीला कांहींच लिहायचं नाहीं असं ठरवलं. त्यांना असंहि वाटूं लागलं कीं, मी जसा माझ्या मनाचा ठाव घेत आहें, तसा जर गार्गी आपल्या मनाचा घेऊं लागेल, तर तिला आपण स्वतःची वंचना करीत आहोंत हें कळेल...पण — पण तिला स्वतःची आणि माझी वंचनाच करायची असली तर ?...

—खुशाल करूं देत बिचारीला वंचना ! मला कुणाचीच वंचना करायची नाहीं. मला पाणी आणि विस्तव यांतला फरक जाणण्याइतपत जर अक्कल असेल, तर सेतुपार्वती आणि गार्गी यांच्यांतला फरक जाणण्याची पात्रता खास आहे... आणि—आणि मग पत्रांतली गार्गी आणि चरित्रांतली गार्गी यांतलाहि फरक मी खूप जाणूं शकतों !...

आपण शारीरिक प्रेम करतों कीं काय, हा प्रश्न जगदीशच्या दृष्टीनं काडीच्याहि किमतीचा ठरेना; आपण कुणाची वंचना करीत आहों काय, हा प्रश्न त्याच्या त्या मनःक्षोभांत फार महत्त्वाचा ठरत होता. अखेर मनाशीं काहीं तरी निश्चय करून—गार्गीच्या पोकळ वेदांताला फारशी किमत द्यायची नाहीं एवढा तरी निश्चय करून — थोडं मोकळं वाटावं म्हणून तो घराबाहेर पडला.



सेतुपार्वती तिथून निघाली ती सरळ वाडिया कॉलेजच्या होस्टेलवर येऊन दाखल झाली. कॉलेजचीं लेक्चर्स बंदच होतीं. शिवाय त्या दिवसापासून दिवाळीच्या सुट्टीला सुरुवात होत होती. सुट्टी नसली तरीहि सेतुपार्वतीला जेवायला उशीर होई, हें आतां कॉलेजच्या ' मेस् 'मध्यें प्रसिद्धच होतं. आतां तर ' मेस् ' जवळजवळ बंदच होता. ज्यांना सुट्टींत घरीं जायला विशेषसा उत्साह नाहीं, किंबहुना जायला घरच नाहीं, अशा सेतुपार्वतीसारख्या चारदोन

मुलीच काय त्या वसतिगृहांत बाकी उरलेल्या होत्या. सेतुपार्वती सर्व मुलींत लोकप्रिय होती असं नसतं म्हणतां आलं; पण तिला अगदीं जिवाभावाच्या जितक्या मैत्रिणी होत्या तितक्या दुसऱ्या कुणा होस्टेल-विद्यार्थिनीला क्वचितच असतील. त्यांतील तिघी गांवांतून तिच्या खोलीवर येत; आणि एकच मैत्रीण —करमाळ्याची बेबी निंबाळकर—ही होस्टेलमधली होती. सेतुपार्वतीच्या एक वर्ष मागं असली, तरी ज्युनियर–सीनियरचे तास एकत्रच होत असल्यामुळं तिची वर्गभगिनीच होती. अटकर बांधा, काळसर वर्ण, चंचल डोळे, अर्भकासारखं हंसणं, या सर्व वैशिष्ट्यांमुळं ती हायस्कूलच्या एखाद्या आठव्या-नवव्या इयत्तेंतल्या लाघवी मुलीसारखी भासे! ती बुद्धिमान् होती; पण अजाण होती. ती भक्तिमान् असली तरी महाचिकित्सेखोर होती. उंच, सडपातळ, उत्कट, पण गंभीर सेतुपार्वतीवर ती विभूतिपूजेचा वर्षाव करीत असे. पण त्या पूजेबरोबरच ती तिच्यावर सदैव प्रश्नांची सरबत्तीहि डागीत असे.

आपण हॉस्टेलमध्यें केव्हांहि पोचलों तरी काय बिघडणार आहे? वाढपी ताट करून ठेवील, आचारी–पाणक्यांच्या पंक्तीचा लाभ घडेल एवढंच,— असं एके काळीं सेतुपार्वतीला वाटत असे. पण अलीकडे तिलं या लहानखोऱ्या लाघवी पोरीच्या – बेबी निंबाळकरच्या – भक्तियुक्त सरबत्तीची भीति वाटत असे. आजदेखील ती जी गणेश पेठेंतून लष्कर भागाकडे वेगानं निघाली ती बेबी जेवायची थांबली असेल या धाकानंच!

जेवतांना बेबी आज गप्पच होती. पण 'आज बेबी गप्प कां,' या प्रश्नानंच सर्व नोकरमाणसंदेखील बेचैन होतीं. दोघींनींहि कसंबसं घांसावर घांस गिळून हातावर पाणी घेतलं. अधूनमधून बेबी सेतुपार्वतीच्या तोंडाकडे पाही अन् सेतुपार्वती बाह्यात्कारीं हंसून आपली मनःस्थिति लपवी. पण अखेर खोलीवर जाऊन कॉटवर पडल्यावर मात्र तिला बेबीच्या प्रश्नांना तोंड द्यावंच लागलं. सेतुपार्वतीचा लांबसडक देह कॉटच्या लांबींत कसाबसा मावला होता. बेबी तिच्या उशाशींच बसून तिच्या दोन वेण्यांशीं चाळा करीत होती. सेतुपार्वतीनं पडल्यापडल्या हातांत घेतलेली शरद्बाबूंची कादंबरी ओढून खालीं भिरकावून देऊन बेबी म्हणाली,—

'तूं आतांशा चालवलं आहेस काय सेतुपार्वती? जगदीशबाबूंकडे बसली असशील इतका उशीर? पण त्यांना तरी थांग लागला आहे का, तुला

अलीकडे काय होतं आहे त्याचा ? मंदा कर्णिक येऊन गेली तुझ्याकडे. रशीदा शेख तर नऊपासून सव्वादहापर्यंत बसून होती तुझ्याकरतां. त्यांना आपलं वाटतं, तूं म्हैसूरला कधीं जाणार, कॉलेजांतून नांव कां काढणार आहेस, वगैरे सगळं मला ठाऊक असून मी बोलत नाहीं ! ... एक दिवस मी सरळ जाऊन तुझ्या जगदीशबाबूंनाच गांठीन बघ ! ... नाक नको उडवूंस अशी ! त्यांनासुद्धां कांहीं माहीत नाहीं, एवढंच ना ? पण तूं आमच्याजवळदेखील अलीकडे सरळ बोलत नाहींस हेंच मला त्यांना कळवायचं असलं तर ? ”

“ तुम्हांला सांगण्यासारखं आहे, तें मी तुम्हांला सांगतें; जें त्यांना सांगण्यासारखं आहे तें त्यांना सांगतें;—आणि जें कुणालाच सांगण्यासारखं नाहीं, तें स्वतःला सांगतें. हें जगदीशबाबूंना माहीतहि आहे आणि मंजूरहि आहे, बेबी ! तुझ्यासारखी खुळी पोर त्यांच्यापुढं जाऊन अधिक तें काय सांगणार ? तुझी बोबडी वळेल त्यांच्यापुढं ! ”

“ मी असेन खुळी ! पण जगदीशबाबू तर शहाणे आहेत ना ! मग त्यांच्याजवळ कां नाहीं सांगत तूं सगळं ? ज्यांच्या ज्ञानाचा उपयोग तुझ्या अडचणीच्या वेळीं नाहीं, त्यांच्या ज्ञानाचा तरी उपयोग काय ? आणि ‘ प्रेमा ’चा तरी उपयोग काय ? ”

‘ प्रेम ’ हा शब्द बेबीनं जणूं अवतरणचिन्हांकित करून उच्चारला, त्यामुळं सेतुपार्वतीच्या तोंडावर हास्याची पुसट रेषा उमटली.

“ ‘ प्रेम ’ नसलं तुला कबूल, तर ‘ भक्ति ’, ‘ वात्सल्य ’—काय तुमचं असेल ठरलं तें म्हण ! पण तुझ्या दुःखांत त्याचा उपयोग नसेल तर मला त्या प्रेमाचाहि राग येईल आणि त्या जगदीशबाबूंचाहि राग येईल ! ” बेबी म्हणाली.

“ लहान आहेस तूं बेबी अजून ! ” बेबीच्या बारीक कमरेभोंवतीं पडल्यापडल्याच आपल्या डाव्या हातानं विळखा घालींत सेतुपार्वती म्हणाली, “ आधीं जगदीशबाबूंवर प्रेम करायची माझी लायकी नाहीं. त्यांतून त्यांच्याविषयीं माझी जी काय भावना आहे तिला प्रेमच म्हणायचं ठरलं, तरी तें प्रेम म्हणजे कांहीं बटव्यांतलं एखादं औषध नव्हे, कीं पर्समधले पैसे नव्हेत, कीं त्याचा झटकन् रोख उपयोग झाला तरच तें खरं ! जगदीशबाबूंसारखीं माणसं

आहेत, म्हणून दुःख भोगायला तरी आमच्यासारख्यांना धैर्य येतं. नव्हे, दुःख देखील गोड वाटतं,—टाऊक आहे तुला ?"

"नुसतं दुखणं सोसायला बळ देणं एवढंच डॉक्टरचं काम असतं असं मी तरी नाहीं समजत, सेतुपार्वती ! पण तें जाऊं दे ! माझी त्यांच्यापुढं बोबडी वळेल ती कां ? माझं ज्ञान कमी असलं, म्हणून एखाद्या ज्ञानी माणसापुढं मी बोलूंच नाहीं कीं काय ?"

"त्यांच्या 'ज्ञाना'चा प्रश्न नाहीं, बेबी. आपल्या कॉलेजांत आणि दुसऱ्या कितीक मैत्रिणींच्या कॉलेजांत विद्वानांना, पीएच्. डी. ना आणि 'इंग्लंड–रिटर्न्ड'ना तोटा नाहीं. पण जगदीशबाबूंच्या जवळ आणखी कांहीं वेगळं आहे,–ते जणूं ऐकणाराच्या मनाचा ठाव घेत बोलतात. ते जेव्हां बोलतात, तेव्हां ते माझ्यावर प्रेम करतात कीं नाहीं हा क्षुद्र विचारच माझ्या मनांत येत नाहीं, बेबी ! ते सर्व जीवनावर प्रेम करीत आहेत, प्रेमांतूनच ते बोलत आहेत,–नव्हे, ते स्वतः प्रेमच आहेत, असं मला वाटतं. ते तुझ्या–माझ्यासारखी चुरचुरीत उत्तरं देत सुटत नाहींत, ते एखाद्या डॉक्टरासारखे इलाज सांगत सुटत नाहींत. त्यांनीं तुमचा प्रश्न नुसता ऐकून घेतला, तरी तो सुटल्याप्रमाणं वाटतो. त्यांनीं तुमचं दुःख नुसतं कबूल केलं, तरी तें हलकं झाल्यासारखं वाटतं. तुझी बोबडी वळेल, ती तूं बुद्धीनं कमी म्हणून नव्हे, बेबी !— तर अनुभूतीनं कमी, सहानुभूतीनं कमी, म्हणून वळेल. दुःखानंच मनाला जी खोली येते, अनुभवानंच सहानुभूतीची जी पात्रता येते तींत तूं अद्याप उणी पडतेस. पण ही झटकन् उठून सुधारण्याचीहि उणीव नव्हे !— ही नुसती स्वतःशीं कबूल करण्याची उणीव आहे, बेबी ! बेबी, तूं खरंच अजून लहान आहेस. अन् हा कांहीं तुझा दोष नव्हे; पण तेंहि कबूल नसल्या-प्रमाणं तूं वागशील, तर तो मात्र तुझा दोष होईल !..."

—बेबी मोठे डोळे करून पाहत राहिली; आणि सेतुपार्वती पुन्हा शरच्चंद्रांच्या कथासृष्टींतल्या अहेतुक वेदनेंत आपली वेदना क्षणभर विसरून गेली. बेबीचं लक्ष सेतुपार्वतीच्या विचारांपेक्षां आकृतीकडेच अधिक लागलं होतं. एरव्हीं चापचोप दिसणारे सेतुपार्वतीचे केंस घटकाभर कॉटवर लोळल्या-मुळं कांहीसे विस्कटले असले, तरी अधिक फुगीर आणि भरदार दिसून तिच्या कांहींशा लांबट चेहेऱ्याला रुंदी आणि भेहेरप देत होते. तिच्या तलम

पातळाची इस्त्री ती सकाळीं बाहेर पडली तेव्हांच्या मानानं आतां थोडी शिळी झालेली असली, तरी तिच्या अंगावरून सरकलेल्या पदराआडून तिचं शरीर-सौष्ठव अधिकच अभिव्यक्त होत होतं. रंगापेक्षां नाकाडोळ्यांत आणि नाक-डोळ्यांपेक्षांहि अंगलटींत ज्यांचं आकर्षण लपून असतं, अशा स्त्रियांत सेतुपार्वतीची गणना झाली असती. विश्रब्धपणें विस्कळित वस्त्रांनीं लवंडलेल्या सेतुपार्वतीच्या दर्शनांत इतर स्त्रियांपेक्षां नेमकं वेगळं काय आहे हें एखादा चित्रकार, नाहीं तर शरीरशास्त्रज्ञच सांगूं शकला असता. पण पदर बाजूला सरकल्यामुळं अनावृत झालेल्या तिच्या पोटाच्या पट्टींत आढळणारा विलक्षण नितळपणा बेबीला म्यूझियममध्यें पाहिलेल्या ग्रीक शिल्पाचं स्मरण देत होता...

थोड्याच वेळांत दोघींनाहि झोंपेनं किंचित् घेतल्यासारखं झाल्यानं, सेतुपार्वतीचं पुस्तक बंद झालं नसलं, तरी वाचणं बंद झालं होतं; आणि तिच्या सुव्यक्त शरीरसौष्ठवाकडे बराच वेळ कौतुकानं पहात राहिलेल्या बेबीचे मोठे डोळेहि आतां मिटलेल्या कमलपत्रांप्रमाणं बंद झाले होते.

—एवढ्यांत ' सेतुपार्वती नंदीमठ !— तारवाला ! तार !'— या शब्दांमुळं दोघीहि दचकून उठल्या. सेतुपार्वतीनं झटकन् सही करून तार घेतली, फोडून वाचली. बेबी अगदींच घाबरल्यासारखी होऊन म्हणाली,—" कुठली ? म्हैसूरचीच ना ? "

सेतुपार्वती त्या मानानं थंड, कठोर आणि करारी दिसत होती. " हो ! घरचीच आहे तार. माझ्या पत्रानं काम भागणार नाहीं, हें मीं परवां पत्र लिहिलं तेव्हांहि मला माहीत होतं. " तारेच्या पाकिटाचा चोळामोळा करीत आणि तारेच्या कागदाची घडी ब्लाउझमध्यं सरकवीत सेतुपार्वती म्हणाली. तारेचा कागद सेतुपार्वतीनं लगेच ब्लाउझमध्यें ठेवल्यामुळं अस्वस्थ होऊन बेबी म्हणाली,—

" पुन्हा निघालीस कीं काय कुठं ? "

सेतुपार्वतीनं कांहींच उत्तर दिलं नाहीं. ती कॉटवरून उठून एकदां आरशा-पर्यंत गेली, नंतर भिंतीवरच्या कॅलेंडरजवळ गेली.—आणि लगेच तिनं कॉलेज-कन्यांच्या दिमतीला असलेल्या षोडशवर्षीय मोलकरणीला हांक मारली. मेट्रनबाई-कडे रेल्वे-टाइम-टेबल आहे का तें विचारायला तिनं त्या मोलकरणीला धाडलं. ' मेट्रन ' म्हणून सेतुपार्वतीपेक्षां दोनच वर्षांनीं मोठी पण अशक्त, अभ्यासू,

आणि चष्मेवाली अशी एक ' पीएच. डी. 'ची स्टुडंट होती. तिला कुठलीहि गोष्ट विचारायला होस्टेलमधल्या मुली गेल्या तरी तिचं उत्तर एकच असे : ' तुम्ही आपल्या रेक्टरना जाऊन विचारा बाई ! ' रेल्वेचं टाइमटेबल वेगळं विकत मिळतं, हें देखील तिला ठाऊक नव्हतं ! तेवढ्यांत बेबीन पळत जाऊन रस्त्याच्या पलीकडच्या एका पारशाच्या बंगल्यांतून टाइमटेबल आणलं. टाइम-टेबल चाळून सेतुपार्वतीनं लगेच कुठंच बाहेर जायचं कारण नाहीं असं ठरवलं असावं. कारण ती पुन्हा कॉटवर आडवी झाली आणि हातांतलं शरद्बाबूंचं ' पथनिर्देश ' वाचूं लागली.



जगदीशबाबूंपुढं पत्र टाकून गार्गी सकाळीं निघाली ती घरीं,—जिमखान्यावर—न जातां विद्यालयांत गेली. विद्यालयाच्या हस्तलिखित मासिकाची प्रत तयार करण्याकरतां बरींच मुलं-मुली दिवसभर विद्यालयांतच पडून असत. त्यांच्यावर जणूं देखरेख करण्याच्या मिषानं ती ' महासंचालकां 'च्या खोलींतच दुपारपर्यंत बसून होती. ( ' प्रिन्सिपल ' याअर्थी ' महासंचालक ' हा महाशब्द या हिंदी विद्यालयांत चालू करण्यांत आलेला होता ! )

हस्तलिखित मासिकाकरतां जगदीशबाबूंनीं दोनतीन टोपणनांवांनीं दिलेल्या तीन कविता तिनं सहज पहाण्याकरितां म्हणून मासिकाच्या फाइल-मधून उचलून घेतल्या होत्या. तशाच जगदीशबाबूंनीं विद्यालयाला देणगी म्हणून दिलेल्या संग्रहांतून गालिब, निराला वगैरेंच्याहि कविता ती चाळीत होती. आपल्या ध्येयवादाला ती जगदीशबाबूंच्या आवडत्या लेखकांचा जणूं आधार होती. शारीरिक आकर्षणाला कडवा विरोध करण्याच्या निमित्तानंहि ती जगदीशबाबूंची शरीराकृतीच डोळ्यांपुढं आणीत होती. ती स्वतःच्याहि कित्येक उक्ति आणि कृति आठवून त्यांचा शुद्ध ' आत्मिक ' अर्थ लावण्याचा यत्न करीत होती. मधूनमधून ती समोरच्या आरशांत पहात होती, तों स्वतःचं निर्मळ पार्थिव वैभव जणूं कुणावर तरी चाल करून जात आहे असं तिला भासत होतं. कांहींना देव असा कांहीं आकार देतो, कीं त्यांतून आत्मिक अर्थ काढणं देवालाहि मुष्किल व्हावं ! ...

'पण त्यांत माझा काय दोष?... माझ्या उद्दाम आणि उत्फुल्ल शरीराकडे पहाण्याऐवजीं माझ्या ध्येयवादी मनाकडे पहायला हवं! ... कुमारसंभवांतल्या पार्वतीला आपल्या रूपाचाच राग येतो, तसा मला माझ्या रूपाचा खरंच, भारी भारी राग येत आहे, हें मी जगदीशबाबूंना कसं पटवूं?'...गार्गी मनांत म्हणत होती.

जगदीशबाबूंनीं आपल्या ठिकाणीं मधुराकृति शरीराऐवजीं निराकार आत्मा पहावा असा दावा सांगणाऱ्या गार्गीला स्वतःला समोरच्या आरशांत आपला आत्मा कुठंच दिसत नव्हता! तिचा टपोर गोल चेहेरा, प्रकाशांत झळाळणारे तिचे नागमोडी केंस, चोळीच्या खणाच्या ब्लाउझमधून उठून दिसणारी तिच्या दंडाची आणि छातीची मुलायम त्वचा, चालू फॅशनच्या ब्लाउझमधून उघडी पडलेली तिच्या गोऱ्यापान पोटाची पट्टी, दुरून जणूं दोन ओठांत ओल्या खोबऱ्याचा तुकडाच धरल्यासारखे भासणारे तिचे पुढारलेले, लखलखीत एकसंध दांत ... या सर्व ईश्वरदत्त सरंजामाकडे पाहून तिची तीदेखील आत्म्याचं अस्तित्व विसरत होती! आत्म्यापेक्षां आपल्या वांट्याला ईश्वरानं शरीरच अधिक दिलेलं आहे, असं तिला क्षणभर वाटत होतं. आरशांत गुजराथ्याप्रमाणं उलट्या दिसणाऱ्या पदरानं तिच्या आत्ममग्नतेचा भंग झाला म्हणून बरं, नाही तर ती किती वेळ तशीच स्वतःकडे पहात राहिली असती, कोण जाणे!

मध्येंच एकदां तिनं दंडांत रुतलेल्या ब्लाउजच्या किरमिजी कांठांतून बोट फिरवून जणूं त्या तकतकीत गोऱ्या मांसल 'सिलिंडर'मध्यें कुठं आत्म्याचा पत्ता लागतो का पाहिलं!—काळ्याभोर रेशमी ब्लाउजच्या कॉलरमुळं अधिकच गोऱ्या दिसणाऱ्या गळ्यांतून छातीवर रुळणाऱ्या सोन्याच्या सांखळीशीं निरर्थक हातचाळा केला. आपली कन्यकावस्था मोठ्या कंजुषपणं जतन करणाऱ्या गार्गीचं लक्ष रेशमी ब्लाउझनं अंशतःच झांकल्या जाणाऱ्या आपल्या उरोजांच्या दुर्दम्य उन्नतीकडे गेलं आणि ती लज्जित झाली.—पण क्षणांत निग्रहानं तिनं त्या लज्जेला रोषाचं रूप दिलं. तिला स्वतःचं शरीर नाकारतां येत नसलं, तरी शरीराचं वर्चस्व नाकारायचं होतं.

पण तूर्त तरी तिच्या या आध्यात्मिक प्रयत्नाला यश येण्याचा रंग दिसत नव्हता! जगदीशबाबूंच्या ध्येयपूजक कवितांचं अवलोकन तसंच राहून

ती स्वतःच्या शारीरिक सौंदर्याच्या अवलोकनांत गुरफटली. एवढ्यांत जेवणाची वेळ केव्हां टळली हें तिला कळलंहि नाहीं. अखेर तिनं भर उन्हांतून भरधांव सायकल सोडून घर गांठलं.



सेतुपार्वतीला आतां म्हैसूरला जाणं तर भागच होतं; परंतु लगेच निघण्याइतकं तिनं त्या तारेला महत्व दिलं नाहीं. दुसऱ्या दिवशीं रात्रीं निघायचं तिनं ठरवलं. तार आली त्या दिवशींची दुपार आणि संध्याकाळ तिनं मैत्रिणींच्या गांठीभेटींत निर्धास्तपणं घालवली. दुसऱ्या दिवशीं थोडाफार बाजार करणं, कॉलेज्-च्या प्रिन्सिपलकडे, रेक्टरकडे आणि कॉलेजच्या ऑफिसमध्यें जाऊन पुढच्या दृष्टीनं चौकशी करणं वगैरे गोष्टी तिन अगदीं थंडपणं केल्या. नंतर ती रास्ता पेठेंतील आपल्या मावशीकडे जेवायला गेली. मावशीकडेहि तिनं कारणापलीकडे कशाची वाच्यता केली नाहीं; तरी मावशीचा नवरा जितका प्रेमळ तितकाच व्यवहारचतुर असल्यानं, मावशीलाहि सेतुपार्वतीबरोबर म्हैसूरला धाडण्याचा बेत तिथं अचानकपण ठरला. सेतुपार्वतीला वास्तविक यामुळं थोडा धीरच यायला हवा होता; पण आपला प्रसंग आपण एकट्यानंच निभावून न्यायचा, असा तिचा स्वभाव असल्यानं तिनं या गोष्टीला शक्य तितका विरोध केला. पण कोणत्याहि बाह्य विरोधापलीकडे पहाण्याची दृष्टि मावशीच्या नवऱ्याला असल्यानं सेतुपार्वतीचं कांहीं चाललं नाहीं.

सर्व तयारी सकाळींच झालेली होती. तिकिट वगैरेची व्यवस्था मावशी-कडील नोकरामार्फत होतच होती, त्यामुळं आतां होस्टेलवरहि जायची सेतु-पार्वतीला गरज नव्हती. जेवण झाल्यावर ती सरळ गणेश पेठेंत जगदीशबाबूंकडे गेली. काल ती गेली कीं लगेच गार्गी आली होती! आली ती आली, अन् वर पुन्हा तऱ्हेवाईक बोलून आणि तें विचित्र पत्र देऊन गेली होती. त्यामुळं बराच वेळ जगदीशबाबू गार्गीबद्दलच विचार करीत राहिले असले, तरी तो तात्पुरता क्षोभ होता. त्यांच्या अन्तर्मनाच्या गाभाऱ्यांत सेतुपार्वतीच्या करुण, पण तरीहि प्रसन्न अशा वृत्तीचा सुगंध आतां दरवळत होता.

सेतुपार्वतीसारख्या चतुर, बुद्धिमान्, हौशी मुलीचं शिक्षण अचानक

थांबावं आणि तेंहि तिच्या घरच्या माणसांच्याच घाणेरड्या गैरसमजामुळं थांबावं... हा विचार जगदीशबाबूंना रात्रभर सतावीत होता. अशा पापशंका घेणाऱ्या सावत्र आईच्या आणि तिच्याच मुठींत असलेल्या बापाच्या घरीं पुन्हा जायचं तरी कशाला या तालेवार मुलीनं ?...हा विचार जगदीशबाबूंच्या मनांत हजार वेळां येऊन गेला असेल. अखेर सेतुपार्वतीचाच विचार चालू असतां ऐन दुपारीं ती आज त्यांच्याकडे येऊन दाखल झाली.

आज ती परवांसारखी उदास दिसत नसून कमालीची आनंदी दिसत होती त्यामुळं जगदीशबाबू प्रथम थोडे चमकलेच.

" काय, आज तर तूं कमालीची आनंदांत दिसत आहेस ? काय ठरवलंस अखेर ? " त्यांनीं विचारलं.

" जायचं ठरवलंय् आज रात्रीं बंगलोर मेलनं ! " गोड पण निश्चयी स्वरांत सेतुपार्वती उत्तरली.

" काय आज रात्रीं जाणार ? पण काल तसं कांहीं बोलली नव्हतीस ? "

" काल तुमच्याकडून गेल्यावर तार आली ! "— असं म्हणून सेतुपार्वतीनं ब्लाउझमधून तो तारेचा कागद काढला अन् जगदीशबाबूंपुढं टाकला.

" त्यांच्या तारा येणार हें ठरल्यासारखंच होतं, पण तूं जायचं ठरवशील असं नव्हतं मला वाटलं. " तार वाचून बाजूला सारीत जगदीशबाबू म्हणाले.

" मीं कालच ठरवलं होतं. "

" काय ? काल ? "

" हो, तुमच्याइथून निघण्यापूर्वीच. "

" मग बोलली नाहींस मला तसं ? "

" बोलण्यापूर्वीच मला जाण्याची सूचना मिळाली. " सेतुपार्वती थोडं डिंवचण्याच्या हेतूनं म्हणाली.

" सेतुपार्वती ! तुला ? आणि माझ्याकडून जाण्याची सूचना ? " जगदीशबाबू दुःखी स्वरानें म्हणाले, " मला आजपर्यंत एकदांहि असं झाल्याचं आठवत नाहीं. त्यांतून तुझी मर्जी ! "

" तुम्हीं स्वतः नसेल दिलीत; पण—" स्वतःला दुखापत झाल्याचा

म्हाणा करून आपल्या प्रियजनांना सुखासुखी दुखापत करण्याची हातोटी सेतु-पार्वतीसारख्या थोर मनाच्या मुलींतहि होतीच !

" सेतुपार्वती ! —तुला माझ्यासमोर माझ्या घरांतून निघण्याची सूचना करण्याची कुणाची पुण्याई आहे, असं निदान माझं मन तरी ग्वाही देत नाहीं. तूं असं आडून कां बोलते आहेस आज ? गार्गीबाईला तो अधिकार मीं दिला आहे असं म्हणायचं आहे का तुला ?"

" तुम्हीं नसेल दिला त्यांना तो अधिकार ! पण कदाचित् निसर्गानंच दिला असेल ! कदाचित् त्यांचा त्यांनींच घेतला असेल ! " सेतुपार्वती अजूनहि हंसतच होती, अजूनहि तिरपंच पाहत होती.

" काय तें स्पष्ट बोलशील तर उपकार होतील. आज पुणं सोडायच्या दिवशीं तरी माझ्या मनांत कांटा सलत ठेवून उठूं नकोस इथून ! " जगदीशबाबू व्याकुळपणें म्हणाले.

" मी तुमची क्षमा मागते जगदीशबाबू ! तुमची थट्टा करायचा मला अधिकार आहे असं मला वाटलं म्हणून मी बोलले हें सारं ! तुम्हांला वाईट वाटावं म्हणून नाहीं बोलले. "

सेतुपार्वतीनं थट्टा करणं, डिंवचणं आतां थांबवलं असलं, तरी अद्याप जगदीशबाबूंच्या दुःखानं तिला या बैठकींत तरी सुख होतं आहे, असाच तिसरा कुणी तिथं असता, तर त्याला भास झाला असता.

" ही नुसती थट्टा नव्हे सेतुपार्वती ! थट्टेचं पांघरूण घेतलेलं हें दुसरंच कांहींतरी आहे. नको असं बोलूंस आज तरी ! "

" असं पाहा ! " एखाद्या पोराची समजूत घालावी तशा सुरांत सेतु-पार्वती म्हणाली, "एक तर गार्गीबाई तुमच्या कुणीहि असल्या—किंवा कुणीहि नसल्या !— तरी माझ्या त्या हिंदीच्या बाई आहेत, तेव्हां मला बोलायचा त्यांना अधिकारच आहे. आणि शिवाय माझ्यापेक्षां त्या ' सर्वच ' दृष्टींनीं मोठ्या आहेत. "

" पण म्हणून माझ्यासमोर त्यांची तुला बोलण्याची प्राज्ञा आहे कीं काय ? "

" मला वाटतं, तुमच्यासमोर होत्या म्हणूनच त्या बोलूं धजल्या. एरव्हीं हिंदीविद्यालयांत त्या माझ्या बाई असल्या म्हणून परवांच्या झोंकांत बोलण्याची

त्यांची प्राज्ञा नव्हती !" सेतुपार्वतीचा थट्टेचा सूर संपून 'शिकायती'चा सूर केव्हां सुरू झाला, हें तिचं तिलाहि कळलं नाहीं.

"सेतुपार्वती ! मी आतां स्पष्ट बोललों नाहीं तर, तो माझा स्वतःविरुद्ध गुन्हा होईल, म्हणूनच बोलतों.--एरव्हीं असल्या विषयावर तुझ्यापुढं बोलणं हाच मी गुन्हा समजलों असतों. गार्गी हुषार आहे, पंडित झाली आहे. एम्.ए. आहे; रूपसंपन्नहि आहे.-"

जगदीशबाबूंनीं शेवटचं विशेषण उच्चारतांच सेतुपार्वतीच्या गालावर अर्थपूर्ण हास्य पसरलं.

"हंसायचं कारण नाहीं सेतुपार्वती ! मी आज सगळंच बोलणार आहे. कारण मला तिच्याविषयीं काय वाटतं तें मी कदाचित् तिच्यापासून लपवीन; पण तुझ्यापासून लपवणार नाहीं."

"काय वाटतं तुम्हांला गार्गीबाईविषयीं ?" खुर्चीवरून किंचित् पुढं वांकून, आपल्या डाव्या पायाच्या अंगठ्याकडे पाहत सेतुपार्वतीनं विचारलं. त्या विचारण्यांत थट्टा नसली तरी खरेपणाहि नव्हता. कारण 'जें काय वाटतं तें मला ठाऊक आहे,' असाहि त्यांत सूर होता.

"मला तिच्याविषयीं एक प्रकारचं आकर्षण वाटत असलं तरी तुझा अधिकार वेगळा आहे, सेतुपार्वती !" जगदीशबाबूंच्या स्वरांत जणूं सारा प्राण उतरला होता. ते सेतुपार्वतीवर दृष्टि लावून बोलत होते; पण सेतुपार्वतीची दृष्टि आपल्याकडे नसून जमिनीवर खिळलेली आहे हें पाहून ते अधिकच व्यथित होत होते.

अखेर सेतुपार्वतीनं वर पाहून थट्टा टाकून ऋजुतेनं आणि आतुरतेनं विचारलं, "असा कोणता अधिकार आहे 'सेतुपार्वती'च्या अंगीं ?"

"सेतुपार्वती, सर्वांत मोटा अधिकार आहे तुझ्यापाशीं. तुझं थोर, भावनाशील हृदय हेंच तुझं ईश्वरी अधिकारपत्र आहे ! दुसऱ्याचं शारीरिक आकर्षण तर त्या अधिकाराला धक्का पोंचवूं शकत नाहींच; पण तुझं स्वतःचं शारीरिक आकर्षणहि त्याला धक्का पोंचवूं शकत नाहीं !"

सेतुपार्वती जगदीशबाबूंकडे पाहतच राहिली ! एखाद्याच्या थोरवीविषयीं जेव्हां जगदीशबाबू बोलत, तेव्हां ते स्वतःच अधिक थोर वाटत. त्यांची चर्या

बदलून जाई, अशा वेळीं ! सेतुपार्वती या गूढ प्रशंसेनं थोडी गांगरलेली पाहून ते पुढें म्हणाले,—

" सेतुपार्वती, तूंहि कमी सुंदर नाहींस; पण शरीर हें तुझं मुख्य आकर्षण नाहीं !—नव्हे ! तुझ्या शरीराबद्दल ज्याला आकर्षण वाटलं, त्याला तुझ्यांतला मधुरतम भाग दिसलाच नाहीं असं म्हणावं लागेल... थोडं स्पष्ट बोलूं सेतुपार्वती ? गार्गी ' मिळण्यां 'त जेवढा आनंद आहे, त्याच्या शतपट आनंद ' सेतुपार्वती आहे, ' या नुसत्या जाणीवेंत आहे ! तिला माझ्यासमोर अधिक्षेपानं बोलण्याचा अधिकार कसा येईल कुणाला ? ... "

जगदीशबाबूंच्या शब्दांनीं स्वतःचं मोठेपण मनांत येण्याऐवजीं सेतुपार्वतीच्या मनांत जगदीशबाबूंचंच मोठेपण येत होतं. तिचे डोळे विस्फारित, पण कृतज्ञ दिसत होते. तिचे गाल विनम्रतेच्या भावनेनं आरक्त दिसत होते. खोडकर उत्तरांची तिची ऊर्मि आतां मावळली होती; कृतज्ञ मौन आणि सलज्ज दृष्टिपात हेंच तिला आतां उत्तर वाटत होतं. तरी तिच्या तोंडून शब्द गेले, —

" तुम्हांला तो अधिकार आहे जगदीशबाबू ! तुम्ही मला तसं म्हणणार नाहीं; पण ' इथून जा ' म्हणण्याचासुद्धां अधिकार आहे तुम्हांला ! "

जगदीशबाबू यावर कांहीं म्हणणार तोंच त्यांचं लक्ष गॅलरींत वाजलेल्या पावलांकडे गेलं. कुणी येत असणार या कल्पनेनं ते थांबले; पण जवळ येण्याऐवजीं तीं पावलं दूर जाऊं लागलीं, म्हणून ते उठून गॅलरीकडे गेले, तों जिन्यांतून उतरणाऱ्या सँडल्सचा टप्‌टप् आवाज त्यांच्या कानीं पडला. त्यांनीं गॅलरींतूनच खालीं अंगणांत पाहिलं. तों गार्गीची पाठमोरी आकृति, तळहाताएवढ्या जनानी छत्रीच्या आवरणांत अर्धवट लपलेलं तिचं डोकं त्यांना दिसलं. एकदां त्यांना असं वाटल कीं, औपचारिक सभ्यता सोडून वरूनच ' गार्गीऽऽ! ' अशी हांक मारावी. पण तेवढ्याची तरी काय गरज ? परत जायचं असलं तर जाऊं दे तिला !—असा विचार करून ते पुन्हा आपल्या खोलींत आले.

" कुणी...होतं ? " सेतुपार्वतीनं प्रश्न केला. जनदीशबाबूंना उत्तर देववलं नाहीं.—त्यांनीं सेतुपार्वतीकडे फक्त पाहिलं. सेतुपार्वतीला तिच्या स्त्रीसहज अंतर्मनानं कोण होतं तें अर्धवट सांगितलं असलं, तरी आपली शंका बोलून न दाखवतां तिनं म्हटलं, —

" ही देखील एक सूचनाच आहे मला! रात्रीं निघायचं आहे गाडीनं! नाहीतर आणखी किती वेळ मी बोलत बसलें असतें अशीच कोण जाणे!"

" सूचना असेल;—पण माझी नव्हे बरं का सेतुपार्वती!"

" तुमचीहि नव्हे, दुसऱ्या कुणाचीहि नसेल; मी ती 'सूचना' मानतें एवढं खरं!" असं म्हणून येत्या वेळची आपली आनंदी चर्या पुन्हा धारण करून सेतुपार्वती झटकन् बाहेर पडली. जगदीशबाबूंनीं सूचना दिली नसली तरी यापुढं जगदीशबाबू आतांपर्यंतच्या सुरांत बोलूं शकले नसते, हें मात्र त्यांची चर्याच सांगत होती. जिच्या वृत्तीच्या थोरवीनं आणि आकृतीच्या मनोहारित्वानं आतांपर्यंत जगदीशबाबूंचं संपूर्ण अंतरंग भरून गेलं होतं, त्या शीतल सेतुपार्वतीचं स्थान त्यांच्या अंतरंगांत आतां गार्गीच्या चंडप्रभ मूर्तीनं घेतलं होतं.

गार्गीचं हें येणं अन् हें जाणं चमत्कारिकच नव्हे, तर संशयास्पदसुद्धां नव्हे का? तिला कुणी आंत यायला बंदी का केली होती? दारहि सताड उघडंच होतं!... कदाचित् तिचंच मन तिला खात असेल... तिच्या त्या विचित्र पत्रानंतर ती प्रथमच येत आहे: पण आतां ती येत आहे तरी कशाकरतां?... तिच्या अशरीरी प्रेमाच्या झोळींत तर मी 'कामुकतेचा दगड' च टाकला असं तिचं म्हणणं! मग पुन्हा ही झोळी माझ्या दारांत कशाकरतां?...

जगदीशबाबू अस्वस्थपणं येरझारा करीत होते. तें कांहींहि असो, आज पुन्हा सेतुपार्वतीच्या भेटीचं उदात्तशीतल वातावरण,—आंत पाऊलहि न टाकतां—गार्गीनं बिघडवलं!...

जगदीशबाबू अस्वस्थपणें असा विचार करीत आहेत, तोंच तींच पावलं पुन्हा वाजलीं. आणि तीच आकृति पुन्हा दारांत दिसूं लागली.

गार्गीचं स्वागत कुठल्या शब्दांनीं—कुठल्या वृत्तीनं करावं, हेंच जगदीशबाबूंना प्रथम न कळल्यानं ते नुसतेच पाहत राहिले. थोडा वेळ उन्हांत भटकल्यानं, आणि ज्ञात-अज्ञात अशा अनेक मनोविकारांच्या अन्तःक्षोभानं गार्गीचा गोल लखलखीत मुखडा एखाद्या ज्वालामुखींप्रमाणं धगधगत होता. कांहीं स्त्रियांचा—चेहेरा विशेषतः आधुनिक स्त्रियांचा—चेहेरा त्यांच्या मनोविकारांचं उलटं प्रतिबिंब दाखवणारा एक आरसाच असतो, असं म्हणतां

येईल! गार्गी जेव्हां खजील होई तेव्हां, तो खजीलपणा लपवण्याकरितांच कीं काय उद्दाम दिसे. ती जेव्हां आंतून भ्यालेली असे तेव्हां बाहेरून चवताळल्यासारखी दिसे; जेव्हां तिला एखाद्या उमद्या मुलीच्या व्यक्तिमत्त्वाबद्दल धाक वाटे, मत्सर वाटे, तेव्हां बाहेरून तिच्या मुखावर तुच्छता, अहंगंड दिसे! आणि जेव्हां ती एखाद्याबद्दल आंतून कामुक आकर्षणानं पीडित असेल, तेव्हां ती एखाद्या मंदकाम स्त्रीप्रमाणं निर्विकार आणि थंड दिसे!—निदान तिची तशी धडपड असे. या सगळ्यांचा परिणाम म्हणजे एकंदरींत ती पीडित आणि क्षुब्ध दिसे. पण ज्या विकारानं क्षुब्ध असेल त्याच्या उलट विकार तिच्या चेहेऱ्यावर दिसे!

पण इतका विचार तुम्हीं केला नसता,—कुणीच केला नसता. कारण कुठल्याहि अवस्थेंत तिच्या चेहेऱ्याचंच काय, पण शरीराच्या कुठल्याहि भागाचं—नुसत्या दंडाचं, नुसत्या मानेजवळच्या भागाचं, नुसत्या पार्श्वदर्शनाचंहि—आकर्षण केवळ दुर्निवार असे. थोड्या वेळापूर्वी सेतुपार्वती समोर होती आणि गार्गी लांब पाठमोरी चोरट्या पावली चाललेली होती, तरीहि जगदीश अस्वस्थ झालाच. आतां तर ती अंतर्बाह्य तापानं तापून लालबुंद झालेली त्याच्यासमोरच उभी होती.

जगदीश क्षणभर भान विसरला—तो मोहित झालेला नव्हता; पीडित आणि त्रस्त झालेला होता. गार्गीचं शरीर इतकं विलोभनीय नसतं, तर जगाचा केवढा त्रास वांचला असता!... असं मनांत येऊन तो स्वतःशींच त्याला आवडणारं स्त्रियांचं एक फारशी उपपद पुटपुटला, 'आफत्—ई—जहाँ!' 'आफत्—ई—जहाँ!'

"गार्गी! तूं मघांशीं परत कां गेलीस? आमचा कांहीं एकान्त नसतो हें तुला ठाऊक होतं ना?"

"तुमचा नसेल एकान्त,—पण मला हवा असला एकान्त तर?"

"तुला? आणि माझ्याशीं एकान्त? तुझ्या त्या 'अशरीरी प्रेमाच्या झोळी'चं काय झालं?"

"माझ्या पत्राची अशी हेटाळणी व्हावी अशी माझी इच्छा नव्हती!—मर्जी तुमची! पण मला नाहीं वाटत, माझ्या पत्रांत कांहीं गैर होतं म्हणून! उलट, तुमच्यासारख्या बुद्धिमन्ताला, कवीला आणि कुर्बानीच्या गोष्टी करणारालाच

अशरीरी प्रेमाची ही हेटाळणी शोभत नाहीं. मला तुम्हीं काय दिलंत आणि काय द्यावंत ही गोष्ट वेगळी; पण तुमचा तरी अशरीरी प्रेमावर विश्वास नाहीं कीं काय ? "

" मुळींच नाहीं माझा विश्वास त्या ढोंगावर ! वयानं, विद्येनं आणि शरीरानं वाढलेल्या तुम्हां दक्षिणी विदुषींनीं स्वतःचं मन मारण्याकरतां, पुरण्याकरतां काढलेलं तें एक सोंग आहे ! "

" दक्षिणी मुलींच्या सोंगाच्या गोष्टी करायचा अधिकार चार दिवस ग्वाल्हेरला काढल्यामुळं तुम्हांला खासच आहे ! पण आमचीं वयं वाढली हा आमचा दोष नाहीं. आमची विद्या वाढली, हा तर कुणीहि शहाणा मनुष्य गुणच मानील.—पण माझ्या प्रश्नाचं सरळ उत्तर नाहींच दिलंत जगदीशबाबू तुम्हीं ! "

" मीं तुझ्या प्रश्नाला अगदीं सरळ आणि स्पष्ट उत्तर दिलं आहे. तुला तें पत्करेल किंवा पत्करणार नाहीं, हें तुझ्या आन्तरिक सचोटीवर अवलंबून आहे ! "

" मला तें कसं पत्करेल ? कसं खरं वाटेल जगदीशबाबू ! केवळ पाऊण तासापूर्वीच जो माणूस—जे तुम्ही—कवि, विद्वान्, अहिंसावादी !—एका तरुण स्त्रीशीं 'अशरीरी' प्रेमाच्या आणि 'मानसिक सौंदर्या'च्या गोष्टी करीत होतां, तेच तुम्ही मला आतां जें उत्तर देतां आहां तें खरं कसं वाटावं ? एक तें तरी खोटं असलं पाहिजे, नाहीं तर हें तरी खोटं असलं पाहिजे ! आणि अशा उच्च आत्मिक प्रेमावर विश्वास नसतांना जर तुम्ही एखाद्या तरुण मुलीशीं तशा प्रेमाच्या गोष्टी करीत असलांत, तर तीहि वंचनाच नव्हे का ? "

आपल्या बुद्धिगर्वित आणि बेदरकार प्रियकराला नैतिक कैचींत पकडल्याबद्दल गार्गीला जेवढा गर्व वाटत होता, तेवढाच विषाद तिनं सेतुपार्वतीचं शुभनाम मध्यें ओढल्यामुळं जगदीशबाबूंना वाटत होता. वास्तविक गार्गीनं आपला आणि सेतुपार्वतीचा झालेला उत्कट, जिवाभावाचा संवाद चोरून ऐकला याबद्दल त्यांना चीड यायला हवी होती. उलट, तिनं तो ऐकल्याची शंकाहि त्यांना आत्तांपर्यंत आली नव्हती, इतकीं तीं दोन खातीं ते आपल्या मनांतल्या मनांत पृथक् ठेवीत होते. आणि गंमत होती ती हीच. गार्गीनं तें बोलणं ऐकलं, यापेक्षांहि तिनं त्या बोलण्याचा आधार स्वतःच्या प्रेम-

संबंधाच्या समर्थनाकरतां घेतला, याची त्यांना खरी चीड वाटत होती. मी तें सर्वच्या सर्व बोलणं गार्गीसमोरदेखील बोललों असतों, पण म्हणून तिनं त्याचा आधार घ्यावा कीं काय? कुठं गार्गीचे आणि माझे केवळ प्राकृत संबंध आणि कुठं सेतुपार्वतीचं आणि माझं सर्वस्वी अपार्थिव नातं!... अशीच त्यांची भावना होती. पण भावना ती भावनाच! गार्गीसारख्या दुखावलेल्या रूपवतीला, – डिंवचलेल्या पंडितेला – त्यांच्या त्या 'खास व्यक्ति-निष्ठ', प्रायः खाजगी, नीति-शास्त्राची मातब्बरी काय? आपण जगदीशला चांगलं कैचींत पकडलं अशा खुनशी समाधानानंच ती त्यांच्याकडे पाहत होती.

"मी सेतुपार्वतीला फसवतों आहे कीं काय याची पंचाईत करायचं तुला तरी कारण नाहीं, गार्गी! तिची ती समर्थ आहे पाहून घ्यायला. तूं स्वतःलाच फसवते आहेस कीं काय, याचा मात्र विचार कर! – तुम्ही दक्षिणेंतल्या सुशिक्षित मुली शिकतां, पदव्या पटकावतां, पुरुषांच्या बरोबरीनं नोकऱ्या करतां, – नटीसारख्या नटतां, मुरडतां, ठुमकतां, – तें सगळं काय नुसतं खोलींतल्या आरशाकरतां कीं पोथ्यापुस्तकांतल्या आत्म्याकरतां?"

"तुमची सेतुपार्वती भगवी छाटीच लावून घेत असेल अगदीं?" आपली नाजुक, लालसर, लांबट, पण सदैव लवलवणारी जिवणी तुच्छतेनं उजव्या कोपऱ्यांत मुरडून गार्गी म्हणाली.

"पुन्हा तूं सेतुपार्वतीचं नांव काढलंस! तूं आपल्यापुरतं बोल गार्गी! सेतुपार्वतीविषयीं मला वैषयिक आकर्षण वाटत नाहीं, –आणि तुझ्याविषयीं वाटतं! —मग? पुढें काय? अन् जें वाटतं त्याला कारण जितका मी स्वतः तितकाच तूंहि आहेस असं मी म्हणतों! मान उडवूं नकोस!—मी माझं म्हणणं सांगतों आहें. वाटलं तर तूं माझ्या त्या वाटण्याला कारण मी एकटा आहें असं म्हण. पण आहे ही वस्तुस्थिति अशी आहे. त्यावर इलाज अशरीरी प्रेमाची मागणी करणं हाहि नव्हे, कीं दुसऱ्याचा मत्सर करणं हाहि नव्हे!"

"मग त्यावर इलाज कोणता जगदीशबाबू?"

"ज्याच्याजवळ जी वस्तु नाहीं त्याच्याजवळ ती मागण्यांत वेळ न दवडणं, त्याचा नाद सोडणं, त्याचं नांव सोडणं!"

"आपल्याला दुसरा एक 'नाद' मिळाल्याबर दुसऱ्याला 'नाद'

सोडायला सांगणं सोपं आहे, जगदीशबाबू!—पण ही—अक्कल—चुकले! हें तत्त्वज्ञान—हें सगळं आधीं कां नाहीं सुचलं तुम्हांला?"

"कशाच्या आधीं?"

"त्या दिवशीं माझ्याशीं खेळ खेळायच्या आधीं!" गार्गी त्याच्या अंगावर कातून म्हणाली.

"खेळ तर त्याच्याआधींच सुरू झालेले होते, गार्गी! तुम्ही बायका दुरून खेळतां म्हणून ते खेळ नव्हेत, असं नव्हे!" जगदीशबाबूहि डोळे गरगर फिरवीत दरडावणीच्या स्वरांतच म्हणाले.

"मीं प्रेमाला जें रूप द्यायचं ठरवलं होतं, त्याला दुरूनच खेळणं जरूर होतं. पण तुम्ही त्या दिवशीं बोटॅनिकल गार्डनमध्यें जो खेळ खेळलांत तो खेळतांना तुम्हीं कोणता विचार केला होतात?" असं आव्हानाच्या सुरांत विचारून गार्गीनं मुद्दामच आपला आवाज उतरवला;—हलक्याच पण ताकिदीच्या सुरांत तिनं पुढं म्हटलं,—

"तुमचं लग्न झालं आहे असं मी ऐकतं. तुमच्या पत्नीहि हयात आहेत म्हणे! मग तुम्हीं कोणता विचार केला होतात आपल्या मनाला मोकळं सोडतांना, जगदीशबाबू?"

तुच्छतेनं हंसून जगदीशबाबू उद्गारले, "अस्सं! शारीरिक आकर्षणाचा धिक्कार करतांना तुला आतां आत्म्याची आठवण होत नसून लग्नाची आणि अब्रूची आठवण होते आहे.—हेंहि वाईट नाहीं! माझ्या पहिल्या लग्नाचं काय झालं हें तुला सांगण्याचा प्रश्न आतां तरी उद्भवत नाहीं, मला वाटतं! आपण तूर्त दोन प्रौढ जबाबदार व्यक्तींच्या प्रामाणिक आकर्षणासंबंधीं बोलतों आहोंत. एखाद्या स्त्रीनं नटतांमुरकतांना, लगट करतांना, कशाचा विचार करायचा नाहीं,—आणि पुरुषानं मात्र त्या चाळ्यांकडे नुसतं बघायच्याहि आधीं मंगलकार्यालय, भांडींकुंडीं,—सगळं कांही पाहून ठेवलं पाहिजे, हा तुझ्या अशरीरी प्रेमाचा प्रकार अजब दिसतो! आकर्षण म्हणजे आकर्षण!...मोह म्हणजे मोह! मोहांत पडतांना हिशेब करणाऱ्या माणसांनाच उलट मी ढोंगी समजतों!"

"विचार करायचा नाहीं, तर मग?—त्या दिवशीं त्या बागेंत, समजा,

मीहि विचार केला नसता तर ? मग..." गार्गी अर्थपूर्ण कटाक्ष टाकून मधेंच अडखळली.

"मग काय ? तुला वाटतं त्या मुळामुठेंतल्या खडकावरच आपण .. " जगदीश तुच्छतेनं पाहत उद्गारला.

"जगदीशबाबूऽऽ!!" गार्गी जणूं आपल्या डाव्या हातानं त्याचं तोंड झांकीत किंचाळली. "बोलण्यांत तरी निदान मर्यादा ठेवा : तुम्ही तुमच्या घरीं आहां! असे उद्दाम बेफाट जबाब देणं सोपं आहे; पण विचार करून वागणं सोपं नाहीं. उत्तर-हिंदुस्थानी पुरुषापेक्षां त्या दिवशीं दक्षिणी स्त्रीच अधिक शुद्धी-वर वागली, लक्षांत ठेवा! तुमच्या–माझ्या मैत्रीला 'अशरीरी' प्रेमाचं वळण लावणं एवढा एकच मार्ग आपल्यापुढं खुला आहे. तुम्ही एल्‌एल्. बी. झालेले आहांत,—तुम्हांला मीं सांगायला हवं असं नाहीं. आमच्या प्रांतांत विवाहित पुरुषानं लग्न करणं, तसंच विवाहित पुरुषाशीं लग्न करणं हा व्यभिचार आहे; गुन्हा आहे; ती अनीति आहे! माहीत आहे ना?"

गार्गीच्या अज्ञानाची आणि घाबरट नीतीची कींव करीत जगदीशबाबू म्हणाले, "गार्गी, तूं एल्‌एल्. बी. नाहींस हें मला माहीत होतं; पण तूं एल्‌एल्. बी. होण्यासारखीहि नाहींस हें आज मला समजलं. अनीति आणि गुन्हा एक नव्हे गार्गी! आणि गुन्ह्यांत आणि बेकायदा वर्तनांतहि मी फरक करतों. मी खादी वापरतों, गांधीजींना चाहतों, अहिंसेचं ध्येयहि उच्च मानतों, त्याचा अर्थ गांधी टोपी घालून पण हव्या त्या मार्गांचा अवलंब करून निवडून आलेल्या गांवगुंडांच्या मेजॉरिटीला मी पापपुण्य ठरवण्याचा अधिकार देतों, असा नव्हे बरं का! सरकारनं केलेले मूर्खपणाचे कायदे मोडणं हें सच्च्या गांधींवाद्याचं कर्तव्यचं आहे!"

"अस्सं! म्हणजे तुमच्या अहिंसेंत जसं बंदूक बाळगणं, साप-खेकडे मारणं बसूं शकतं, तसं तुमच्या सत्याग्रहांत एखाद्या गरीब आईबाईला सवत आणण्याचं शतकृत्यहि बसतं असं दिसतं!" गार्गी आतां मात्र आपल्या पदव्या आणि नखशिखान्त फॅशन विसरून एखाद्या जुन्या सनातनी बाईच्या सुरांत बोलूं लागली होती.

"गार्गी! ज्या गांवाला जायचं नाहीं त्याची वाट कशाला शोधायची? तूं दुरून खेळ खेळतांना किंवा मीं जवळून खेळतांना कोणताहि विचार केला

विचार केला असला, तरी आतां खेळ बंद करणं एवढा एकच तुला मार्ग आहे. विवाहाच्या बाबतींत जसे तुझे विचार पुस्तकी आहेत, तसेंच अशरीरी प्रेमाच्या बाबतींतहि आहेत. दुसरं कांहीं जमेनासं झालं, म्हणजे एकमेकांवर आशक असलेल्या माणसांनीं 'अशरीरी' प्रेमाची पाटी दारावर लावायची, हा त्या फार थोर, दुर्मिळ आणि पूर्वपुण्याईनंच मनांत उदित होणाऱ्या नात्याचा अपमान आहे. गार्गी! चुकी, अन्याय, पातक यांतलं कांहींहि करून एकमेकांना विटलेल्या स्त्री-पुरुषांचं प्रामाणिक वैरसुद्धां मी असल्या अगतिक अध्यात्मापेक्षां अधिक शुद्ध समजतां!" जगदीशबाबूंचा चेहेरा आतां पूर्ण लढाऊ आणि बेदरकार दिसत होता.

कौतुक आणि अंतर्व्यथा यांनीं गार्गीचं मन भरून गेलं होतं. जगदीश-बाबूंच्या सेतुपार्वतीवरच्या अशरीरी प्रेमाचीहि तिला भीति वाटत नव्हती. स्वतःवर असलेल्या त्यांच्या वैषयिक प्रेमाचीहि खरं पाहिलं तर तितकीशी भीति वाटत नव्हती...पण आतांच्या बेपर्वाईची आणि निरिच्छतेची मात्र तिला भयंकर भीति वाटत होती. शारीरिक वासनेंत न गुरफटण्यांत मी तुमच्यापेक्षां श्रेष्ठ आहें, असं तिला दाखवायचं असलं, तरी जगदीशबाबू हातचे दवडण्या-इतका तिला हा गर्व फुगवायचा नव्हता. क्षणांत जगदीशबाबूंची चर्या मात्र तशी दिसूं लागली खरी!—ते हातचे गेल्यासारखी,—नव्हे, ते जणूं तिच्या गांवचेहि नाहींतशी दिसूं लागली! ते जणूं आतां रागावण्याकरतां देखील तिचा विचार करीत नव्हते!

क्षणापूर्वी लढाऊ, निर्भय आणि सत्यप्रिय दिसणारा त्यांचा चेहरा आतां अगदीं निर्विकार आणि अन्यमनस्क दिसत असल्यानं, गार्गी अधिकच व्यथित झाली. कदाचित् त्यांच्या मनांत 'सेतुपार्वतीच्या रात्रीच्या प्रयाणाच्या वेळीं आपण स्टेशनवर जावं कीं न जावं, जायचं ठरलं तर त्यापूर्वी इतर कामं कशीं आंवरावीं,' यासारखे अगदीं व्यावहारिक दिनक्रमाचेहि विचार चालू असतील. पण ते आतां गार्गीच्या गांवचेहि नव्हते, एवढं मात्र गार्गीनं ओळखलं.

बराच वेळ अशा अहेतुक दुर्लक्षांत गेल्यावर जगदीशबाबू खोलींतल्या खोलींत बारीक सारीक कामंहि उरकूं लागले, तेव्हां मात्र गार्गीला फारच बेचैन वाटूं लागलं. अखेर अलमारींतून कपडे काढण्याकरितां जगदीशबाबू पाठमोरे झाले, तों अलमारीच्या दारावरील आरशांत गार्गीच्या गालांवरून वाहणारे

पाण्याचे ओघळ पाहून ते चरकलेच !

“ मी बसलों, विचार केला
आणि तिचं कोडं सुटलं
असं समजून राहिलों.
—पण हें काय ?
त्यामागून तिचे अश्रू आले, आणि
त्यांत माझं कोड्याचं उत्तर
वाहून गेलं ! ”

अशा अर्थाची आपल्या एका मित्राची इंग्रजी कविता त्यांना आठवली. त्यांनीं झटकन् अल्मारी बंद केली. ते गार्गीच्या खुर्चीजवळ गेले. तों गार्गीचे हुंदके वाढूंच लागले.

“ गार्गी ! गार्गी ! तुला काय होतंय् ? काय हवंय् ? तूं रडूं नकोस बुवा !” असं म्हणून त्यांनीं तिच्या खुर्चीच्या पाठीवर हात ठेवला. गार्गी खुर्चीच्या हातावर दोन्ही हात व डोकं ठेवून आतां मुक्तपणें रडत होती. स्त्रियांचं रडणं ज्यांना बघवत नाहीं, काय वाटेल तें देऊन तें थांबवावंसं वाटतं, अशा पुरुषांच्या वर्गात जगदीशबाबू पडले असते. त्यांचं तत्त्वज्ञान, त्यांचं तर्कशास्त्र, त्यांचा बेदरकारपणा, त्यांचा करारीपणा—सगळं, सगळं अशा वेळीं लुळं पडे ! पण इथं ते करणार होते काय ? केवळ तिचं रडूं थांबावं एवढ्याकरतां ‘ तूं म्हणशील तें कबूल, ’ असं म्हणायचं देखील त्यांच्या ओठांवर आलं. पण त्याला कांहीं अर्थ होता का ? ‘ तूं रडूं नकोस ! मी तुझ्या कल्पनेप्रमाणं अशरीरी प्रेम करीन तुझ्यावर, ’ असं म्हणण्याला काय अर्थ होता ?...

दोन इंचांच्या अंतरावर स्फुंदूनस्फुंदून रडणाऱ्या, दोनच दिवसांपूर्वींपर्यंत प्रिय असलेल्या आणि आजहि रमणीय असलेल्या त्या स्त्रीला पाहून जगदीशबाबूंना पहिली ऊर्मि जर कोणती आली असेल, तर तिला जवळ बसवून घेऊन तिचे गाल पुसण्याची;—नव्हे, त्या विचारानंच ते खुर्चीजवळ गेले होते. पण पुन्हा तिच्या ‘ शरीरी ’, ‘ अशरीरी ’ वगैरे शंका त्यांच्या मनांत येऊन ते थबकले होते !

“ जगदीशबाबू ! मला कांहीं कळत नाहीं,—मला स्वतःला काय हवं

तेंहि कळत नाहीं ! मी कां रडतेंयू तेंहि कळत नाहीं !...'' असं म्हणत गार्गीनं अशा असाहाय आणि अतृप्त नजरेनं त्यांच्याकडे पाहिलं, कीं त्यांनीं तिचा एक हात आपल्या हातांत नि आपला दुसरा हात तिच्या पाठीवर अशा स्थितींत तिला खुर्चीवरून उठवून कॉटवर नेऊन बसवलं. पुढें कांहीं बोलायची गरजच पडली नाहीं. गार्गी स्फुंदतस्फुंदत त्यांच्या मांडीवर आडवी झाली.

जगदीशबाबूंना तिची कींव आली. त्यांना ती आजवर कोणत्याहि अवस्थेंत रमणीयच दिसलेली होती. आजहि रडूनरडून डोळे, गाल, मान लाल झालेली गार्गी कुणालाहि करुणमनोहरच दिसली असती. जगदीशबाबूंना मात्र आज तिची फक्त कींव येत होती. तिच्याच टीचभर हातरुमालानं तिचे गाल पुसण्यापलीकडे त्यांचे हात आज कांहींच करीत नव्हते. उलट आज जगदीशच्या मांडीवर डोकं असून आणि जगदीशचा हात तोंडावरून फिरत असूनहि, गार्गीलाच जगदीश पुरेसा जवळ नाहीं असं वाटत होतं. तिच्या अंगोपांगांची हालचाल तिच्या गूढ अतृप्ततेचा आणि अस्वस्थतेचा परिस्फोट करीत होती. स्त्रियांच्या स्वाभाविक संकोचामुळें आणि अशरीरी प्रेमाच्या अस्वाभाविक संकल्पामुळें तिचे हात बांधले असले, तरी ओठांचं आणि वक्षःस्थलाचं स्पंदन तिच्या संकोचाला आणि संकल्पाला कसं जुमानणार ?

अखेर अंशतः जगदीशबाबूंच्या सान्निध्यानं आणि अंशतः त्यांच्या निश्चलतेनं, गार्गीचं रडं आटोक्यांत आलं. त्यानंतर मात्र त्या निर्विकार प्रियकराच्या मांडीवर पडून रहाणं तिला व्यर्थ आणि खोटं वाटूं लागलं. मांडीवरून उठून कॉटवरच पण थोड्या अंतरावर बसून, तोंड पुसून आणि केंस सांवरून गार्गी म्हणाली,--

"माझं चुकत असेल कदाचित्---पण तुम्ही त्यामुळं मला दुरावणार नाहींत ना, जगदीशबाबू ? मला माझ्या कल्पनेप्रमाणं प्रेम करूं द्या: तुम्ही तुमच्या कल्पनेप्रमाणं करा...''

"कुणीहि आपल्या कल्पनेप्रमाणंच वागणार गार्गी ! पण तुझं वागणं तुझ्याहि कल्पनेप्रमाणं नाहीं, एवढीच माझी तक्रार होती. आपलं स्वतःचं मन समजणंसुद्धां सोपं नाहीं, गार्गी !''

गार्गी थोडा वेळ शून्य दृष्टीनं बसून अखेर एक अक्षरहि न बोलतां पायांत सँडल्स् अडकवून निघून गेली.

गार्गी निघून जातांच जगदीशबाबूंनीं टेबलाच्या खणांत चोळामोळा होऊन पडलेलं तिचं पत्र काढलं, त्याचे तुकडेतुकडे केले आणि ते टेबलाखालच्या टोपलींत फेंकून दिले. पत्र काढतांना आणि फाडतांना त्यांच्या डोक्यांत गार्गीच्या निर्याणापेक्षां सेतुपार्वतीच्या प्रयाणाचे विचारच अधिक होते...



जगदीशबाबूंकडून गेल्यापासून रात्र पडेपर्यंत सेतुपार्वती मैत्रिणींच्या घोळक्यांतच हिंडत होती, बसत होती, बांधाबांध करीत होती. लीला कर्णिक तिला बांधाबांधींत मदत करीत होती; रशीदा शेख तिच्या घेण्या हातांत घेऊन त्या वियोगाच्या वेळीं गोड 'गुफ्तगू' करण्यांत गर्क होती. बेबी निंबाळकर मात्र सेतुपार्वतीच्या आणि रशीदाच्या भावपूर्ण चेहेऱ्यांकडे आलटून-पालटून पाहत, एखाद्या लाडावलेल्या पाळींव प्राण्याप्रमाणं कॉटवर बसून होती. जगदीशबाबू स्टेशनवर येतील कीं नाहीं, याबद्दल त्या सर्वजणीच उलटसुलट तर्क करीत होत्या.

रात्रीं दहाच्या बंगलोर मेलमध्यें मावशीच्या यजमानांनीं सेकंड क्लासच्या दोन जागा रिझर्व्ह केलेल्या होत्या. साडेनऊपासून एम्. एस्. एम्. मेलच्या एका कंपार्टमेंटचं लेडीज् होस्टेलच्या खोलींत रूपांतर झालेलं होतं! पोक्त वयाची, डोक्यावर पदर असलेली, सतेज डोळ्यांची, ताप्त्यासारख्या अंगाची, सेतुपार्वतीची मावशीच काय ती त्या हंसऱ्या कॉलेजकन्यांत वेगळी दिसत होती. सेतुपार्वतीलाहि प्रवासांत–वडील माणसं बरोबर असल्यास!–डोक्यावरून पदर घेण्याची सक्ती असल्यामुळें, ती आज थोडी निराळी पण अधिक आकर्षक दिसत होती. पदराच्या रेशमी मेहेरपींतून तिच्या काळ्याभोर रेशमासारख्या केंसांचं आणि त्यांच्या दुभंगलेल्या दाटींतून मोत्यांच्या ओळींप्रमाणं सरळ वाट काढणाऱ्या तिच्या भांगाचं वैभव, ती सकाळीं न्हालेली असल्यानं आज विशेषच शोभून दिसत होतं!

"तूं हमेशा डोक्यावरून ऐसाहि पदर काय म्हणून नहीं घेत, सेतुपार्वती? बहोत खूबसूरत दिसते तूं आज!" असं म्हणत डोक्यावरून नेहमींच पदर घेणाऱ्या रशीदानं तिच्या दोन्ही खांद्यांवर हात ठेवले. एवढ्यांत

'जगदीशबाबू!', 'बाबूजी आले!' अशी तोंडांची कुजबुज आणि त्याच अर्थाचे डोळ्यांचे इषारे झाले. सेतुपार्वती चमकून उठून डब्यांतून खालीं आली. तिची मावशीहि 'प्रोफेसराइवरा ऽऽ?'—'प्रोफेसर इद्दारा ऽऽ?'—असं कांहींतरी कानडींतून कुजबुजत डब्याबाहेर आली.

"आपण कशाला रात्रीचे आलांत?" सेतुपार्वतीनं सद्‌गदित स्वरांत विचारलं.

"एवढंहि करूं नये का तुझ्याकरतां, सेतुपार्वती?" जगदीशबाबू खिन्नपणें म्हणाले.

आत्तांपर्यंतच्यां बालिश हास्यविनोदाच्या आणि उल्हासाच्या वातावरणाला एकदम कारुण्याचं वळण लागतं कीं काय, अशी सर्वांनाच चिंता पडली. पण आज उल्हासाचा भंग होऊं द्यायचा नाहीं, असा जणूं सेतुपार्वतीनं निश्चयच केला होता. ती उत्कट पण प्रसन्न स्वरांत म्हणाली,—

"'एवढंहि' म्हणजे काय, जगदीशबाबू? सगळंच केलं आहेत तुम्हीं माझ्याकरतां!" आतां तीं दोघं मुलींच्या घोळक्यांतच उभीं असलीं, तरी जगदीशबाबू फारसं स्पष्ट बोलूं शकत नव्हते. ते थोड्या सूचक स्वरांत म्हणाले,—

"प्रसंगाला तोंड तर तूं एकटीच देत आहेस. मी इथं आलों काय आणि घरीं बसलों काय!"

"तुम्ही घरीं बसूनदेखील मला बळ देऊं शकाल जगदीशबाबू! मला ज्या प्रसंगाला तोंड द्यायचं आहे, त्याला तुमच्या बंदुकीची गरज नाहीं; तुमच्या पैशाची गरज नाहीं.—तुमच्या विचारांची, तुमच्या श्रद्धेची, तुमच्या प्रेमाची गरज आहे. मला घरांतून बाहेर पडायचं बळ नको आहे, जगदीशबाबू! घरांत रहायलाच बळ हवं आहे!—परवां तुमच्याकडून आल्यापासून कां कोण जाणे, मला जगांत नुसतं दुःख, नुसता दुष्टपणा नसून चांगुलपणाहि आहे, असं वाटूं लागलं आहे. आणि जगांतल्या त्या चांगुलपणाच्या आधारावर आणि माझ्या स्वतःच्या चांगुलपणाच्या बळावरच मला प्रसंगाला तोंड द्यायचं आहे. प्रेमाच्या माणसांचा रोष, आईवडिलाचा विरोध कांहीं गोळीबारानं मोडायचा नसतो. मीं स्वतः तिथं जाणं, प्रेमासह आणि प्रेमाच्या श्रद्धेसह जाणं, हेंच माझं बळ आहे.—तें बळ मला पुण्यांत, या मराठी मुलखांत तुमच्या रूपानं भेटलं, जगदीशबाबू! तुम्हीं आणखी काय करायचं होतं?—आणि तुम्हीं केलंत तें

दुसरं कोण करूं शकलं असतं ?...” सेतुपार्वती उल्हासानं आणि श्रद्धेनं बोलत असली, तरी विरहाच्या जाणीवेनं तिचा चेहेरा लालसर झाला होता. तिच्या मैत्रिणींच्या आणि जगदीशबाबूंच्या डोळ्यांत तर पाणीच तरारत होतं. एवढ्यांत गाडीची कर्कश शीट, हिरव्या निशाणाचे इषारे आणि “Get in please!” अशा सूचना ऐकूं आल्या. मैत्रिणींचे खांदे प्रेमानं दाबून सेतुपार्वती आंत शिरली. बोलणं सरलंच होतं,—सरलं पाहिजेच होतं, आणि तरी डब्याच्या खिडकीबरोबर झपझप् चालत जगदीशबाबू म्हणाले,—

“कारण पडणार नाहीं तसं,...पण पडलंच तर पुण्यांत तुझ्या मावशी आहेत, तसा एक ‘जगदीश’हि आहे बरं, सेतुपार्वती!” असं सद्‌गदित आवाजानं गाडीच्या खडखडाटांत ओरडून जगदीशबाबूंनीं हातरुमाल हलवला. सेतुपार्वती नुसती पाहत होती खिडकींतून. आपला उल्लेख ऐकून मावशींनीं हात जोडले, पण तोंपर्यंत डबा पुढें निघून गेला होता!

स्टेशनबाहेर पडेपर्यंत, पोंचवायला आलेल्यापैकीं कुणी कुणाशीं अक्षरहि बोललं नाहीं!

